# माझा प्रवास

[ सन १८५७ सालच्या
बंडाची हकीकत ]



लेखक
वे. शा. विष्णुभट गोडसे
वरसईकर



संपादक
रा. ब. चिं. वि. वैद्य
एम्. ए. एल्‌एल्. बी.



प्रस्तावना
प्रा. न. र. फाटक





चित्रशाळा प्रकाशन, पुणें २.

० मुद्रक व प्रकाशक ०
दामोदर त्र्यंबक जोशी
चित्रशाळा प्रेस, १०२६
सदाशिव पेठ, पुणें २.

किंमत
अडीच रुपये



पहिली आवृत्ति
१९०७

दुसरी आवृत्ति
१९४८

# अनुक्रमणिका

[ सूचनाः—पहिला जाड आंकडा परिच्छेदाचा व दुसरा बारीक आंकडा पानाचा आहे. वाचकांनीं याप्रमाणें परिच्छेदामागें भागशः आंकडे घातल्यास वाचन सुकर होईल. एकाच परिच्छेदांतील महत्त्वाच्या मजकुराची पानें त्या त्या मजकुरांपुढें वेगळीं नमूद केलीं आहेत. ]

## भाग १ ला

### गोडशे घराण्याचा इतिहास



## भाग २ रा

### प्रवास व बंडाची हकीकत



## भाग ३ रा

### बंडवाल्यांची हकीकत

## भाग ४ था

### झांशी येथील पूर्ववृत्तांत

## भाग ५ वा

### झांशी येथील उत्तर वृत्त



## भाग ६ वा

### काल्पी प्रकरण

## भाग ७ वा

### ग्वालेर व मध्य हिंदुस्थान



## भाग ८ वा

### तीर्थयात्रा

---



प हि ल्या आ वृ त्ती ची 

# प्र स्ता व ना

चिंतामण विनायक वैद्य

आपल्या देशांत खऱ्या इतिहासाची किती उणीव आहे हें सांगावयास नको. पाश्चात्यांनीं लिहिलेले इतिहास सर्वांशीं चांगले व मनाचें समाधान होण्याजोगे नाहींत, असें म्हटल्यावांचून रहावत नाहीं. याचें कारण एक तर त्या लोकांस आपल्या देशस्थितीची पूर्ण माहिती होणें कठीण आहे, व दुसरें असें कीं, जितके इंग्रजी ग्रंथकारांनीं इतिहास लिहिले आहेत तितके साहाजिकच एकपक्षी झाले आहेत. सारांश, हिंदू लोकांच्या दृष्टीनें हिंदुस्थानच्या इतिहासाची उणीव कोणीतरी हिंदू इतिहासकार निपजल्यावांचून दूर व्हावयाची नाहीं हें निर्विवाद आहे. असा बुद्धिमान, व्यासंगी व अधिकारी पुरुष केव्हां निपजेल तो निपजो. परंतु आपल्या हातीं असणारीं इतिहासाचीं साधनें जमा करून ठेवणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे व त्याप्रमाणें अनेक लोकांनीं छापलेल्या ग्रंथांतून अशी माहिती आजवर उपलब्ध झाली आहे, हें आपल्यास भूषण मानण्याजोगें आहे.

सन १८५७ सालचे बंडाचे जे इंग्रजी इतिहास झाले आहेत ते वरील प्रकारचे आहेत. के, मालिसन वगैरे इतिहासकारांनीं जे मोठाले इतिहास लिहून ठेविले आहेत, ते सर्व एकपक्षी आहेत. त्यांत बंड इंग्रजांच्या कोणत्या चुकीमुळें उद्भवलें, साहेबलोक ठिकठिकाणीं कसे मारले गेले, थोड्या लोकांनीं मोठ्या शौर्यानें आपले प्राण कसे वांचविले, व पुढें इंग्रजांनीं दिल्ली, लखनौ, कानपूर वगैरे शहरें कशीं हस्तगत केलीं, इत्यादि

हकीगती सविस्तर रीतीनें वर्णन केल्या आहेत. परंतु बंडापूर्वी हिंदू लोकांच्या समजुती काय झाल्या होत्या, नानासाहेब, झांशीवाली, लखनौची बेगम, इत्यादि लोकांनीं बंडाकरितां काय उद्योग केले, ते आपले ठिकाणीं कसे वागत होते, त्यांस पुढें दुःखें कोणतीं व काय कारणानें भोगावीं लागलीं व अक्कल, धैर्य, शौर्य, क्रूरपणा, मूर्खपणा इत्यादि निरनिराळे गुण त्यांचे ठिकाणीं कसे दिसून आले व रयतेस बंडाच्या दिवसांत किती संकटें भोगावीं लागलीं, याजविषयीं त्यांचे ग्रंथांतून कोठेंच वर्णनें नाहींत. हें साहजिक आहे कीं, याजविषयीं त्यांस माहिती नसावी व असली तर क्वचित् प्रसंगीं पायोनियरसारख्या पत्रांत ‘ The tiger instincts of an Imperial race चिथवूं नका नाहींतर आम्ही १८५७ सालाप्रमाणें Fire and sword चालवूं ’ असे उद्गार निघतात; तथापि वरील गोष्टींचें वर्णन आपले ग्रंथांत करणें त्यास योग्य वाटत नाहीं. अशा स्थितींत या अशा गोष्टीविषयीं आपले लोकांनीं प्रत्यक्ष पाहून लिहिलेल्या हकीगतीच उपयोगीं पडणार आहेत. प्रत्यक्ष पाहून किंवा विश्वसनीय लोकांपासून ऐकून सविस्तर लिहून ठेविलेली त्या त्या वेळची हकीगत हें एक भावी इतिहासाचें महत्त्वाचें साधन आहे. सन १८५७ सालासंबंधेंच कित्येक साहेबलोकांनीं आपआपल्या हकीगती किती मनोवेधक रीतीनें लिहिल्या आहेत व त्या के. मालिसन इत्यादि इतिहासकारांस कशा उपयोगी पडल्या आहेत, हें इंग्रजी वाचकांस ठाऊकच आहे. अशा प्रकारची एक हकीगत एका विद्वान् भिक्षुक प्रेक्षकानें लिहून ठेविली आहे, ती भावी इतिहासकारास उपयोगी पडेल अशा हेतूनें या पुस्तकांत ती वाचकांपुढें मी ठेवीत आहे.

सदहू प्रेक्षक मूळचा भिक्षुक असून तो हिंदुस्थानांत बंडाचे दिवसांत द्रव्यार्जनाकरितां गेला होता. त्याची स्मरणशक्ति चांगली असल्यानें व त्यास मजकूर खुबीदार रीतीनें जुळवून लिहिण्याची शैली सहाजिक साध्य असल्यामुळें, भिक्षुक असतांनाही त्यानें लिहून ठेवलेली हकीगत छापण्यासारखी आहे, असें मला वाटतें. बिठूर, ग्वालेर, वगैरे ठिकाणच्या हकीगतीशिवाय बाकी पुस्तकांत लिहिलेल्या बहुतेक गोष्टी ग्रंथकारानें पाहिलेल्या आहेत. नानासाहेबांची हकीगत व ग्वालेरची हकीगत, ग्रंथकारानें ऐकिली असून ती जरी इतर हकीगतीपेक्षां कमी किंमतीची आहे तरी, ती त्या वेळेस ग्वाल्हेरीस व ब्रह्मावर्तास चांगल्या माहितगार लोकांकडून ऐकलेली असून बरीच विश्वसनीय आहे.

या पुस्तकांत इंग्रज लोकांनीं लिहिलेल्या हकीगतीप्रमाणें किती मनो-रंजक रीतीनें हकीगत सांगितली आहे, याजविषयीं वाचक कल्पना करितील. परंतु मला इतकें सांगितलें पाहिजे कीं, मूळ ग्रंथांत मीं फार थोडा बदल केला आहे. कोठें कोठें भाषा सुधारली असून अलीकडच्या रीतीनें लिहिली आहे व कांहीं ठिकाणीं मजकूर अधिक वाटला तो कमी केला आहे. एकंदरीनें बहुतेक सर्व ग्रंथ मूळचाच आहे असें म्हटलें तरी चालेल. दोनच ठिकाणीं मी आपल्याकडून दहा पांच वाक्यें ज्यास्त घातलीं आहेत, तींही मूळच्या ग्रंथाला अनुसरून आहेत.

या हकीगतीचे वाचनापासून वाचकांस आणखी एक फायदा होण्या-सारखा आहे. १८५७ सालच्या बंडास आज ५० वर्षें पुरीं झालीं; त्या वेळच्या सामाजिक व धार्मिक स्थितींत आज किती फरक पडला आहे, आमची शारीरिक, मानासिक व नैतिक स्थिति सुधारली आहे किंवा वाईट झाली आहे, याचीही कल्पना करण्यास या ग्रंथापासून बरेंच साधन होईल असें मला वाटतें. सारांश, इतिहासाच्या दृष्टीनें, मनोरंजनाच्या दृष्टीनें व व्यवहाराच्या दृष्टीनें, हा अल्प ग्रंथ वाचकांस उपयोगी पडून प्रिय होईल, अशी आशा करून ही लहानशी प्रस्तावना पुरी करितों.

मुंबई ता. १ दिसेंबर १९०७.

——

नव्या आवृत्तीची : : ☆

# प्रस्तावना

◂ न. र. फाटक ▸

' माझा प्रवास अथवा १८५७ सालच्या बंडाची हकीकत ' हें लिखाण कै. चिंतामणरावजी वैद्य यांनीं संपादून प्रसिद्ध केलें तेव्हांपासूनच गेलीं ४० वर्षें त्या योगानें मराठी भाषेंतच नव्हे तर १८५७ सालीं घडलेल्या धामधुमीच्या इतिहासांत उत्कृष्ट भर पडल्याचें समाधान जाणत्या जनतेकडून व्यक्त झालेलें आहे. कै. वैद्यांनीं हें पुस्तक १९०७ सालीं म्हणजे १८५७ सालानंतर ५० वर्षें उलटतांना प्रसिद्ध केलें. १८५७ सालच्या बंडाळीबद्दल इंग्रजमिध्यें शेंकडों निरनिराळ्या प्रकारचीं पुस्तकें छापलीं गेलीं आहेत. कित्येक समग्र इतिहासाच्या स्वरूपाचीं तर त्याहून कितीतरी पटीनें जास्त पुस्तकें बंडाळीच्या उपशमांत भाग घेतलेल्या लहान मोठ्या अधिकाऱ्यांच्या व्यक्तिशः आठवणींच्या स्वरूपाचीं आहेत. देशी भाषेंत कांहीं पुस्तकें लिहिलीं गेल्याचा निर्देश इंग्रजी पुस्तकांतून आढळतो तर कांहींचीं भाषांतरें इंग्रजींत आढळतात; परंतु मराठी भाषेंत असें पुस्तक असल्याची लोकांना कल्पना सुद्धां नव्हती. कै. चिंतामणरावांनीं हें पुस्तक उजेडांत आणून जी कामगिरी बजाविली तिचें ऋण कबूल करणें प्रत्येक मराठी भाषाभक्तांचें कर्तव्य आहे; परंतु हें कर्तव्य करण्याची संधि चिंतामणरावांनीं अगदीं निरपवाद ठेवलेली नाहीं हें सुद्धां लक्षांत ठेवणें बरें.

हें रसाळ प्रवासवृत्त वाचीत असतांना ज्या अडचणी भासतात त्यांचें निराकरण करणें या नव्या आवृत्तीच्या वेळीं अवश्य आहे. लेखकानें आपल्या प्रवासाचा वृत्तांत स्वगृहीं परत आल्यावर सुमारें २४ वर्षांनीं लिहिला असल्याचें अनुमान करण्याला वैद्यांनीं अंतर्गत पुरावा निर्माण केलेला होता, पण मूळ हस्तलिखिताच्या शेवटीं शके १८०५ सुभानुनाम संवत्सरे माघ शुद्ध ११ अशी नोंद केली असल्यानें प्रवासवृत्त केव्हां लिहिलें याविषयीं अनुमान करण्याचें कारण नाहीं. लेखक आपल्या अनुभवांचें जिज्ञासूंपुढें वारंवार पारायण करीत असतां या अनुभवांची कहाणी कागदावर उतरल्यास ती टिकून राहील अशा सूचनाहि त्यास जिज्ञासूंकडून होत असतील व शेवटीं २४ वर्षें लोटल्यावर त्यानें ही हकीकत

लिहून काढण्याला आरंभ केला असावा; असा त्यांच्या लेखनाचा एकंदर प्रकार तर्कायला त्याच्या लेखनांत आधार आहे. इतक्या दीर्घ कालावधींत त्यांच्या अनुभवांच्या आठवणींची गोळाबेरजि होऊं लागावी हें स्वाभाविक आहे व अशा गोळाबेरजेंतून त्या आठवणींची वस्तुस्थिति वाचकांना सादर केल्याशिवाय तिचा योग्य बोध होण्याचा संभव नाहीं. गोळाबेरजेचा घोटाळा लक्षांत येण्याकरितां एखाद दुसरें उदाहरण सांगितल्यास त्याची कल्पना येईल. लेखकानें प्रवासाच्या सुरवातीचें वर्ष, तीथ आणि वार हीं नमूद केलीं आहेत ( पान १० ). शके १७७८ या वर्षाचें नांव 'काल्युक्त' असें दिलें आहे. मोडकांच्या जंत्रीवरून पहातां तें नांव 'नल' पाहिजे. १७८० या वर्षाचें नांव 'कालयुक्त' आहे. त्याचप्रमाणें १७७९ च्या फाल्गुन वद्य पंचमीला रविवार होता असें मोडक जंत्री सांगते तर प्रवासलेखकानें तो मंगळवार असें खात्रीच्या शब्दांनीं म्हटलें आहे. झांशीस कत्तल सुरू असतां जीव बचावण्याकरितां लेखकास आपली जागा चुकून तरुण बायांच्या शेजारीं खेटून बसण्याची पाळी आली तेव्हां आपलें वय ३० ते ३२ वर्षांचे दरम्यान होतें असें लेखकानें म्हटलें आहे. हा प्रकार स्मरणांत अचूकपणा न राहिल्याचा दर्शक आहे.

## प्रवासाचें कालमान

लेखकाच्या प्रवासाला ३० मार्च १८५७ रोजीं खरी सुरवात झाली. १ जुलै रोजीं महूच्या छावणींत बंड उठलें त्या दिवशीं तो तेथें पोंचला. तेथून उज्जन, मग धार, पुनः उज्जन व नंतर ग्वालेर अशा रीतीनें प्रवासाचा पहिला हप्ता संपला. आषाढांत लेखक ग्वालेरला होता यावरून उज्जन ते ग्वालेर हा उलटासुलटा प्रवास फार जलद आटोपला असें म्हणावें लागतें. ग्वालेरला लेखकानें चातुर्मास्य कंठला. कार्तिक शुद्ध पंचमीस म्हणजे २३ आक्टोबर १८५७ या दिवशीं त्यानें ग्वालेर सोडलें आणि झांशीचा रस्ता धरला. तेथें तो केव्हां पोंचला त्याची नक्की नोंद नसली तरी मार्गशीर्ष शुद्ध पंचमीस ( २१ नोव्हेंबर १८५७ ) झांशीवाल्या राणीसाहेबांच्या खास आश्रयाखालीं त्याची नेमणूक झाली व त्यापूर्वीं त्यानें कांहीं धर्मकृत्यांत भाग घेऊन नांव कमावलें होतें यावरून ग्वालेर ते झांशी हा प्रवास लवकर संपला असें सहज ध्यानांत येणारें आहे. या दिवसांत सदर मुलखांत इंग्रजांचें राज्य

नष्ट झालेलें असलें तरी प्रवासांत विघ्नें येण्यासारखें बंडखोरांचें अराजक माज-लेलें नव्हतें, हें यासंबंधांत निराळें सांगायला नको.

नोव्हेंबरपासून ( १८५७ ) मार्चअखेरपर्यंत ( १८५८ ) लेखकाचा झांशींतील राहिवास मोठ्या सुखाचा होता. मार्च २१ रोजीं झांशी जिंकण्या-कारितां महूहून निघालेला इंग्रज सेनापति सर ह्यू रोज याची त्रिनी झांशीस पोंचली. दुसऱ्या दिवशीं झांशीच्या वेढ्याला प्रारंभ झाला. दररोज उभय पक्षीं जोराची गोळागोळी चालू होती. इतक्यांत ३० मार्च रोजीं तात्या टोपे इंग्रजी लष्करावर चालून आला. सर ह्यू रोजनें दुसऱ्या दिवशीं म्हणजे ता. १ एप्रिल या दिवशीं त्याला सामना देऊन संध्याकाळच्या आंत त्याला पिटाळून लावलें व पुनः एकाग्रतेनें त्यानें आपलें लक्ष झांशीकडे वळविलें. ता. ४ एप्रिल रोजीं झांशीच्या राणी-साहेबांनीं किल्ला व शहर सोडून काल्पीकडे कूच केलें. झांशींत आणखी दोन दिवस झटापटी चालू राहिल्या व ता. ६ रोजीं झांशी शहर पूर्णपणें इंग्रजांच्या कबजांत गेलें. लेखकानें झांशीस अकरा दिवस लढाई चालली होती वगैरे जी प्रत्यक्ष अनुभवाची माहिती सादर केली आहे, ती वरील तारखाशीं ताडून पहातां बहुतांशीं बरोबर असल्याचें कळून येईल. तात्या टोपे याशीं लढाई होत असतां किल्ल्यावरून लोक त्या लढाईचा देखावा पहात होते या वर्णनाला इंग्रजी इतिहासांतहि आधार सांपडतो. सडक बीजन आणि लुटालूट या प्रकरणाला मात्र इंग्रजी इतिहासांत तितकासा ठणठणीत थारा नसला तरी त्या बाबतींत लेखकांच्या प्रत्यक्ष अनुभवांचें प्रामाण्य नाकारण्याची गरज नाहीं. दिल्ली, लखनौ या शहरांतील कत्तल व लूट यांचा इंग्रजांनींच वाचलेला तपशीलवार पाढा झांशीच्या लेखकानें वर्णिलेल्या दुर्दशेची शक्यता सिद्ध करणारा आहे.

ह्यू रोजनें लढाईनंतर तीन आठवडे झांशीस राहून आपला मोर्चा काल्पीकडे वळविला. मार्गांत दोन ठिकाणीं बंडवाल्यांनीं त्याला अडविलें. ता. ६ मे रोजीं कूच मुक्कामीं पहिली लढाई झाली. दुसरी लढाई ता. २२ रोजीं गलोली नांवाच्या ठिकाणीं होऊन ह्यू रोज काल्पीस जाऊन भिडला. काल्पीकरितां इंग्रजांना विशेष झगडावें लागलें नाहीं. काल्पीबाहेरच्या लढाईंत बसलेल्या मारानें बंडवाल्यांची हिंमत

इतकी खचून गेली होती कीं, ता. २३ रोजीं इंग्रजांच्या मुख्य लष्करानें काल्पींत प्रवेश केला तेव्हां त्याला जिकडे तिकडे पूर्ण शुकशुकाट आढळला. 'माझा प्रवास' पुस्तकाचा कर्ता या वेळीं काल्पीस होता. झांशीहून काल्पीच्या वाटेवर असतां त्याला एका सकाळीं झांशीच्या राणीसाहेब भेटल्या ही माहिती खरी असली तरी त्यांच्या तोंडीं घातलेला चरखारीच्या लढाईचा निर्देश इंग्रजी इतिहासावरून निराधार दिसतो. चरखारीच्या राजावर तात्या टोपे यानें चढाई केल्यामुळें झांशीवर जाण्याऐवजीं ह्यू रोजनें चरखारीकडे वळावें असा त्याला वरिष्ठांचा हुकूम आला होता; पण झांशीला वेढा घातला कीं, तें शहर सोडविण्याकरितां तात्याला चरखारीचा नाद टाकावा लागेल; असा अंदाज करून ह्यू रोजनें झांशीचा रोख कायम राखला व त्याचा अंदाज खरा ठरला. 'प्रवास' लेखक राणीसाहेबांची भेट घडली तेव्हां काल्पीपासून फार अंतरावर नसल्यामुळें ही गलौलीची लढाई समजावी लागते. झांशीच्या हकीकतींत बाणपूर नांवाच्या एका संस्थानाचा संदर्भ आहे. झांशीकडे जातांना बाणपुराच्या राजाचा पहिल्यांदा ह्यू रोजनें पराभव केला व झांशी जिंकल्यावर त्याच्या एका तुकडीनें पुनः एकदां त्या राजाला हरविलें. झांशीच्या रक्षणाला त्याच्या पराक्रमाचा कांहीं उपयोग झाला नाहीं.

काल्पींतून पळ काढल्यावर 'प्रवास' लेखक ब्रह्मावर्ताची वाट चालूं लागला. ब्रह्मावर्तास राहून चित्रकूटास पेशव्यांकडून प्राप्ति होण्याच्या आशेनें तेथें गेला. परंतु त्याची आशा सफळ झाली नाहीं. कारण तेथील पेशवेमंडळींवर इंग्रजांची धाड त्याच वेळीं आली. चित्रकूटास इंग्रजी लष्कर ६ जून १८५८ रोजीं गेलें व त्यानें तेथें पेशव्यांना ताब्यांत घेऊन केलेल्या यथेच्छ लुटीचा इंग्रजी इतिहास पहातां २३ मे ( काल्पी ) ते ६ जून ( चित्रकूट ) अशा एका पंधरवड्यांत लेखकानें खिरगाडेश्वर व ब्रह्मावर्त येथील वास्तव्य संपवून चित्रकूट गांठलें अर्थात् खूपच मजल मारली, असा हिशोब निघतो. चित्रकूटाहून बांदा शहरीं जात असतां 'प्रवास' लेखकावर चुलत्याच्या उन्हाळी दुखण्याचा भयंकर प्रसंग ओढवला. त्यांतून सुटका होते न होते तोंच बंडवाल्यांच्या शोधांत फिरणाऱ्या इंग्रजी शिपायांच्या तावडींत तो सांपडला. त्यांच्या हातून बचावून तो जालवणास आला. आणि जालवणाहून तो बांद्यास पोंचला. बांद्यास दहा दिवस त्याची वस्ती होती. नंतर त्यानें ब्रह्मावर्ताची वाट धरली, ती चोरांनीं नागविल्यामुळें ग्वालेरकडे वळून लेखकानें ग्वालेर

गांठण्याचें मनांत आणलें. परंतु बुंदेलखंडांतील सूर्ययंत्रनामक क्षेत्रानें लेखकास आपल्याकडे ओढून नेल्यामुळें ग्वालेर एकीकडेच राहून तो बंडवाल्यांच्या फौजेंत मिसळला व त्याला त्या फौजेबरोबर राजपुतान्यांत फिरण्याची पाळी आली.

बंडवाल्यांच्या प्रस्तुत साहचर्याची माहिती सांगतांना लेखकानें कालमानाचा बराच गोंधळ केला आहे. मे महिन्याच्या २३ तारखेस काल्पीस मोड झाल्यावर तात्या, रावसाहेब पेशवे आणि झांशीच्या राणीसाहेब या तिघांनीं ग्वालेरवर दौड केली. १ जून १८५८ रोजीं शिंद्यांची फौज लढेना म्हणून शिंद्यांना आंग्र्यांच्या आश्रयास जावें लागलें. बंडवाल्यांनीं ग्वालेर शहर ताब्यांत घेऊन नानासाहेबांच्या नांवानें द्वाही पुकारली. अवघ्या पंधरा दिवसांत ह्यू रोज ग्वालेरला येऊन धडकला. ता. १७ जून रोजीं मुरारची छावणी मारून त्याच्या लष्करानें कोटाकी सराई नामक जागीं बंडवाल्यांना मोडून काढलें. याच लढाईंत झांशीच्या राणीसाहेबांचा शेवट झाला. १९ जून रोजीं बंडवाल्यांनीं ग्वालेर शहरांतून पाय काढला. ता. २० रोजीं किल्लाहि पडला व त्याच दिवशीं शिंद्यांनीं इंग्रज लष्कराची सलामी घेत व ग्वालेरच्या रहिवाशांनीं चालविलेला जयघोष ऐकत ग्वालेर शहरांत प्रवेश केला. यानंतर तात्या व रावसाहेब यांनीं इकडे तिकडे भटकावें आणि इंग्रजांनीं त्यांच्या मागें पाठलाग करित फिरावें असा प्रकार सुरूं असल्यानें रावसाहेबांच्या सैन्यांत ‘ प्रवास ’ लेखक ऑगस्टच्या मध्यांत मिसळला असल्याचा संभव दिसतो. बुंदी कोट्याच्या भागांत तात्यांची फौज या सुमारास घुसली होती. त्यापूर्वीं त्या फौजेनें एका प्रख्यात क्षेत्राचें दर्शन घेतल्याची हकीकत इंग्रजी इतिहासांत सांपडते. तें क्षेत्र व लेखकाचें सूर्ययंत्र हीं एकच होत असें वाटतें. यामुळें जयपूर व इतर संस्थानांकडून तात्यानें खंडणी मिळाविली, तेव्हां लेखक त्यांच्याबरोबर होता ( पान १२१ ) ही माहिती निराधार समजणें भाग आहे. ग्वालेर-नजीक पराभव झाल्यावर तात्यानें आपले हस्तक जयपूरवाल्याकडे जून अखेरीस रवाना केले; त्या वेळीं ‘ प्रवास ’ लेखक चित्रकूट ते बांदा या दर-म्यानच्या प्रदेशांत वाटचाल करीत होता. यासाठीं ऑगस्टांत ह्याची व बंड-वाल्यांची गांठ पडली असावी हा तर्क स्वीकारावा लागतो. कोट्याच्या मुलखांतील झालरापाटनची तात्यानें लूट केली, कोटयाची नव्हे अशी लेखकाच्या

चुकीची दुरुस्ती कै. चिंतामणरावांनीं एका टीपेंत केलेलीच आहे. (पान १२१ )या लुटीपूर्वींच लेखकानें त्या सैन्याचा आश्रय सोडला होता. नंतर तो ब्रह्मावर्तास गेला. १८५८ चा नोव्हेंबर महिना लेखकानें ब्रह्मावर्तास घालविला.

यानंतर वेलसिया येथील तुळा पुरुषाच्या समारंभांत भाग घेऊन ( हा समारंभ मार्गशीर्ष अमावास्येस म्हणजे ता. ४ जानेवारी १८५९ रोजीं व्हावयाचा होता. ) कानपूर, लखनौ, अयोध्या असा प्रवास लेखकानें केला. रामनवमीस ( ११ एप्रिल १८५९ ) त्यानें रामदर्शन घेतलें. अयोध्येहून काशी, प्रयाग हीं तीर्थें आटोपून आषाढ शुद्ध ५ चे दिवशीं ( ५ जुलै १८५९ त्यानें प्रयागचा निरोप घेतला त्यापूर्वीं विंध्यवासिनीचें क्षेत्र नजीक म्हणून तेथें जाऊन 'प्रवास' कर्ता परत आला. पुढें ब्रह्मावर्त,ग्वालेर, (ग्वालेरहून पुनः झांशी, तेथून सागर, मग नर्मदातीरी शांडिल्याश्रम, हुशंगाबाद वगैरे माहिती मूळ प्रतींत असून वैद्यांनीं ती गाळली आहे.) इंदूर, याप्रमाणें मुक्काम करीत हिंवाळ्यामध्यें तो नाशकास पोंचला. मार्गांत त्यानें सप्तशृंगीदेवीचें दर्शन साधलें होतें. नाशकास गेल्यावर त्र्यंबकेश्वराची फेरी अवश्यच होती. ती उरकल्यावर नाशकाहून पुणें व तेथून स्वतःचा गांव, अशा रीतीनें त्यानें आपला प्रवास शेवटास नेला. हुशंगाबादेस तो आश्विन शुद्धांत म्हणजे १८५९ आक्टोबरअखेरच्या आठवड्यांत होता. तेथून इंदूर, नाशिक वगैरे ठिकाणचा प्रवास झाला, याप्रमाणें एकंदर कालमर्यादा विचारांत घेतां १८६० च्या प्रारंभीं म्हणजे जवळ जवळ तीन वर्षांनीं तो घरीं आला, असा निष्कर्ष निघतो.

## बंडाचा वृत्तान्त

आतां या पुस्तकांत दिलेल्या बंडाच्या हकीकतींतील सत्यासत्यतेची कल्पना येण्यासाठीं बंडाच्या इतिहासांत शिरल्याशिवाय गत्यंतर नाहीं. बंडाचा १८५७ च्या मे १० तारखेस मीरत येथें पहिला स्फोट झाला व साधारणपणें १० जूनपर्यंत उत्तरेकडील बहुतेक सारीं लष्करी ठाणीं भडकलीं. १४ जूनच्या रात्रीस ग्वालेरच्या इंग्रजी लष्करानें इतर ठिकाणचा कित्ता गिरविला. कत्तलींतून वांचलेले इंग्रज आग्रा किल्ल्याच्या आश्रयास गेले. पुढें सप्टेंबरअखेरपर्यंत ग्वालेरच्या महाराजांनी या फौजेला तेथेंच थोपवून

घरण्याचें काम करेंवसें चालविलें होतें, पण सप्टेंबरांत इंग्रजांनीं दिल्ली काबीज केल्याची वार्ता कानीं पडल्यावर या लष्कराची अस्वस्थता कमालीची वाढली; इतक्यांत तात्या टोपे त्यास पुढारी मिळाला व त्यानें ग्वालेरचें लष्कर कानपुरास नेलें.

तिकडे लखनौस बंड उठल्यावर कानपुरास त्याची झळ चटकन् पोंचली. इंग्रजांना आपण धोक्यांत असल्याची खात्री झाल्यावरोवर त्यांनीं नानासाहेब पेशव्याला वळवून आपला खजीना त्याच्या हवालीं केला. (२५ मे १८५७) जून ४ ला कानपूरच्या फौजेनें इंग्रजांचें वर्चस्व झुगारून ता. ५ रोजीं दिल्लीच्या रोखानें चाल आरंभली; परंतु नानासाहेबानें ती फौज माघारीं फिरविली. इंग्रजांनीं लढ्यासाठीं तयार केलेल्या ठाण्यावर ता. ५ जून ते २५ जून इतके दिवस झुंज चालू राहिली. शेवटीं नानासाहेबानें लढणाऱ्या इंग्रजांना अलाहाबादेस सुरक्षित पोंचविण्याचें आश्वासन देऊन त्यांस ठाण्याबाहेर काढलें. आणि ता. २७ रोजीं ते अलाहाबादेकडे जाणाऱ्या नावांत बसण्याकरितां गंगेच्या किनारीं आले असतां बंडवाल्यांनीं त्यांची कत्तल उडविली. त्यापूर्वीं ता. १२ जून रोजीं नावेनें कानपुरास येणाऱ्या इंग्रजांची बंडवाल्यांनीं अशीच वाट लाविली होती. कत्तलींत वांचलेल्या इंग्रज बायकांमुलांना एका घरांत आणखी सुमारें वीस दिवस अडकवून बंडवाल्यांनीं जिवंत ठेवलें होतें. ता. ३० जून रोजीं नानासाहेबानें पेशवेपद धारण केल्याचा मोठा समारंभ साजरा झाला. ता. ५ जुलै रोजीं नाना बिठूरा–( ब्रह्मावर्ता ) हून कानपुरास आला. पेशवेपदाचा उपभोग त्यानें एक पंधरवडा घेतला. कारण ता. १५ जुलैला बंडवाल्यांना मागें रेटीत इंग्रज सेनापति हेवलॉक हा कानपुरानजीक आला. ता. १६ रोजीं कानपुरास अटकेंतील इंग्रज बायकामुलांची कत्तल करण्यांत आली व ता. १७ ला हेवलॉकनें कानपूर पादाक्रांत केलें. आपण गंगेंत जलसमाधि घेणार आहों, असें भोंवतीं जमलेल्या लोकांच्या कानीं घालून नानासाहेब ता. १८ जुलैच्या रात्रींस बिठूरहून जवळजवळ कायमचाच नाहींसा झाला. इंग्रजी फौजेला १६ ऑगस्टपर्यंत बिठूरकडे लक्ष देण्याला फावलें नाहीं. हेवलॉकचें लक्ष लखनौंत अडकलेल्या इंग्रजांच्या सुटकेकडे लागलेलें होतें व तिकडे जाण्यासाठीं त्याच्या बंडवाल्यावरोबर अटीतटीच्या झटापटी चाललेल्या होत्या. परंतु हेवलॉकला लखनौस जाणें अशक्य वाटून तो कानपुरास परत

आल्यावर त्यानें १६ ऑगस्टला विठूर येथील बंडवाल्यांचा सडकून समाचार घेतला. यानंतर तात्यानें ग्वालेरच्या फौजेला कानपूरकडे आणलें. नोव्हेंबरच्या उत्तरार्धांत कानपुरास व कानपूरच्या आसपास या लष्कराशीं इंग्रजांच्या साख्या निकराच्या लढाया चाललेल्या होत्या. इंग्रजांच्या हातून कानपूर गेलेंहि होतें, पण नोव्हेंबरच्या २९ तारखेला इंग्रजांचा सरसेनापति कॅम्पबेल कानपुरास आला व त्यानें इंग्रजी फौजेची जुळवाजुळव करून ता. ६ डिसेंबर या दिवशीं बंडवाल्यांवर हल्ला चढवून त्यांना पळवून लावलें. यानंतर पुनः बंडवाल्यांचा उपसर्ग कानपुरास झाला नाहीं. कॅम्पबेल यानें लखनौ जिंकण्याचा उद्योग आरंभला व १८५८ च्या मार्च अखेरीस लखनौ पूर्णपणें जिंकून बंडवाल्याच्या या उरलेल्या एका प्रमुख केंद्राचा धुव्वा उडविला. लखनौच्या या स्वारींत नेपाळच्या जंगबहादुराची इंग्रजांना मोठी मदत मिळाली.

झांशीकडील बंडाचा वृत्तांत यासारखाच आहे. झांशी संस्थान १८५४ सालीं इंग्रजांनीं खालसा केलें. राणीसाहेबांना सालीना ६००० पौंड पेन्शन देण्यांत येऊं लागलें. त्यांतूनच पूर्वींच्या कर्जाची फेड झाली पाहिजे, असा आग्रह इंग्रजांनीं अंमलांत आणला. झांशींत गोवध सुरूं झाला व इंग्रजांनीं देवस्थानांचीं इनामें जप्त केलीं, याविरुद्ध राणीसाहेबांनीं जोराचें गाऱ्हाणें इंग्रजांकडे गाइलें, पण त्याची दाद मुळींच घेतली गेली नाहीं. याशिवाय राणीसाहेबांच्या नित्यनैमित्तिक व्यवहारांत इंग्रज अडथळा करीत होतेच. राणीसाहेबांच्या अंतरंगांत इंग्रजांबद्दल या सर्व प्रकारामुळें द्वेष वाटावा यांत आश्चर्य नाहीं. १८५७ मध्यें इंग्रजांविरुद्ध त्यांच्या देशी लष्करानें उठावणी केली तेव्हां साहजिकच ही सूड उगविण्याची संधि आहे अशी खूणगांठ राणीसाहेबांनीं आपल्या मनाशीं बांधली. प्रथम त्यांनीं स्वसंरक्षणार्थ शिपाई पदरीं बाळगण्याची परवानगी इंग्रज अधिकाऱ्यापासून घेतली. त्याबरोबरच संस्थान खालसा झालें तेव्हां जमिनींत गाडून लपविलेल्या तोफा गुप्त रीतीनें या वेळीं बाहेर काढण्यांत आल्या. ता. ५ जून रोजीं झांशीच्या लष्करानें आपल्या छावणींतील किल्ला व खजीना हस्तगत केला ! ता. ६ रोजीं राणीसाहेब आपल्या नव्या सैनिकांच्या लवाजम्यानिशीं छावणीमध्यें गेल्या. त्यांची स्वारी शहराबाहेर निघतांच एका मुसलमान मुल्लानें प्रार्थनेची हांक ठोकली व त्या हाकेच्या खुणेसरशीं लष्करानें बंड पुकारलें. आदल्या दिवसाच्या अनुभवानें

पुष्कळ इंग्रज झांशीच्या मोठ्या किल्ल्यांत जाऊन राहिले होते. त्यांच्यावर बंडवाल्यांनीं हल्ला करून पाहिला, पण त्याविरुद्ध मात्रा चालत नाहीं असें पाहून राणीसाहेबांच्या नांवानें किल्ला मोकळा केल्यास इंग्रजांचें संरक्षण केलें जाईल अशा अटीची शिपायांतर्फे वाटाघाट सुरू झाली. इंग्रजांनीं ही अट मान्य केली व ते बायकामुलांसह किल्ल्यांतून बाहेर पडले. तावड-तोब त्यांना बंडवाल्यांनीं पकडलें व एका बागेंत नेऊन त्या सर्वांचा एकजात निःपात उडविला. आधीं एकदां इंग्रजांतर्फे असें बोलणें झालें असतां राणीसाहेबांनीं ' इंग्रजांचें मी कांहीं लागत नाहीं ' असा जबाब दिला होता. साऱ्या इंग्रजांना ठार मारल्यावर राणीसाहेब व बंडवाले यांच्यांत कांहीं करारमदार होऊन राणीसाहेबांचें राज्य सुरू झालें. राणी साहेबांनीं टांकसाळ चालविली. नव्या तोफा ओतल्या. लढाऊ ठाण्यांची मजबुती केली व रोजच्या राज्यकारभारांत उत्साहानें श्रमाकडे न पाहतां राणीसाहेब भाग घेऊं लागल्या; यामुळें लोकांच्या अंतःकरणांत त्यांच्या-विषयीं प्रेम उत्पन्न झालें.

इंग्रजी इतिहासाच्या आधारें वर दिलेल्या तारीखवार माहितीशीं ' प्रवास ' कारानें सांगितलेल्या हकीकतीचा मेळ घालून पाहिल्यास त्याच्या आठवणींतील दोष गळीं उतरण्याला उशीर लागणार नाहीं. ' प्रवास ' कार १८५७ आक्टोबर २३ पर्यंतच ग्वालेरला होता. ग्वालेर सोडल्यावर त्याला तावडतोब ब्रह्मावर्ताकडून पळून आलेल्यांच्या तोंडून ऐकलेल्या गोष्टींत नोव्हें-बरच्या उत्तरार्धांतील कानपूरच्या धुमश्चक्रीचें वर्तमान कळणें शक्य नसतांहि तें त्यानें झांशीच्या वाटेवर कळलेल्या हकीकतींतच सादर केलें आहे; एवढेंच नव्हे तर तो स्वतः झांशीच्या वेढ्यांत सांपडल्याच्या काळांतली ( १८५८ मार्च ) लखनौ इंग्रजांनीं जिंकल्याची कथाहि त्यानें झांशीच्या वाटेवर आपणाला समजली असें कौतुक निर्माण केलें आहे. झांशीच्या वस्तींत त्यानें ज्या बातम्या ऐकल्या त्या सुद्धां त्यानें आधींच्या मुक्कामांतच गुंडाळून टाकल्या आहेत ! कालांतरानें सादृश्यामुळें निरनिराळ्या गोष्टी कशा एकमेकांत मिसळून जातात, याचा अंदाज करण्याला हें उदाहरण उपयोगी आहे. लखनौच्या प्रकरणांत नेपाळी जंगबहादुर प्रथम अयोध्येच्या बेगमेला मदत करीत होता व नंतर त्याला इंग्रजांनीं आपल्याकडे वळविलें वगैरे विधानें इतिहासाला सोडून असल्याचें सहज कळणारें आहे. झांशी शहरांत राणीचें

राज्य सुरूं झाल्यावर ' अकरा महिने उत्तर हिंदुस्थानांत इंग्रज बिलकूल नव्हता. ' हें विधानहि अशाच तऱ्हेचें आहे.

## मूळ प्रतीची ओळख व तुलना

कै. चिंतामणराव वैद्यांनीं ज्या लिखाणाला ' माझा प्रवास ' अथवा ' सन १८५७ च्या बंडाची हकीकत ' असें नांव देऊन प्रसिद्धीस आणलें, त्याची नक्कल पुण्याच्या भारत इतिहास संशोधक मंडळाच्या संग्रहांत आहे. तिच्याशीं छापील प्रत ताडून पहातां विचार करण्यासारखा बराच भाग आढळतो.

" मूळ ग्रंथांत मीं फार थोडा बदल केला आहे. कोठें कोठें भाषा सुधारली असून अलीकडच्या रीतीनें लिहिली आहे व कांहीं ठिकाणीं मजकूर अधिक वाटला तो कमी केला आहे. एकंदरीनें बहुतेक सर्व ग्रंथ मूळचाच आहे, असें म्हटलें तरी चालेल. दोनच ठिकाणीं मी आपल्याकडून दहापांच वाक्यें जास्त घातलीं आहेत, तींहि मूळच्या ग्रंथाला अनुसरून आहेत." चिंतामणरावांनीं याप्रमाणें आपल्या वतीनें पुस्तकांतील फेरफाराबद्दल खुलासा केला असला तरी मुद्रिताची व हस्तलिखिताची तुलना केल्यास चिंतामणरावांचें हस्तलिखित भा. इ. सं. मंडळाच्या हस्तलिखिताहून बऱ्याचशा मजकुराच्या दृष्टीनें निराळें तरी असलें पाहिजे किंवा त्या गाळ-घालीचे फेरफार त्यांनीं मनसोक्त केले असले पाहिजेत असें अनुमान करावें लागतें. कै. वैद्यांचें व भा. इ. सं. मंडळाचें हस्तलिखित जर एकच असेल तर त्यांनीं कांहीं ठिकाणीं पाल्हाळ, पुनरुक्ति, विसंगति वगैरे दोष टाळण्यासाठीं जे फेरबदल केले आहेत, ते योग्यच म्हणावे लागतील. छापील प्रतींत गाळलेला मजकूर परिशिष्टांत दाखविला आहे, त्यावरून दोन तर्क संभवतात. वैद्यांची प्रत निराळी असल्यास तिच्यांत तो मजकूर अजीबाद नसावा हा एक तर्क; प्रत्यक्ष बंडाच्या माहितीशी त्याचा तितकासा संबंध नसल्यामुळें किंवा त्यांना तो महत्त्वाचा न वाटल्यामुळें त्यांनीं तो गाळला असावा, हा दुसरा तर्क करावा लागतो. गोडसे यांचा प्रवासवृत्तांत वैद्यांनीं बंडाच्या दृष्टीनें महत्त्व दिलें असल्यामुळें दुसऱ्या तर्काला अवकाश आहे.

हस्तलिखितावरून लेखकाच्या मनासमोर मजकूर जुळविण्यासंबंधीं कांहीं धोरण असल्याचें स्पष्ट कळणारें आहे. कित्येक स्थळीं आतां ' हा भाग येथेंच पुरा करूं, कारण पुढची माहिती निराळी, स्वतंत्र व पुष्कळ आहे ' असें त्यानें म्हटलेलें कै. चिंतामणरावांनीं प्रकरणाचा अनुक्रम मूळचा ठेवलेला

नसून मथळे व त्याखालचे श्लोक त्यांनीं आपल्या पदरचे घातलेले आहेत. क्वचित् अशीं सुभाषितें मजकुरांतही घातलेलीं आहेत. त्यायोगानें मूळच्या लेखनाची गोडी वाढली असली तरी ते फेरबदल होत, असेंच म्हटलें पाहिजे.

वरसईकर गोडसे यांनीं जो विषयानुक्रम ठरविला होता, त्यांत कालाची आणि विषयाची संगति नीटशी नाहीं. उदाहरणार्थ, झांशीच्या गंगाधर-रावाच्या प्रकृतीचा व कामगिरीचा आढावा त्यांनीं कानपूर ग्वालेरकडील बंडाच्या धामधुमीचें वर्णन करतांना प्रथम दिलेला आहे. झांशीस जावें, असा बेत बोलला जात असतां गोडसे यांच्या चुलत्यानें झांशीची जी माहिती सांगितली ती त्यांनीं झांशीस जाण्याच्या आधींच लेखनांत दाखल केलेली आहे. चिंतामणरावांनीं तिच्यांतलि, त्यांना अनवश्यक किंवा अनुचित वाटला तो अंश काढून टाकून पुढें झांशीच्या प्रकरणांत आणलेला आहे. लेखक उत्तम स्मरणशक्तीचा खरा, पण तो आपला प्रवास होऊन गेल्यावर २४ वर्षांनीं लिहिण्याला बसला, शिवाय भिक्षुक, म्हणजे लेखनाला जी विषयानुसंधानाची जाणिव आणि शिस्त लागते, तिचा अभ्यास नसलेला, या गोष्टी विसरून चालणार नाहींत. हस्तलिखितामधील एका ठिकाणच्या निर्देशावरून तो प्रवासांतील कित्येक विशेष अनुभवांचीं टिपणें जेव्हांचीं तेव्हां करून ठेवणारा होता असेंहि दिसतें. त्याला वस्तुस्थिति जशीच्या तशी कळावी, अशी तीव्र आकांक्षा होती, याबद्दल हस्तलिखितांत प्रमाण आहे. एकदां त्याच्या काकाच्या ओळखीचे इसम भेटले व ते बंडवाल्यांची हकीकत सांगूं लागले तेव्हां 'जें काय खरें व निश्चित माहीत असेल तें सांगा; उगीच गप्पा मारूं नका' असें लेखकानें त्यांना बजावतांच 'हे इसम प्रामाणिक आहेत, खोटें बोलणारे नाहींत,' असा काकानें जोराचा निर्वाळा दिल्याचें लेखकानें नमूद केलेलें आहे. परंतु लेखनास बसण्यापूर्वीं कालावधि बराच लोटलेला होता, प्रवासांतलीं सारीं टिपणें त्याजवळ या कालावधींत राहिलीं होतीं, असें समजतां येत नाहीं; याशिवाय त्याला जे सांगणारे भेटले तेहि थोड्या-फार प्रमाणांत ऐकणारेच होते, ती ती घटना प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिलेले व अनुभवलेले असे ते सारेच लोक होते, असें मानण्याला जागा नाहीं; अशा गोष्टी लक्षांत घेतल्यास त्याच्या लेखनांतील विविध दोषांचा उलगडा होतो. असे दोष झांशीच्या हकीकतींत मात्र फारसे सांपडत नाहींत, तरी सुद्धां लिहितां लिहितां जें ध्यानांत येईल तें तेथेंच लिहून टाकावयाचें, या

प्रकारामुळें विसंगति पुष्कळ ठिकाणीं उत्पन्न झाली असून ती चिंतामणरावांनीं बऱ्याच यशस्वी रीतीनें काढून टाकलेली आहे. लेखकाच्या कठोर स्पष्टवक्ते-पणाला त्यांनीं मूळचा आशय कायम राखून मऊपणा आणलेला आहे, किंवा निराळें रूप दिलें आहे.

वैद्यांच्या पुस्तकांतील झांशी प्रकरणाची हस्तलिखिताच्या प्रकाशांत झडती घेऊं लागल्यास त्यांत किती मजकूर त्यांनीं गाळला, याचा पत्ता परिशिष्टावरून जिज्ञासूंना लागेल. पण तेवढ्यानें भागत नाहीं. त्यांनीं जो निराळा मजकूर घातला आहे तो सुद्धां थोडाथोडका नाहीं. पुस्तकांत पान ५७ वर झांशी-वालीच्या दासींची माहिती आहे. ती भा. इ. सं. मंडळाच्या हस्तलिखितांत नाहीं. त्यामध्यें 'बाईसाहेबांना शिकारीचा शोक फार होता....स्वतंत्रता जरी होती तरी बाईनें गैरशिस्त आचरण केलें नाहीं. शिकारीचे शोकामुळें गैरवाजवी वागणूक होत नसे ( किं असें ! ) हें खरें आहे ' असा मजकूर आहे, तो वैद्यांनीं सोडला आहे. वैद्यांच्या फेरबदलाची कल्पना येण्याकरितां त्यांच्या पुस्तकांतले व हस्तलिखितामधले असे उतारे एकत्र दाखविणें उचित होईल.

पान ७४ मध्यें इंग्रज गवताच्या भाऱ्याआडून शहरच्या तटाकडे जात असल्याची हकीकत आहे. ती अशी:—

' आम्ही सहावे मजल्यावर जाऊन पाहूं लागलों; त्यावेळेस सकाळचें अंधुक अंधुक दिसूं लागलें होतें. हजारों मजूर लोक गवताचे भारे डोक्यावर घेऊन शहरच्या तटाकडे येत आहेत व त्या भाऱ्यांच्या आश्रयानें मागें बाजूनें गोरे शिपाई चालत आहेत असें दृष्टीस पडलें. पाहतां पाहतां गवताचे भारेवाले तटापर्यंत येऊन पोंचले. भारेवाल्यांनीं तटापाशीं येऊन भराभर डोकीवरचे भारे एकावर एक टाकून तटापाशीं जिन्यासारखी वाट रचली, त्याजवरून झराझर गोरे शिपाई तटावर चढले. तटावर बाई-साहेबांनीं जे शिपाई ठेवले होते त्यांपैकीं कांहींनीं पळ काढला, कांहीं शूर होते त्यांनीं गोरे शिपायांस हरकत केली; परंतु ते थोडे असल्यामुळें कापले गेले आणि दहा बारा मिनिटांच्या आंत हजारों गोरे लोक शहरच्या दक्षिण तटावर दिसूं लागले. '

हस्तलिखितांत हा मजकूर पुढीलप्रमाणें आहे:—' आम्ही व सरकारी गांवांत शिरलें. तेथें कोणी राहिले नाहीं असें पाहून बाईसाहेबांनीं पाहून

लोक सहावे मजल्यावर होतों ते तिसऱ्या मजल्यावर येऊन पाहूं लागलों तों इंग्रज सरकारनें मजूर वगैरे मनुष्यांचे डोक्यावर गवताचे भारे पाण्यानें भिजवून देऊन तीं मनुष्यें एकंदर तीन हजारांपासून चार हजार असावीं. गवताचे भारेवाले लोक पुढें घालून त्यामागें वाजूंनीं वगैरे गोरे लोक कडामिनी बंदुका घेऊन एकदम हल्ला करीत करीत शहराचे तटापर्यंत पोंचले. गवताचे भारे तटानजीक एकेकावर एक ठेवून वरपर्यंत जिन्यासारख्या वाटा करून हजारों गोरे लोक शहरचे तटावर दिसूं लागले तेव्हां त्या बाजूवरचे शिपाई लोक सर्व भयाकुर होऊन हत्यारें टाकून विलायती लोक म्हणजे मुसलमान अरबांसारखे नोकर बहुत दिवसांचे होते ते सुमार दीड हजार तरवारबंद बरावर घेऊन किल्ल्यांतून खालीं उतरले. पंधराशें विलायती लोक घेऊन खालच्या मोठ्या दरवाज्यांतून बाहेर मैदानांत जाऊन दक्षिणेकडे वळतात तों तिकडून हजारों गोरे लोक आले. त्यांच्याही तरवारी मेणांतून काढून नागव्याच होत्या व विलायती लोकांच्या तरवारीही नागव्या हातांतून होत्या. बाईसाहेबांनीं तरवार नागवी हातांत घेऊन शूरत्वाचे आवेशानें सर्वांमागें चालत असतां सर्वांचे मध्यभागीं स्फुरण येऊन गेल्या. ते समयीं शुद्ध भारतीय युद्धाचीच उपमा देण्यास उपयोग आहे. तरवारींचा चकचकाट एक क्षणभर पडला. गोरे लोक व विलायती लोक एकत्र होतांच पन्नास अंकही मोजण्यास उशीर लागेल इतक्या अवकाशांत तरवार उभयतांची चालली तों गोरे लोक भयाकुर होऊन शहरांत पूर्वेस रस्ते गेलेले त्यांत आपला जीव बचावण्याकरितां शिरले आणि तेथून कडामिनींच्या गोळ्या घालूं लागले; तेव्हां विलायती लोकांचा उपाय नाहींसा जाहला. ”

या दोन उताऱ्यांतील फरक वाचकांच्या लक्षांत येईलच; पण तो जास्त स्पष्ट होण्यासाठीं वैद्यांनीं अरब इंग्रजांच्या झटापटीला जें रूप दिलें आहे तें पहाणें अवश्य आहे. तें रूप पुस्तकाच्या ७४–७५ पानावर आहे.'

‘ प्रथम बाईसाहेबास हकीकत समजली त्यावेळेस सहस्र विंचू चावल्याप्रमाणें एकदम दुःख झालें. त्यांच्या तोंडावरचें पाणी पळालें. अक्कल गुंग झाली, आतां झोप घेण्यापूर्वीं बातमी ऐकिली काय, आणि या बातमीचा अर्थ काय, अशा भीति, दुःख, आश्चर्य यांच्या घोटाळ्यांत पडून पुढें काय करावें याचा विचार न सुचतां काय करावें हेंही न सुचून बाहेर येऊन दक्षिण बाजूकडे

पाहतात तों हजारों गोरे शिपाई तटावर दृष्टीस पडले. बाईसाहेब आम्हां भटाभिक्षुकांसारख्या नादान नव्हत्या. अक्कल गुंग व भीति यांचा क्षणभर पगडा पडला होता तो दूर होऊन बाईसाहेबास शूरत्वाचा आवेश चढला व विलायती—म्हणजे मुसलमान अरबांसारखे—बहुत दिवसांचे नोकर सुमारें दीड हजार तरवारबंद होते ते बरोबर घेऊन स्वतः तावडतोब हत्यारबंद होऊन किल्ल्याचे खालीं उतरल्या व मोठ्या दरवाजांतून बाहेर पडून दक्षिण बाजूकडे वळल्या. शहरचे दक्षिण तटावरून आंत उतरून हजारों गोरे आंत आले; त्यांच्याही तरवारी म्यानांतून बाहेर पडल्या होत्या. बाईसाहेब सर्वांचे मागें चालत असतां आवेशानें हातांत नागवी तरवार घेऊन सर्वांचे मध्यभागीं गेल्या. गोरे लोकांची व विलायती लोकांची गांठ पडतांच एकदम तरवारीचा चकचकाट होऊन लोक एकमेकांत मिसळून गेले. त्या वेळेचे युद्धास भारती युद्धाचीच उपमा साजेल. उभयतांची पांच पन्नास अंक मोजण्यासही उशीर लागेल इतके अवकाशांत तरवार चालली व शेंकडों गोरा कापून काढला गेला. बाकी राहिले ते शहराकडे पळून जाऊन झाडांच्या व घरांच्या आडून बंदुकींचे बार काढूं लागले. मागूनही दुसरे गोरे येतच होते तेही तरवार न चालवितां दुरून बंदुकींच्या गोळ्या घालूं लागले.

'इकडे शहरांत गोरे लोक पुरुष मात्र जितका आढळत चालला तितका कडामिनी बंदुकीच्या गोळ्या घालून मारूं लागले. आणि शहरास ( आग ) लाविली ती प्रथम हलवाईपुरा पेठेंतून दिल्ही. आणि बीजन करण्याचें काम सुरू केलें. पांच वर्षांचे वयापलीकडे ऐंशी वर्षांचे आंत मात्र शोधून शोधून मारण्यास आरंभ केला. ते समयीं शहरावर जे लोक बाईसाहेबाकडील लढवई लोक होते ते सर्व पळून शहरांत आले आणि घरोघर जाऊन जीवभीतीनें कोणी न्हावी पाहून मिशा, दाढी मोठ मोठे कल्ले वस्तऱ्यानें काढून टाकून, गोपीचंदनाचे टिळे लावून गळ्यांत तुळशीच्या काष्ठांची व रुद्राक्षाच्या माळा ( घालून ) बसले. ज्यास न्हावी सांपडला नाहीं, त्यांणीं कातर घेऊन केश दाढीचे वगैरे मिशा कातरून साधु होऊन कैएक लोक बसले.'

हस्तलिखितांतील वरच्या मजकुराला वैद्यांनीं दिलेलें रूप अगदीं निराळें आहे. ( पान ७५ ) 'इकडे गोरे लोक चोहीं दरवाजांतून आंत शिरले ते

बीजन करीत चालले. जितका ५ वर्षांवर व ८० वर्षांचे आंत पुरुष दिसत चालला तितका गोळीनें अगर तलवारीनें मारीत चालले व एकीकडून शहरास आग लावून दिली. ती प्रथम हलवाईपुऱ्यास लाविली. ह्या वेळेस शहरांत दुःखाचा जो कल्लोळ उसळून गेला त्यास पारावार नाहीं. मेंढरांच्या कळपांत लांडग्यांनीं उडी घालतांच जशी त्या प्राण्यांची स्थिति होते त्या प्रमाणें लोक भयानें आतुर होऊन जिकडे तिकडे सैरावैरा पळूं लागले. कांहीं पळतां पळतां मुडदे होऊन खालीं गळूं लागले. कोणी या गल्लींत शीर, कोणी घरांत अडचणींत लप, कोणी दाढी-मिशा उतरून स्त्रीचा वेश धारण करून बस, कोणी शेतखान्यांत जाऊन लप, याप्रमाणें जशी ज्यास जीव बचावण्याची युक्ति सुचली तसें तो करूं लागला. ''

आणखी दोन उतारे तुलनेसाठीं येथें सादर केल्यास वैद्यांचें मुद्रित व गोडशांचें हस्तलिखित यांतील भेदाविषयीं संशय रहाणार नाहीं. मुद्रितांत पान ६५ वर सर ह्यू रोज व झांशीवाली यांच्यांत लढाईपूर्वीं झालेल्या पत्रव्यवहाराची हकीकत आहे. इंग्रजांच्या पत्रांत आठ आसामीसह बाईसाहेबांनीं हत्याराशिवाय आपल्या भेटीस यावें असा मजकूर होता व भेटीची मुदत दोन दिवसांची दिलेली होती. मुदतीबद्दल ' या भेटीस मुदत दोन तारखांची होती' असे शब्द मुळांत आहेत. वैद्यांनीं याबद्दल ' दोन दिवस' असे शब्द दिले आहेत. हस्तलिखितांत बाईच्या उत्तराचा मजकूर असा आहेः—' हें संस्थान व कांहीं दुसरा मुलूख मेहरबान गार्दनसाहेब यांनीं त्यासंबंधीं दस्तरहि स्वाधीन केलें; सबब मुलखाचे बंदोबस्ताकरितां थोडीबहूत फौज ठेवावी लागली व नवीन दारूगोळाहि करावा लागला व कांहीं पांच चार तोफाहि नव्या केल्या. सरकारबराबर आम्ही लढाई करणार हें आमचे संस्थानी लोकांचे मनांत सुद्धां नाहीं व आपल्यास कोणी काय समजाविलें असेल तें असो. इत्यादि. '

' झांशीस लढाई द्यावयाची हा निश्चय अगोदर झालाच होता ' अशी प्रस्तावना जोडून हस्तलिखितांत नसलेला ' भेटीस कशास बोलाविलें आहे, दगा होईल कीं काय ' वगैरे मजकूर वैद्यांनीं दिलेला आहे. रीतीप्रमाणें हत्यारबंद लोकांसह दिवाणजी भेटतील, मी बायको मनुष्य सबब येऊं शकत नाहीं, वगैरे वाक्यें काय तीं हस्तलिखितांतील आहेत. वरील सारा मजकूर गाळला आहे. गार्दनसाहेबानें दप्तर स्वाधीन केल्याचें बद्दल पान ६१ वर

आलें आहे. याप्रमाणें फार मोठे फेरबदल करूनहि वैद्य ज्या अर्थी ' एकंदरीनें बहुतेक सर्व ग्रंथ मूळचाच आहे असें म्हटलें तरी चालेल ' असें म्हणतात त्या अर्थी त्यांची प्रत निराळी होती कीं काय असा प्रश्न सहजच उपस्थित होतो. वैद्यांच्या मुद्रित प्रतींत सर्वत्र असे फेरफार आहेत. झांशीच्या प्रकरणांत ते जास्त आढळतात. लग्न झाल्यानंतर राणी लक्ष्मीबाईला छळ सोसावा लागल्याचा वृत्तांत ( पान २८ ) वैद्यांची हस्तलिखित प्रत निराळी नसेल तर त्यांचा मनसोक्त समजावा लागतो.

छापील प्रतीच्या तिसऱ्या भागांत बंडवाल्यांच्या हकीकतीचा समावेश आहे. ' ग्वालेरास असतांना बंडाच्या बातम्या दररोज आम्हांस ऐकूं येतच होत्या. ' असा या विभागाचा प्रारंभ आहे. तो प्रारंभ व तो सगळा परिच्छेद हस्तलिखितांत नाहीं. तेथें या विभागाचा प्रारंभ झांशीच्या राणीसाहेबांच्या माहितीनें केलेला आहे. ' प्रवास ' कर्त्याचा चुलता ब्रह्मावर्तास असतांना लक्ष्मीबाईचें बालपण त्यानें पाहिलें होतें. तिचा विवाह गंगाधररावाशीं झाला याची व त्याचप्रमाणें गंगाधररावाच्या प्रकृतीची त्यास बातमी होती. लक्ष्मीबाईचा बाप मोरोपंत तांबे त्या चुलत्याच्या हाताखालीं होमशाळेंत काम करणारा होता, तो झांशींत आहे, झांशीच्या बाजूस बंडवाल्यांची गडबड नाहीं, यामुळें झांशीस जाऊन तांब्याची गांठ घेतली तर कांहीं प्राप्ति होईल, अशा समजुतीनें हे चुलते–पुतणे झांशीकडे निघाले. पुढें झांशीच्या मार्गावर भेटणाऱ्या लोकांच्या तोंडून बंडवाल्यासंबंधानें जें जें कळलें तें तें त्यानें स्मरणावर भिस्त ठेवून लिहून काढलेलें आहे. गंगाधरराव आणि लक्ष्मीबाई यांची हकीकत संपल्यावर ' प्रवास ' कर्ता (हस्तलिखित वही. पान ५४ नक्कल पान ४९) म्हणतो:–' झांशीस जाण्याचे इराद्यानें निघोन चालते झालों. वाटेनें लोक बहोत भेटले. त्याणीं जिकडील तिकडील लढाईच्या गोष्टी सांगितल्या ' ... पुढें कानपुरास मुरारच्या पलटणी लोकांजवळील ' जे तोफेचे गोळे विषारी होते ... तेणेंकरून नानासाहेब पेशवे यास जय आला ' असें सांगून झाल्यावर ' ब्रह्मावर्ताकडील दोन असामी सभ्य चालीचे निःपक्षपाती असें आम्हांस भेटून त्याणीं असें सांगितलें कीं, गेल्या भाद्रपदमासीं ( म्हणजे ऑगस्ट–सप्टेंबर १८५७ ) रा. तात्या टोपी २५ स्वार बराबर घेऊन मुरारीचे पलटणींत येऊन उतरले ... ( शिंदे व त्यांचे दिवाण यांनीं )

तात्या टोपी यास पानसुपारीकरितां शहरांत' आणले 'तें समयीं आम्ही (म्हणजे हे ब्रह्मावर्ताचे ब्राह्मण) ग्वालेरीस होतों. तात्यास समक्ष आम्ही सराफ्यांत म्हणजे मोठे बाजारांत पाहिला. एक प्रहरपर्यंत शहरांत तात्या होता.' नंतर कानपूर लखनौकडील इंग्रजांच्या विजयाचें ऐकलेलें वृत्त संपविल्यावर 'याप्रमाणे च्योहीकडील हवाल आहे, असें ब्रह्मावर्त क्षेत्राकडून चांगले दोन गृहस्थ आले त्याणी हा मजकूर सर्व सांगितला. आम्हीहि मजल दरमजल करीत झांशी शहरापर्यंत गेलों.' (नक्कल पान ८१) असा त्या ब्रह्मावर्ताकडील दोन इसमांचा पुनः उल्लेख आहे. वैद्यांच्या मुद्रितांतील मजकूर वाचीत असतां असा भास होतो कीं, 'प्रवास' कर्त्यानें स्वतः तात्या टोपी यास पाहिलें. 'प्रवास' कर्ता आपल्या माहितीची जबाबदारी मुळांत कोणाची हें दाखविण्याविषयीं काळजी घेत असतां त्याच्या माथीं दुसऱ्याच्या माहितीची जबाबदारी लादली जाण्याजोगा फेरफार दिसला तर त्याचा बारीक विचार केल्याशिवाय गत्यंतर नाहीं व असा विचार करूं लागल्यास वैद्यांच्या पुस्तकाच्या मुळाबरहुकूमपणाबद्दल अतिशय संशय येऊं लागतो. यासाठीं केव्हां तरी मूळ हस्तलिखित जसेंच्या तसें छापलें जाणें आवश्य आहे. तसें झाल्यास वैद्यांचें पुस्तकच सरस ठरेल यांतहि संशय नाहीं.

## मूळ प्रतीची अधिक ओळख

चिंतामणराव वैद्यांनीं विष्णुभटजी गोडसे, वरसईकर यांच्या नांवें छापलेली प्रत व भा. इ. सं. मंडळाला त्यांनीं दिलेली प्रत, या निराळ्या आहेत कीं काय असा संशय मागें प्रदर्शित केला आहे. त्या संशयाचें निरसन करणें अवश्य आहे. दोन प्रती निराळ्या वाटण्याचें कारण मुळांत नसलेल्या मजकुराची घालघुसड व असलेल्या मजकुराची गाळसाळ हें होय. मूळ प्रत व छापील प्रत यामध्यें अनेक स्थळीं विलक्षण तफावत आढळते. विष्णुभटजींच्या ध्यानींमनीं नसलेल्या गोष्टी चिंतामणरावांनीं यथेच्छ दिलेल्या आहेत. झांशीच्या व तत्पूर्वीच्या हकीकतींत हा प्रकार विशेषच दृष्टीस पडतो. अन्यत्र प्रायः त्यांनीं अधिक मजकूर घालण्याऐवजीं मुळांत असलेल्या मजकुराला बरीचशी कात्री लावली आहे. झांशीच्या प्रकरणांतच वैद्यांना आपल्या पदरची माहिती घालण्याची

लहर कां यावी, या प्रश्नाचा विचार करतांना कै. दत्तात्रय बळवंत पारसनीसांनीं १८९४ सालीं छापलेल्या लक्ष्मीबाईच्या चारित्राचें स्मरण झाल्या-शिवाय रहात नाहीं. त्या चरित्राला साह्य करणारांत वैद्यांचें नांव असून त्याबरोबर त्यांनीं झांशीवालीच्या एका तत्कालीन आश्रिताकडून घडलेली हकीकत लिहून घेण्याचा प्रयत्न केला, असा खुलासा आहे. तो प्रयत्न म्हणजेच वरसईकर विष्णुभटजीकडून मिळविलेलें हस्तालिखित होय. अशा-विषयीं पारसनिसांच्या चरित्रांतील मजकूर पाहिल्यानंतर मुळींच संशय रहात नाहीं. विष्णुभटजींची माहिती आपल्या जवळच्या माहितीनें सजवून खुलवून पारसनिसांनीं आपलें पुस्तक भरून काढलें व तेंच पुस्तक पुढें ठेवून वैद्यांनीं आपली प्रत छापून काढली. त्या वेळीं मुळाशीं ताडून पहाण्याची तकलीफ त्यांनीं बिलकूल घेतलेली नाहीं. परंतु आपण छापतों तें मूळचें बाड जसेंच्या तसें छापीत नाहीं, या जाणिवेनेंच कीं काय वैद्यांनीं मुखपृष्ठावर लेखक म्हणून आपलें नांव छापलें आहे. वैद्यांनीं पारसनिसांची नक्कल करून समाधान मानलें नाहीं, हें सांगणें जरूर आहे. पारसनिसांच्या मजकुरांतही त्यांनीं फेरफार केलेले आहेत. कांहीं ठिकाणीं अजीबाद नवा मजकूर घातला आहे. नानासाहेब पेशवा बंडाचा पुढारी कसा झाला, याबद्दल त्यांच्या तिसऱ्या भागांतील पहिल्या व दुसऱ्या परिच्छेदांत माहिती आहे, ती वैद्यांची आहे, विष्णुभटजींची नाहीं. त्यांना झांशीच्या वाटेवर भेटलेल्यांनीं सप्टेंबर १८५७ मध्यें तात्या टोपी ग्वालेरची फौज कानपुरास घेऊन गेल्यापासून पुढचा वृत्तांत सांगितला. त्यांत इंग्रजांशीं जूनमध्यें झालेली लढाई, त्यानंतरची इंग्रजांची व (जुलै १६ रोजीं) इंग्रज बायकामुलांची उडालेली कत्तल, या हकीकती आलेल्या आहेत; परंतु नानासाहेब इंग्रजांच्या द्वेषानें कांहीं कारस्थानें करीत असतां बंडाची लाट उठली व बंडवाल्यांनीं त्या लाटेवर नानासाहेबाला चढविलें इत्यादि पूर्वोक्त परिच्छेदांतील मजकूर विष्णुभटजींच्या लिखाणांत नाहीं. इंग्रज बायकामुलांच्या कत्तलीवर शिवाजी, चिमणाजी, अश्वत्थामा यांचीं नांवें गोंवून केलेलें भाष्य सर्वस्वीं वैद्यांचें आहे. (पान ३२-३३) वैद्यांचें मनोगत त्या भागांत जसें जिकडे तिकडे घुसलें आहे तसेंच तें कमी जास्त प्रमाणांत इतरत्रही पसरलेलें आहे. झांशी सोडून ब्रह्मावर्ताकडे जाऊं लागल्यावर प्रथम जेव्हां गंगा नदीचें दर्शन झालें, तेव्हांचें वर्णन वैद्यांचें आहे. विष्णुभटजींनीं जें एखाद्या वाक्यांत सांगितलें असेल त्याचा दहावीस वाक्यांनीं पसारा

करावयाचा अशी पद्धत वैद्यांनीं विष्णुभटजींचें हस्तलिखित छापतांना स्वीकारलेली होती. गंगेचें दर्शन घडतांच विष्णुभटजींना अननुभूत अशी कृतकृत्यता वाटली. 'तें गंगेचें पात्र दृष्टीस पडलें व कांठीं कुश, काश व दर्भ व पाण्याचे तुंबीस कमळाचे समुदाय पाहून परमानंद झाला. जन्माचें सार्थक झालें. आज (वर) आपण बहुत दुःखें काढिलीं, परंतु सर्वांचें सार्थक आज झालें. त्या दिवसाच्या आनंदास उपमा देण्यास सुचत नाहीं. विष्णुभटजींच्या या मजकुरांत गंगाप्रवाहाची लांबीरुंदी व गंगातटाकाची उंची, कमळांचे रंग, मोगराकळींच्या गजऱ्याप्रमाणें दिसणाऱ्या बगळ्यांच्या पंक्ती, गंगेच्या प्रवाहांत खेळणारे मासे, गंगेवरील घाट व देवळें, यांतली एकही गोष्ट आलेली नाहीं. वैद्यांनीं त्यांचा भरणा पुस्तक छापतांना यथेच्छ केला. (पान ९९) त्याची यादी दिल्यास पुष्कळशी जागा निष्कारण खर्ची टाकावी लागेल.

वैद्यांनीं गाळलें काय व किती याची कल्पना परिशिष्टावरून करतां येईल. या गाळागाळींत त्यांनीं विष्णुभटजींनीं दिलेल्या बऱ्याच तिर्थींची हकालपट्टी केलेली आहे. मागें विष्णुभटजींच्या प्रवासकालाचा जो आढावा सांगितला त्याला या मुळांतल्या तिर्थींचा उपयोग झाला. शेवटच्या भागांत विष्णुभटजींच्या लिखाणाचा संक्षेप करण्याकडेच वैद्यांचा जोराचा कल होता असें दिसतें.

विष्णुभटजींच्या हस्तलिखितामध्यें कांहीं त्रुटितें आढळतात. मध्येंच कांहीं पानें गेलीं आहेत; त्यांतला मजकूर पारसनीस आणि वैद्य या दोघांच्या पुस्तकांत असल्यानें तीं पानें कशीं गेलीं असतील याचा अंदाज करतां येतो. कांहीं पानांवर आंकडा नाहीं. कांहींमध्यें मागल्या पानांचे हवाले आहेत. कांहीं पानांचे आंकडे चुकले आहेत.

विष्णुभटजी गोडसे यांचें लिखाण दोन वह्या व 1२ सुटे बंद याप्रमाणें एकंदर २९७ पानांचें आहे. त्याचे भाग सहा आहेत. वैद्यांनीं ते फोडून त्याचे नऊ भाग केले आहेत. मुळांत पहिल्या वहीच्या तिसऱ्या पानावरून मजकुराला प्रारंभ आहे. (शके १७७९) 'चैत्र शु. ३ रोजीं शहर पुणें सोडून वाघोली मुक्कामीं गेलों;' असें पहिल्या भागाचें शेवटचें वाक्य आहे. वैद्यांनीं वाघोलीचा मुक्काम दुसऱ्या भागांत ओढला आहे. शिवाय चैत्र शु. ३ ऐवजीं चैत्र शु. ५ असा फरक केला आहे तो निराळाच. विष्णुभटजींच्या दुसऱ्या भागांत सातपुड्यांतला प्रवास, महजनीक शिपायांच्या

भेटी, महूचें बंड, बंडवाल्यांबरोबर इंदुरावरून उज्जनीस प्रयाण, उज्जनीहून धार, धारेहून उज्जन व तेथून ग्वालेर, ग्वालेरांतलें आषाढांतल्या मुंजांचें ग्रामण्य व कार्तिक शुद्धांत झांशीस प्रयाण वगैरे हकीकत आहे. बंड-वाल्यांच्या धामधुमीचा वृत्तांत विष्णुभटजींच्या मूळ लिखाणांत नाहीं. विष्णुभटजी झांशीस निघाले तेव्हां झांशीस पोंचण्यापूर्वी रस्त्यांत वेळोवेळीं भेटलेल्या लोकांच्या तोंडून ऐकलेल्या ब्रह्मावर्त, कानपूर, लखनौच्या धुमाकुळाचें वर्णन त्यांनीं तिसऱ्या भागांत दिलेलें आहे. या भागाच्या आरंभीं झांशीचा राजा गंगाधरराव आणि लक्ष्मीबाई यांची माहिती अगोदर देऊन मग बंडाच्या ऐकलेल्या गोष्टी त्यांनीं सादर केल्या आहेत. विष्णुभटजी व त्यांचे चुलते असे दोघे झांशीस पोचून त्यांनीं एका घरीं बिऱ्हाड ठोकलें. येथें तिसरा भाग विष्णुभटजींनीं संपविला आहे. वैद्यांनीं आपल्या पुस्तकाचा तिसरा भाग ग्वालेर सोडल्यानंतर विष्णुभटजींनीं ऐकलेल्या गोष्टींनीं भरून काढून त्या गोष्टी विष्णुभटजींना ग्वालेरच्या वास्तव्यकाळांतच समजल्या होत्या, असा भास निर्माण केला आहे. चौथ्या भागांत विष्णुभटजींनीं झांशीचें व झांशीवालीच्या गुणांचें वर्णन केलें असून तेथील अनुष्ठानें, नाटकें व इतर समारंभ, नंतर लढाई, कत्तल, लूट या विषयांची हकीकत दिलेली आहे. यामुळें हा भाग फार मोठा झालेला आहे. वैद्यांनीं या भागाचे दोन तुकडे पाडले आहेत. पांचव्या भागाची वैद्यांनीं अशीच व्यवस्था लावल्यामुळें बिलासिया येथील तुला पुरुषदानाची माहिती त्यांना ८ व्या भागांत द्यावी लागली. विष्णुभटजींनीं त्या हकीकतीचा आरंभ आपल्या पांचव्या भागाच्या शेवटीं केला आहे. बिलासियाच्या तुलापुरुषदानाचा समारंभ, ब्रह्मावर्तास परत येऊन तेथें एक महिनाभर राहिल्यावर अयोध्येकडे यात्रेसाठीं प्रयाण, तेथील हकीकती तेथून काशी, प्रयाग, विंध्यवासिनी, पुनः ब्रह्मावर्त, ग्वालेर, झांशी, सागर, हुशंगाबाद, नेमावर, इंदूर वगैरे स्थळांतील कामें उरकून नाशिक, मालेगांव, पुणें व शेवटीं वरसई याप्रमाणें फार मोठें प्रवासवृत्त विष्णु-भटजींनीं सहाव्या भागांत आणलें आहे. घरीं परत आल्यावर मातापित्यांना गंगेचें स्नान घालून अतिशय थाटाचें यात्रेसंबंधीं मावंदें साजरें केलें. सगळ्या प्रवासाचा व त्यांत भोगाव्या लागलेल्या प्रसंगांचा विष्णुभटजींनीं इत्यर्थ नमूद केला आहे तो असा:— "या इतिहासाचा एकंदर विचार

करतां द्रव्य मिळणें फार कठीण आहे, मिळाल्यास संरक्षण होणें फार कठीण आहे; मिळवूं असा निश्चय द्रव्याबद्दल केल्यास सिद्धीस जात नाहीं. जन्मापासून सुखाची इच्छा कारितात; परंतु उद्योग न करतां अवचित दुःख प्राप्त होतें; याजवरून सुखदुःखाचा उद्योग न करतां ज्या वेळेवर सुख होणें तें होतेंच. तसेंच दुःखाची वेळ आली म्हणजे दुःख प्राप्त होतें. याकरितां ईश्वराधीन कृत्य आहे. पहा, घरून कुटुंबास कर्ज फार जाहल्या-मुळें बाहेर प्रवासास गेलों. अनेक दुःखें सुखें भोगून घरीं येतेंसमयीं द्रव्य नाहीं. असो. '

विष्णुभटजींच्या हस्तलिखिताचें शेवटचें वाक्य—' एकंदर सत्तावनचे बंडाबद्दल जें जें स्मरण मजला जाहालें तें लिहून ठेवलें आहे. हस्ताक्षर विष्णुभट गोडसे, रहाणार वरसई, तालुका पेण; जिल्हा कुलाबा, शके १८०५, सुभानुनाम संवत्सरे, माहे माघ शुद्ध एकादशी, गुरुवार.

विष्णुभट गोडसे, वरसईकर

——

## समोरील मोडी हस्ताक्षराचें मराठी वाचन

" इकडे नानासाहेब व दिलीचा पिरोजशाहा बादशाहा मिलोन फौजिसुा लखनौचे बेगमेस मिलोन येक विचारे राहिले त्या प्रसंगी तात्या टापी ( टो ) पी हा अतरवेदी मुलखात सिरोन फौज बरीच वरोन यमुना उतरून कालपीचे मुलखांत दगा करून राहिला होता कितीक गाव जाळून (टा) किले कितीक गाव लुटून फस्त केले याप्राो कारखाना सुरू करून कालपी नजीक येऊन मोटा दगा केला तों बिघडलेले पलटणी काही ज्यास्त टोपीयास मिलाल्यामुळे कालपीचे किल्यावर हला केला तेथे गोरे फार कमी होते ते लागलीच थोडीसी लढाई देऊन पळून जाऊ लागले तों बडवाले लोकानी त्यास अडऊन मारिले आणि कालपीचा किला सर करून भगवा झेंडा लाऊन श्रीमंत नानासाहेब पेशवे यांचे नावची दवडी पिटून कालपी शहरचा बंदोबस्त ठेविला तात्या टोपी याणी किल्यात वस्ती धरून लिंघार्वचे मुलखात लूटमार सुरू ठेविली कालपी हे शहर यमुनेकाठी आहे तेथें किल्ला यमुना-काठी चागला आहे कालपी शहराचे पश्चमेस चौऱ्यासी घुमुट चिरेबदी बाधिव आहेत मधून मधून विहिरीहि बाधीव आहे घुमुट बाधण्याचे कारणाचा शोध करिता पूरवी बादशाईत काल-पीवर मोटी लढाई जाहाली त्यात मोठेमोठे शूर नामांकित मरण पावले त्यास तेथे "

[ गोडसे लिखित वही—पान ८६ ]

भा. इ. सं. मं. संग्रह, पुणें.

'माझा प्रवास' कर्ते:—



श्री. विष्णुभट गोडसे वरसईकर.



# विष्णुभटजींचें चरित्र

विष्णुभटजींचा जन्म शके १७४९ च्या श्रावणांत झाला ( १८२७ ) असें त्यांनीं आपल्या प्रवासवृत्ताच्या आरंभीं सांगितलेलें आहे. जन्मापासून १८६० सालाच्या सुरुवातीपर्यंतचें म्हणजे बंडांतून सुटून तीर्थयात्रा संपादून घरीं परत येईपर्यंतचें एकूण आयुष्याच्या ३३ वर्षांचें इतिवृत्त त्यांनीं सादर केलेलें आहे. त्यावरून त्यांची शारीरिक व मानसिक प्रकृति समजण्याला हरकत नाहीं. द्रव्यार्जनाचा यत्न केला, परंतु तो सर्वथैव वायां गेला. म्हणून यदृच्छालाभसंतुष्ट वृत्तीनें पुढचें आयुष्य कंठावयाचें असा निश्चय करून त्यांनीं आजूबाजूच्या गांवांतील यजमानघरच्या धर्मकृत्यापलीकडे लक्ष न देतां आपली सारी हयात वरसईसच काढली. त्यांच्या वयाच्या सुमारें ६७ व्या वर्षापर्यंत त्यांची पत्नी जिवंत होती. ते प्रवासांत असतां त्यांना मुलगी होऊन ती दोन वर्षांनीं वारल्याची माहिती प्रवासवृत्तामध्यें आलेली आहे. त्यानंतर त्यांस एक पुत्र होऊन त्याच्या मागें मुलें जगत नाहींत असा अनुभव आल्यानें त्यांनीं आपल्या धर्मश्रद्धेंतून औदुंबर वृक्ष लावण्याचा उपाय काढला. त्या वृक्षाला बायकोनें लक्ष प्रदक्षिणा घालाव्या आणि आपण अखंड गुरुचरित्राचें पारायण करावें, अशीं उभयपक्षीं व्रतें ठरलीं व त्यांचें अनुष्ठान सुरूं झाल्यावर मुलें जगूं लागलीं. त्यांतील कै. वे. शा. सं. नरहरशास्त्री गोडसे हे एक प्रख्यात चिरंजीव होत. त्यांनीं गुजराती भाषेच्या प्रभुत्वानें विद्वत्ताप्रचुर गीताप्रवचनें सुरू करून एक नवा प्रघात मुंबईत सुरू केला. गुजराती समाजानें या प्रवचनांचें चिरस्थायी स्मारक म्हणतां येईल अशी टोलेजंग गीतापाठशाला उभारून शास्त्रीबोवांच्या कर्तृत्वाचें सार्थक केलें. नरहरशास्त्र्यांच्या या अभूतपूर्व उपक्रमानें त्यांच्या घराण्यांतील दारिद्र्याची हकालपट्टी झाली. महाराष्ट्रीयाचा गीताप्रवचनाच्या क्षेत्रांतील हा पराक्रम कधींही विसरतां येण्याजोगा नाहीं.

आपला मुलगा नांवारूपास येऊन मुंबईस द्रव्यप्राप्तीच्या उद्योगास यशस्वी रीतीनें लागला तेव्हां विष्णुभटजींनीं त्यानें आपल्यास दरमहा अवघे पांच रुपये पाठवावे, इतकी अल्पसंतोषाची इच्छा धरली होती. कै. नरहरशास्त्री यांना चांगली कमाई होऊं लागल्यामुळें या इच्छेला विष्णु-

भटजींच्या अल्पसंतोषाची साक्ष याहून अधिक महत्त्व कालांतरानें उरलें नाहीं. आयुष्याच्या शेवटीं विष्णुभटजी प्रपंच चालविण्याच्या चिंतेतून मुक्त झाले होते, असें म्हणावयास हरकत नाहीं.

विष्णुभटजींच्या प्रवासवृत्तावरून त्यांच्याप्रमाणें वरसई, पुणें येथील कांहीं ब्राह्मण मंडळी ग्वालेरकडे द्रव्यसंपादनार्थ निघाली होती व तीहि बंडाच्या धुमाकुळींची थोडी फार झळ लागूनच स्वदेशीं परतली होती असें दिसतें; परंतु त्यांपैकीं कोणीहि आपल्या माहितीचा पाढा लिहून ठेवल्याचें आजवर निदर्शनास आलेलें नाहीं. निदान आज तरी विष्णुभटजी हे एकटेच आपले अनुभव कागदावर उतरून ठेवणारे दिसतात. त्यांनीं हें लिखाण आपल्या वंशजांना झाला प्रकार समजण्याचें साधन व्हावें, या दृष्टीनें केलेलें आहे. सुना, लेकी, मुलें समजूतदार वयाचीं झाल्यावर त्यांना विष्णुभटजींनीं लिहिलेला मजकूर वाचून दाखविण्याचा क्रम कित्येक महिने ठेवला होता. आधीं मजकूर लिहून काढावयाचा आणि दुसऱ्या दिवशीं तो दुपारची वामकुक्षी आटपल्यावर जमलेल्या मंडळींपुढें वाचावयाचा हा क्रम सुमारें सहा महिन्यांनीं शेवटास गेला. विष्णुभटजींचें हस्तालिखित संपल्यावर त्याच्या वह्या वैद्यांनीं ताब्यांत घेतल्या आणि मध्यंतरीं पारसनिसांना दाखवून १९०७ सालीं तें छापून काढलें. पुढें १९२२ पर्यंत तें हस्तलिखित त्यांच्या जवळच होतें. त्या वर्षी त्यांनीं तें भारत इतिहास संशोधक मंडळाच्या हवालीं केलें. तसें करतांना त्यांनीं मंडळाला जें पत्र लिहून दिलें, त्यांत म्हटलें आहे कीं, विष्णुभटजी हे आपले कुलोपाध्याय होते. कॉलेजांत शिकत असतांना आपल्या घरीं त्यांची गांठ पडण्याचा योग आल्यास कधीं कधीं त्यांच्या तोंडून बंडाच्या हकीकती ऐकायला सांपडत; त्यावरून आपण ( वैद्यांनीं ) त्यांना या साऱ्या गोष्टी संगतवार लिहून काढण्याचा आग्रह केला. या आग्रहाला द्रव्याच्या आमिषाचीहि जोड ठेवलेली होती. विष्णुभटजींनीं ही गोष्ट अखेरीस मनावर घेतली व सहा महिन्यांत आठवणी लिहून काढल्या. वैद्य तें बाड घेऊन उज्जयनीस ग्वालेर संस्थानच्या नोकरीवर गेले.. एकदां तें छापावें अशी इच्छा झाल्यावरून वैद्यांनीं तें बाड पुण्याचे सुप्रसिद्ध वकील माधवराव आपटे यांस दाखविलें. लेखक जीवंत असेपर्यंत तें छापूं नये, असा त्यांचा सल्ला पडल्यावरून वैद्यांनीं तें हस्तलिखित तसेंच ठेवून दिलें. अशी माहिती वैद्यांच्या त्या पत्रांत आहे. विष्णुभटजींनीं आपल्यावर गुदरलेल्या प्रसंगाचा

वृत्तांत मुळांत कुणाच्याहि प्रेरणेनें किंवा कसल्याही आमिषानें लिहून काढलेला नव्हता अशी विष्णुभटजींच्या वंशजाची निश्चित माहिती आहे.

१९०७ सालीं १८५७ या वर्षानंतर पन्नाशी लक्षांत घेऊन वैद्यांनीं तें इंदुप्रकाश व चित्रशाळा अशा दोन छापखान्यांतून एकाच वेळीं प्रसिद्ध केलें. या दोन छापखान्यांचें गूढ उलगडण्याला आतां कांहींच साधन उरलेलें नाहीं. १९४८ मध्यें त्या पुस्तकांच्या दुसऱ्या आवृत्तीचा योग आला आहे.

जसजसें उतार वय होत चाललें तसतसें विष्णुभटजींचें वैराग्य वाढत जाऊन बायको निवर्तल्यावर त्यांनीं शेवटचीं सात वर्षे क्षेत्रसंन्यास घेऊन काढलीं. या काळांत त्यांचा बहुतेक सारा दिवस देवाधर्मांच्या आराधन-चिंतनांत जात असे. प्रपंचव्यवहाराबद्दल ते उदासीन असले तरी घरांतील मुलामाणसांना त्यांचा विलक्षण दरारा वाटावा अशी त्यांची रहाणी होती. चिरंजीव नरहरशास्त्री यांना चांगल्या कर्तेपणाच्या प्रौढ वयांत एकदां जेवायला उशीर केला म्हणून विष्णुभटजींनीं लक्षणेनें नव्हे तर प्रत्यक्ष कृतीनें कानउघाडणी करून शिक्षा भोगायला लावल्याची कथा ऐकण्यांत असून ती या पितापुत्रांच्या स्वभावाचें मर्म उघडकीस आणणारी आहे. चिरंजीवांनीं ती शिक्षा जणूं काय पित्याचा आशीर्वादच, इतक्या शांत चित्तानें सहन करून पुनः पित्याचा मनःक्षोभ न होऊं देण्याची खबरदारी जन्मभर बाळगली, हा पुत्राच्या स्वभावाचा विशेष होय.

क्षेत्रसंन्यास घेऊन देवाधर्मांच्या सेवेंत आयुष्य कंठीत असतां त्यांना मृत्यु आला व त्या प्रसंगाची कथा सांगण्याजोगी आहे. मृत्यूच्या वर्षी माघांत थोरल्या नातवाची मुंज झाली व तो लागलींच आजारी पडला. एके दिवशीं सकाळीं मुलाची आई त्याला औषधपाणी करीत असतां तिच्या ध्यानांत आलें कीं, मुलगा अत्यवस्थ असून ताबडतोब कांहीं विशेष उपाय न केल्यास मुलाची धडगत नाहीं. विष्णुभटजी त्यावेळीं नित्याप्रमाणें देवळांत पूजेअर्चेसाठीं गेलेले होते. देवळांत असतांना त्यांना कसलाही उपसर्ग सोसत नसे, हें माहीत असूनहि मुलाची स्थिति त्यांच्या कानीं घालण्याशिवाय घरच्या मंडळींना गत्यंतर नव्हतें. त्यांनीं दोन तीन वेळां त्यांच्याकडे जाऊन लवकर घरीं येण्याची जरूरी त्यांच्या कानावर घातली. तेव्हां विष्णुभटजी आपलें रोजचें पूजाकृत्य उरकून घराकडे वळले. नातवाच्या दुखण्याची

वार्ता ऐकून त्यांचें चित्त व्यथित झालें नव्हतें असें मात्र नाहीं. घरीं येतांच दाराशीं पाय धुऊन स्वच्छ झाल्यावर ते देवघरांत गेले. नातवाकडे प्रथम जाणें स्वाभाविक असतांही त्यांनीं देवघरांत जाऊन सर्वांना आश्चर्य उत्पन्न केलें. परंतु असें का म्हणून त्यास हटकण्याची सोय नव्हती. देवघरांत जाऊन त्यांनीं समोरच्या देवाशीं नातवाच्या आजारानिमित्त भांडण आरंभिलें. सारा जन्म देवतार्चनांत एकनिष्ठपणें घालविला असतां वृद्धावस्थेंत आपला नातू मृत्यूनें नेल्याचा प्रसंग भोगावा लागतो कीं काय या शंकेनें त्यांच्या चित्तांत संताप संचरला होता. ' माझा नातू माझ्यादेखत जावा असें व्हायला मी कांहीं पापानें पाय धुतलेले नाहींत ' असें देवाला बजावून त्यांनीं त्यावर हळदीकुंकू वाहिलें व तेंच हळदीकुंकू घेऊन ते आजाऱ्याच्या खोलींत आले. तेथें त्यांनीं आजारी मुलाच्या आईजवळ अर्थात् सुनेजवळ हळदीकुंकू देऊन ' हें मुलाच्या कपाळीं लाव, मुलगा बरा होईल; भिण्याचें कारण नाहीं ' असे धीराचे शब्द उच्चारले. साऱ्या जन्माची पुण्याई जणूं काय त्यांनीं त्या हळदीकुंकवांत भरली होती; इतकेंच नव्हे तर आपल्या जीवनाची शक्ति खर्ची घालून मुलाला रोगमुक्त करावयाचा असा निश्चयही त्यांत उतरलेला होता. कारण नातवाच्या खोलीबाहेर येतांच त्यांना कमालीचा थकवा वाटूं लागला व त्यांनीं बाहेर ओसरीवर येऊन जें अंथरूण पसरलें तें सोडलेंच नाहीं. तिकडे मुलाचा आजार कमी होत चालला तर इकडे विष्णुभटजींचा ताप वाढत चालला. याप्रमाणें त्यांनीं जेमतेम एक आठवडा काढला. त्यांच्या शुभाशुभविषयक समजुतीस अनुसरून आपल्या आजारांत दुखणेकरी नातू घरांत नको असा आग्रह धरून त्याला त्याच्या आजोळीं पाठवून दिलें. मृत्यूची वेळ जवळ आली तेव्हां ते एकाग्र चित्तानें समोरच्या बाजूस कांहीं तरी पहात असल्यासारखे पडून होते. शेवटच्या क्षणापर्यंत शुद्धि होती. इष्टदेवाचें ध्यान करीत असतां त्यांचें प्राणोत्क्रमण झालें.

घरच्या मंडळींकडून समजलेले त्यांच्या स्वभावाचे विशेष मागें निवेदन केले आहेत. पुस्तकावरून त्यांचा स्वभाव पाहूं गेल्यास तो चौकस, साहसी, रोखठोक, हजरजबाबी, दृढनिश्चयी व किंचित् भोळा, असा असल्याबद्दल संशय रहात नाहीं. चौकसपणा नसता तर त्यांनीं बंडाच्या हकीकती ऐकून त्या मनांत सांठविल्या नसत्या. दक्षिणेंतून उत्तरेकडे द्रव्यार्जनार्थ निघणें हेंच मुळांत साहस आहे. महूच्या छावणीनजीक गेल्यावर

बंडांत सांपडण्याची शक्यता कळल्यावरही त्यांनीं पुढें जाण्याची हिंमत सोडली नाहीं. हा त्यांच्या साहसाचा दुसरा पुरावा आहे. बंडवाल्याचा गराडा सभोंवतीं पडतांच ' तुम्ही हिंदु धर्मासाठीं जीवावर उदार झाला आहां व आम्ही तर भिक्षुक म्हणजे त्या धर्माचे पुजारी आहों, यामुळें तुम्हीं आम्हांला संभाळलें पाहिजे ' हा युक्तिवाद प्रसंगावधान आणि हजरजबाबीपणा या दोही गुणांचा निदर्शक आहे. प्रवासांत एकदां स्वयंपाकाला विस्तव कसा मिळवावयाचा या विवंचनेंत असतां समोरून प्रेत आलें. प्रेताबरोबर अग्नि होता त्याची मागणी केली, त्यावेळीं अजून हा अग्नि प्रेतसंस्काराला योग्य व्हावयाचा असल्यानें तो शुद्ध आहे, हा विष्णुभटजींनीं केलेला शास्त्रार्थ त्यांच्या हजरजबाबीपणांतच गणावा लागेल. त्यांचें सारें प्रवासवृत्त हें त्याच्या दृढनिश्चयाचें उत्कृष्ट प्रमाण आहे. द्रव्यार्जन व तीर्थयात्रा यांपैकीं पहिला हेतु सफळ न झाला तरी दुसरा हेतु त्यांनीं तडीस नेला व त्यांत पुनः गंगेची कावड घरीं वाहून नेण्याच्या कृत्याची भर घातली.

प्रवासवृत्तांतील प्रत्येक तपशील जेवढ्यास तेवढाच सांगितलेला आहे. महूस बंडवाल्यांनीं केलेली जाळपोळ व खूनखराबी त्यांना पहायला सांपडली. त्या वेळीं गोळीबारांत प्राणास मुकलेल्यांचीं प्रेतें त्यांना दिसलीं. सरकारी डाकेच्या टांगेवाल्याला बंडवाल्यांनीं ठार मारल्याचा प्रकार त्यांच्या डोळ्यांसमोर घडला. परंतु त्याबद्दल मनांत कांहीं तात्त्विक स्वरूपाचे विचार त्यांच्या चित्तांत उसळल्याचें दिसत नाहीं. खेड्यांतल्या ब्राह्मणांवर या देखाव्यानें कांहीं ना कांहीं विलक्षण परिणाम व्हावयास हवा होता; परंतु तसा परिणाम झाल्याचें कसलेंच चिन्ह त्यांच्या लेखनांत नाहीं. जीवनाची व वित्तवैभवाची क्षणभंगुरता वगैरे पारमार्थिक विचारांचा जसा त्यांच्या लेखनांत अभाव आहे तसा तो राजकीय विचारांचाहि आहे. यामुळें आलेल्या अनुभवाचें जितक्यास तितकें स्थूल रूप दाखविण्यापेक्षां त्यांनीं सगळ्या लेखनांत त्या त्या अनुभवांची तात्त्विक चर्चा मुळींच केलेली नाहीं. अपवाद म्हणून एकच स्थळ दाखवितां येईल. झांशीच्या संग्रामांत सांपडल्यावर त्यांना ' अबला यत्र प्रबला, बालो राजा निरक्षरो मंत्री । ' हें सुभाषित सारखें आठवत असल्याचें त्यांनीं सांगितलें आहे. झांशीची राणी ही ' अबला यत्र प्रबला ' या वचनांशाची साक्ष; तिचा दत्तक मुलगा लहानच होता व दिवाण लक्ष्मणराव हे सारखेच निरक्षर असतांहि दिवाण

बनले होते. ' नहि नहि तत्र धनाशा जीवित आशापि दुर्लभा भवति ' हा त्या सुभाषिताचा दुसरा चरण आहे. लुटीमुळें धनाशा संपलीच. आपण जगलों हेच ईश्वराचे उपकार. अशी विवेकाची भाषा या प्रसंगीं विष्णुभटजींनीं एकदांच लिहिली आहे. सुभाषित सांगण्यापूर्वी त्यांनीं आपले तत्कालीन विचार पुढीलप्रमाणें ग्रथित केले आहेत: ' हर हर परमेश्वरा, आम्ही घरून कोणत्या हेतूनें निघालों तो सर्व हेतु जाऊन येथें प्राणसंकट पडलें. घरून निघाल्यापासून आमचें पत्र घरीं नाहीं व घरचें आम्हांस नाहीं. घरीं मातोश्री व तीर्थरूप वृद्ध व आपले बंधु व स्त्री वगैरे सर्व मनुष्यास माझे योगानें शोक प्राप्त जाहाला. तेव्हां पुरुषप्रयत्न अगदीं खोटा आहे. दैवबळ प्राधान्य आहे. येथें येऊन फार दुःख मात्र सर्व प्रकारचें भोगणें प्राप्त जाहालें. ' यानंतर तें सुभाषित व त्याचा खुलासा आलेला आहे. वैद्यांनीं सुभाषित तेवढें देऊन बाकीचा मजकूर स्वतःचा दिलेला आहे.

जेवढ्यास तेवढें लिहिणें या पद्धतविरून रोखठोकपणा या स्वभावगुणाचा उल्लेख केला आहे. भोळसरपणाचें उदाहरण चोराशीं गांठ पडल्यावेळचें आहे. 'आम्हांला अमूक ठिकाणीं पोंचवाल तर तुम्हांला अमूक रुपयांचा मुशाहिरा देऊं ' असें चोरांना सांगणें म्हणजे आपल्याजवळ कांहीं पुंजी असल्याचा त्यांना सुगावा लागूं देण्यासारखेंच होतें. चोरांनीं त्याचा फायदा घेतला. होतें नव्हतें तें लुबाडून त्यांतलेच पांच रुपये खर्चासाठीं यांच्या हातावर ठेवून त्यांच्यावर उलट उपकार केला. आणखी एक स्वभावविशेष सत्याची चाड हा होय. आपल्याला जें समजलें तें शक्य तेवढें खरें असावें याविषयीं विष्णुभटजी प्रवासांत फार दक्षता बाळगीत होते. तरी सुद्धां प्रमाणशुद्ध इतिहासाशीं न जमणाऱ्या गोष्टी त्यांच्या लिखाणांत भरपूर आहेत. विष्णुभटजींनीं १८५७–५८ मध्यें जें ऐकलें व नंतर २३ वर्षांनीं लिहिण्याच्या वेळीं जें आठवलें तें लिहून काढलें. लिहिण्याला बसण्यापूर्वी या हकीकतींची वाच्यता घरीं आल्यापासून वारंवार करावी लागल्यामुळें ह्यांचें स्मरण विष्णुभटजींच्या चित्तांत पक्कें झालेलें होतें, परंतु त्यांना ज्यांनीं हकीकती सांगितल्या त्यांनीं त्या साऱ्याच गोष्टी प्रत्यक्ष पाहिलेल्या किंवा अनुभवलेल्या असतील अशी खात्री धरणें शक्य नाहीं. त्यांनाहि ह्यांपैकीं बऱ्याचशा हकीकती कोणाकडून तरी ऐकूनच

कळलेल्या होत्या. यामुळें इतिहासाशीं त्या हकीकती जमत नाहींत, हें आश्चर्य नाहीं. गोष्टी सांगणारे व ऐकणारे विशेष चिकित्सा-वृत्तीचे नव्हते किंबहुना भाविक होते याचा एक मासला दिल्लीच्या लढाईसंबंधांतला आहे. दिल्लीस पुष्कळ लढाया झाल्या. मनुष्य व जनावरें त्यायोगानें फार मेलीं; महागाईला सीमा उरली नाहीं तेव्हां इंग्रज व बंडवाले यांनीं दिल्लीऐवजीं उभयपक्षीं कानपूर ही जागा लढाईसाठीं मुक्रर केली व तिकडे आतां दोन्ही पक्षांच्या फौजा गोळा झाल्या आहेत. अशी माहिती विष्णुभटजींनीं नमुद केली आहे. ही उघड उघड भावडेपणाची गोष्ट आहे. दिल्ली शहर इंग्रजानें जिंकलें होतें. दिल्लीच्या लढाया जागा सोयीची राहिली नाहीं म्हणून उभयपक्षांच्या विचारानें थांबल्या ही कल्पना सकृद्दर्शनीं असत्य असतांही ती सर्वथैव खरी समजून विष्णुभटजींनीं ती नमूद करावी हें त्यांच्या मनोरचनेचें एक गमक आहे.

विष्णुभटजी तीर्थस्थानें, धार्मिक अनुष्ठानें व त्यानिमित्त झालेलीं भोजनें यांचा तपशील जितक्या बारकाईनें देतात तितक्या बारकाईनें शहरांचा अथवा किल्ल्यांचा तपशील देत नाहींत. अशीच त्यांची तऱ्हा व्यक्तींच्या बाबतींतही आढळते. त्यांना भेटलेल्या शास्त्रीवैदिकांविषयीं तें जेवढें सांगतात तेवढें राजकीय व्यक्तींबद्दल सांगत नाहींत. हें त्यांच्या स्वभावाचें आणखी एक गमक असून याचें मूळ त्यांच्या व्यवसायांत असल्याचेंही कळून येईल. बायकांसंबंधीच्या गोष्टी त्यांच्या लेखनांत पुष्कळच आहेत. वैद्यांनीं त्यांतल्या बऱ्याच गाळल्या आहेत. त्या पाहिल्यास व्यवसाय-परत्वें उत्पन्न झालेल्या दृष्टिकोणाच्या त्या दर्शक आहेत, असें ध्यानांत येण्याला हरकत नाहीं.

ऐतिहासिक बाजूनें बंडापुरतें प्रवासवृत्ताचें महत्त्व जोखूं लागल्यास त्यांतला झांशीच्या राहिवासांतलि प्रत्यक्ष अनुभवाचा भाग वगळून बाकीचा सर्व, दुय्यम दर्जाचा अर्थात् संशयात्मक समजावा लागतो. तो पूर्ण विश्वसनीयहि नाहीं आणि सर्वथैव अविश्वसनीयही नाहीं. विश्वसनीय प्रत्यंतर प्रमाणानें जो अविश्वसनीय ठरेल तो सपशेल खोटाच गणला पाहिजे. ज्याला विश्वसनीय पुराव्याचा विरोध नाहीं तो तूर्त विश्वसनीय मानल्याशिवाय गत्यंतर नाहीं. उदा० नानासाहेब पेशवा गंगापार झाल्यानंतरचें त्यांचें व त्यांच्याबरोबर असलेल्या मंडळीच्या हालांचें वर्णन. या वर्णनाला विरोधी

अशी माहिती जोंवर उजेडांत आलेली नाहीं तोंवर तें खरें धरायला हरकत नाहीं. विश्वसनीय भागांत महूचें बंड, धारचा दानसमारंभ, काल्पीच्या वाटेवर झालेली झांशीच्या राणीची भेट व झांशीच्या वास्तव्यकाळांतलि इतर व लढाईचे प्रत्यक्ष अनुभव चित्रकूटावरील इंग्रजांची धाड, या सर्वांना अव्वल दर्जाचा विश्वसनीय भाग समजणें अवश्य आहे. त्याच्या खालोखाल रामभटकाकांच्या अनुभवांतील गोष्टी विश्वसनीय ठरतात.

मूळच्या प्रवासवृत्ताला भाषाशैली नाहीं. कथनशैलीचें महत्त्व विष्णु-भटजींना आलेल्या अनुभवांच्या वैचित्र्यावर अवलंबून आहे. तें वैचित्र्य वाचकाला आकर्षून घेतें. छापलेल्या प्रवासवृत्तांतील रसाळपणा पारसनिसांच्या व वैद्यांच्या मजकुरानें आलेला आहे. मानसशास्त्राला उपयोगी पडणारे अनुभव जसे विष्णुभटजींच्या लेखनांत पुष्कळ आहेत तसेंच पुष्कळसे ८० वर्षांमागील सामाजिक स्थितीच्या ज्ञानाला उपयोगी पडणारेही आहेत.

———

# माझा प्रवास

## अथवा

## सन १८५७ सालच्या बंडाची हकीकत

१ : : गोडशे घराण्याचा वृत्तान्त

जीवत्सु तातपादेषु नवे दारपरिग्रहे ।
मातृभिः पाल्यमानानां ते हि नो दिवसागताः ॥

आमचें गोडशाचें घराणें पहिल्यापासून भिक्षुकाचें आहे. आमचे चुलते केशवभट व रामभट मोठे विद्वान् असून श्रीमंतांचे पदरीं होते. तीर्थरूप बाळकृष्णपंत मात्र गृहस्थ असून विंचूरकरांचे पदरीं कारकून होते. श्रीमंत ज्या वेळेस राज्य सोडून ब्रह्मावर्तास जावयास निघाले तेव्हां ते त्यांजबरोबर राहण्याचा निश्चय करून नर्मदेपावेतों गेले; परंतु प्रकृति फार अशक्त, ज्वर येऊं लागल्यामुळें परत फिरणें भाग पडलें. मग शक १७३९ त वरसई मुक्कामीं अतःपर नोकरी करावयाची नाहीं, ब्रह्मकर्मांत वेळ घालवावयाचा असा कृतनिश्चय होऊन स्वस्थ राहिले. घरचें उत्पन्न म्हणजे फार थोडें, केवळ भिक्षुकी व कांहीं थोडी भातजमीन, एवढ्यावर उदरनिर्वाह करावयाचा. पुढें आमचे चुलते विभक्त झाले. मग तर फार हालाचे दिवस आले. आमचे वडील गृहस्थ असल्यामुळें भिक्षुकीचें उत्पन्न अगदीं नाहींसें झालें. शिवाय प्रातःकाळपासून सायंकाळपर्यंत स्नान, संध्या, ब्रह्मयज्ञ, रुद्राची एकादशणी, देवपूजा, भागवतपाठ, श्रीवैजनाथेश्वराचें प्रत्यहीं षोडशोपचारपूजन, भोजनोत्तर अष्टाध्याय गीतेचा पाठ इत्यादि ऋषिकर्मांत निमग्न असल्यामुळें गृहस्थपणाचेंहि उत्पन्न बुडालें. काय शेतीवर उदरनिर्वाह होईल तेवढा करावयाचा. त्रिवर्ग बंधु विभक्त झाले, त्या वेळेस माझें वय दहा वर्षांचें होतें. वडील गृहस्थकामांत हुशार होते. त्यांनीं मोडी-बाळबोध लिहिणें,

वाचणें, व्याजाचे हिशेब, जमाखर्च वगैरे बाबतींत मला शिक्षण देऊन तयार केलें. पुढें कोठें तरी बाहेरगांवीं मला ठेवून नोकरी लावून द्यावी अशा विचारांत आहेत तों वडील चुलते केशवभट यांनीं रात्रौ वडिलांपाशीं बसून निश्चय ठरविला कीं, "आपलीं गांवीं परगांवीं यजमानांचीं घरें पंचवीस आहेत, व तिघां बंधूंमिळून मुलगे इतकेच आहेत. मजला मुलगा नाहीं, व रामभटाचें कुटुंब वारलें. तस्मात् यजमानास कुलगुरु नाहींसा होणार हें आपणांस उचित नाहीं. मी दोन तीन विद्यार्थी मिळवून विष्णूस संहिता सांगण्यास मुहूर्तावर प्रारंभ करितों. मुलांस गृहस्थ करून रोजगारांत व परधर्मी राजाचे सेवेंत द्रव्यार्जन करण्यापेक्षां ब्रह्मकर्मात तयार करवून यजमानकृत्यांत जें उत्पन्न होईल त्यांतच उदरनिर्वाह करणें हें फार इष्ट आहे." इत्यादि उभयतांचा संवाद होऊन सुमुहूर्तावर मला संहिता पढण्यास घातलें. परंतु दुर्दैवानें संहिता होऊन क्रम वगैरे समाप्त होणार तों आमचे विद्यागुरु केशवभट काका शक १७६८ ज्येष्ठ मासीं स्वर्गवासी झाले. रामभट काकाहि हिंदुस्थानांत ब्रह्मावर्ती श्रीमंतांचे पदरीं होमशाळेवर अध्यक्ष होते, त्यांनीं आपला तिकडे विवाह केला, व बरसईत येऊन राहिले.

याप्रमाणें स्थिति आल्यावर दरिद्रावस्थेनें आम्हास माळ घातली. कवीनें म्हटलेंच आहे, "परीक्ष्य सत्कुलं विद्यां शीलं शौर्यं सुरूपतां । विधिर्ददाति निपुणः कन्यामिव दरिद्रताम् ॥" उत्पन्नाचीं द्वारें चोहींकडून बंद झालीं. माझी संहिता वगैरे संपली होती. परंतु यजमानकृत्यें चालवून पैसे मिळविण्यास याज्ञिकीची कांहीं माहिती नव्हती. मी लहान होतों तरी मजला चांगलें समजत होतें. आमचे गांवांत विनायकशास्त्री जोशी म्हणून समर्थ ब्राह्मण असत; ते वेदशास्त्रनिपुण असून त्यांस कांहीं ज्योतिष अवगत होतें; याज्ञिकींत तर केवळ प्रतिसूर्य होते. सूत्रवृत्तिभाष्यांत निष्णात असून कुंडमंडपापर्यंत गति होती. त्यांजकडे जाऊन त्यांजला सर्व वृत्त निवेदन केलें. "आमचे घरांत चुलते वारल्यापासून यजमानकृत्य चालविण्यास कोणी राहिला नाहीं. मजला कृपा करून धर्मशास्त्र समजावून द्याल व याज्ञिकींत तयार कराल तर फार बरें होईल. याज्ञिकीची विद्या खरी गुरूची कृपा झाल्यावांचून येत नाहीं." शास्त्रीबोवांचे मनांत आपलेमागें आपलें नांव राखील असा विद्यार्थी तयार करण्याचें फार दिवसांपासून होतें. त्यांनीं माझी उत्सुकता व बुद्धि पाहून कबूल केलें, व प्रथम थोडी व्युत्पत्ति येण्याकरितां रूपावली, समासचक्र,

अमरकोश व काव्याचे कांहीं सर्ग इतकें मजकडून तयार करविलें, व नंतर धर्मशास्त्रास व नारायणभट्टीस आरंभ केला. शास्त्रीबुवांची मजवर फार कृपा होती. मजला त्यांनीं विद्यादान फार चांगलें दिलें, व गरिबीनें टोंचण्या लाविल्यामुळें मीहि रात्रंदिवस त्याचाच घोष घेतला होता. शास्त्रीबोवांस कमी दिसत होतें, म्हणून ग्रंथ मीच वाचीत असे व ते अर्थ सांगत असत. याप्रमाणें थोडक्यांतच निर्णयसिन्धु, प्रयोगपारिजात, स्मृत्यर्थसार इत्यादि ग्रंथ संपविले. मुहूर्तमार्तण्डहि म्हटला व शास्त्रीबोवांचे समक्ष प्रयोग चालवूं लागून प्रान्तांत लौकिक मिळविला.

आम्ही एकंदर तिघे भाऊ होतों. हरिपंतास स्नान, संध्या, वैश्वदेव, श्रावणी, रुद्र, पवमान, सौर इत्यादि अवश्य ब्रह्मकर्म शिकवून लिहिण्यास घातला होता. त्याचें अक्षर फार चांगलें होतें, व तो जमाखर्च, हिशेबी कामांत तरबेज होता; परंतु ठाण्यास दोनतीनदां परीक्षेंत उतरला नाहीं. शेवटीं त्यानें पेणेस सावकारी नोकरी पत्करिली. यजमानाची मेहेरबानी त्याजवर फार असे. धोंडभट्ट सर्वात धाकटा, हा अति तीव्र बुद्धीचा होता. त्यानें संहितेचा अध्याय अकरा संथांनीं गुरुजींस पाठ म्हणून दाखवावा. याप्रमाणें आपले बुद्धीचे बलानें संहिता, पदें, क्रम, वगैरे सर्व म्हणून ज्योतिष म्हणूं लागला. व्युत्पत्ति तयार करून व्याकरणास आरंभ केला. लहानपणींच कविता तयार करूं लागला. याप्रमाणें त्याचा लौकिक फार झाला. आमचे लहानपणापासून दारिद्र्य मागीलदारीं पुढीलदारीं फुगड्या घालीत होतेंच; परंतु ईश्वरकृपेनें भातास खंडीस नऊ–दहाप्रमाणें दर होता; सर्व जिनसा स्वस्त होत्या, यामुळें कर्ज काढल्याशिवाय दिवस काढीत होतों. आमचें बालबोध व सभ्य घराणें असल्यामुळें मुली आम्हांस पुष्कळ सांगून येत, परंतु आम्हांस लग्न कर्तव्य नाहीं, असें आमचे वडील सांगत. पुढें जसे जसे आम्ही थोडें थोडें द्रव्य मिळवूं लागलों, तशीं आमचीं लग्नें झालीं. लग्नाला सर्व पैसा कर्जाऊ घ्यावा लागला. पुढें आमची बहीण कृष्णाबाई इचाहि विवाह झाला. त्या लग्नांत बरेंच कर्ज वाढलें. पही–पाहुणा जास्ती पडूं लागल्यामुळें घरखर्च वाढला. कर्ज वर्षाऋतूंतील नदीच्या पाण्यासारखें किंवा जलोदरासारखें फुगूं लागलें. आमची सर्व मैदास थोडकीच असल्यामुळें घरखर्चांत नाहींशी होऊं लागली. याप्रमाणें एका संकटांतून निघून दुसरे संकटांत पडलों. केवळ कविवर्णित खल्वाटाची स्थिति झाली.

खल्वाट चंड किरणें अति तप्त झाला ।
छायार्थ तालतरुमूलसमीप गेला ।
तेथूनि थोर पडलें फल तो निमाला ।
येईल दैवहत येइल तेथ घाला ॥ १ ॥

लहानपणापासून आमचें बंधुत्व फार चांगलें होतें व दारिद्र्यानें त्यास दार्ढ्य जास्ती आणलें. लहानपणीं एकमेकांशीं तंटे वगैरे बिलकुल करीत नव्हतों व एकमेकांचे विचारांत फरक पडत नसे; व पुढें आमच्या बायका मोठ्या झाल्यावरहि फरक पडला नाहीं. भावाबंदांत मुख्य कलहाचें बीज स्त्रिया सर्वत्र असतात, हें अनुभवसिद्धच आहे. परंतु आमचे येथें त्यांचे मनांत जरी थोडें येत असे तरी त्यांचें कांहीं चाललें नाहीं व त्याहि चांगल्या घराण्यांतील असल्यामुळें एखादा परकीय घरीं आला तर माहेरवाशिणी कोणत्या व सासुरवाशिणी कोणत्या हें बिलकुल उमगत नसे. आमचे बंधुत्वांतील प्रेम निरुपम होतें. केवळ राम-लक्ष्मण-भरताचीच उपमा लोक देत असत. लहानपणीं एके ठिकाणीं खेळणें, तुला जास्ती मला कमी इत्यादि मत्सरभावानें न भांडणें, परस्परांच्या सुखदुःखानें कळवळणें, फार तर काय एक तांब्या घेऊन नदीवर शौचास जाणें, ह्या गोष्टी पाहून लोकांस फारच आनंद वाटे. जेव्हां मोठे झालों, व मिळवते झालों व समजूं लागलों, तेव्हांपासून रात्रीं एके ठिकाणीं बसून कर्जाबद्दल काय तजवीज करावी याविषयीं नेहमीं विचार करीत असूं.

शक १७७८ माघ शिवरात्रीचे सुमारास पुण्यास कांहीं यजमानकृत्य चालविण्यास मी गेलों होतों, तेथें अशी बातमी ऐकली कीं, बायजाबाईसाहेब (शिंदे), ह्या मथुरेस सर्वतोमुख यज्ञ करविणार आहेत, ह्या यज्ञांत एकंदर सात-आठ लक्ष रुपये धर्मादाय होणार आहेत, यासंबंधाचीं पत्रें नाशिक, पुणें वगैरे ठिकठिकाणचे विद्वान् मंडळींस आलीं आहेत. कर्जाबद्दल मनास हृद्रोग लागलाच होता, व कांहीं तरी परदेश हिंडल्याशिवाय एक रकमी पैसा मिळावयाचा नाहीं, हें मनांत पक्कें बिंबल्यामुळें माझा तात्काळ हिंदुस्थानांत जाण्याचा निश्चय झाला. आपण फार विद्वान् नाहीं खरे, तरी याज्ञिकी व धर्मशास्त्र हे आपले विषय उत्तम गुरूपासून प्राप्त झाले आहेत असा मनाचा दृढ अभिमान होता. शिवाय बायजाबाईसाहेब यांचे पदरीं बाळकृष्णभट वैशंपायन दानाध्यक्ष होते. त्यांजवर बाई-

साहेबांचा उत्तम लोभ आहे असें ऐकिवांत होतें. ते आपले आप्त आहेत, व त्यांचा व तीर्थरूपांचा परिचय चांगला आहे, तेव्हां त्यांजपासून कांहीं मदत मिळेल अशी आशा उत्पन्न झाली. मनाचा निश्चय कायम झाला, पण मातापितरें, बंधुवर्ग व पत्नी यांचें अनुमोदन कसें मिळवावें, याची मोठी चिंता येऊन पडली. वरसईस परत आल्यावर हरीपंतास पेणेहून बोलावून आणिलें व त्यास सर्व हकीकत कळविली; व पुष्कळ बोलणें झाल्यावर हल्लींचे स्थितींत हिंदुस्थानांत जाण्याचें धाडस करणें वाईट नाहीं असें कबूल करणें त्यास भाग पडलें. प्रथम बरोबर खुलासा काढण्याकरितां तीर्थरूपाचे नांवानें भाऊसाहेब वैशंपायन यांस ग्वालेरींत पत्र पाठविलें. त्या पत्राचा जबाब तीर्थरूपाच्या नांवावर येऊन पत्र परस्पर त्यांच्या हातीं गेलें. आंतील मजकूर पाहून थक्क होऊन मला जवळ बोलाविलें व प्रथम आपणास न कळवितां पत्र कां लिहिलें याचें कारण विचारिलें. तेव्हां मीं उत्तर केलें कीं, वैशंपायन हे आपले सोयरे खरे, परंतु ते हल्लीं श्रीमान् आहेत, दानाध्यक्षतेचा त्यांजकडे अधिकार आहे. तेव्हां पत्र येतें कीं न येतें व कोणत्या तऱ्हेचें येतें याचा भरंवसा नाहीं, याजकरतां कदाचित् आपल्यास ताप मात्र होईल म्हणून कळविलें नाहीं. हें ऐकून कांहीं समाधान पावून स्तब्ध राहिले व कांहीं वेळानें सांगितलें कीं, "हिंदुस्थान फार दूर आहे, तिकडे आपले लोक थोडे आहेत, जाण्याचे रस्ते फार अवघड व दंग्याधोप्याचे आहेत, तिकडे आपले लोक भांग पितात, स्त्रिया नादास लावणाऱ्या असतात; पुन्हा तुझी कांहीं लोकोत्तर विद्या नाहीं, सबब एकंदरींत तूं हिंदुस्थानांत जावें असें माझ्या मनांत येत नाहीं." हे शब्द ऐकतांच माझी कंबर खचली. मनांतून जावयाचा निश्चय होता खरा, परंतु वडिलांचें अनुमोदन मिळेना याजमुळें निरुपाय झाला. तों पुन्हा कांहीं आशा उत्पन्न झाली. वैशंपायन यांची कन्या वरसईस इनामदार कर्वे पेशव्यांचे कुलगुरु यांजकडे दिली होती, त्यांस पत्र आलें कीं, आपण सहकुटुंब ग्वाल्हेरीस यावें, इकडे बाईसाहेब सर्वतोमुख यज्ञ करविणार आहेत, सात आठ लक्ष रुपये खर्च होणार आहे. मौजहि दृष्टीस पडेल, कांहीं प्राप्तीहि होईल. आमचे भेटीस बहुत वर्षें झालीं आहेत, तर कुटुंबासहित आल्यास फार बरें होईल. येते समयीं बाळकृष्णपंत यांचे चिरंजीव येत असल्यास त्यांस घेऊन यावें, भेटीचा लाभ होईल, आपणांस

यात्राहि घडेल. कर्वे यांनीं पत्र आणून तीर्थरूपांस वाचून दाखविलें व तीर्थरूपांनीं पुन्हा पूर्ववत् जबाब दिला. मग मी संकटांत पडलों. कोणत्या रीतीनें अनुमोदन मिळवून निघून जावें याचा रस्ता सुचेना. तेव्हां मला एक युक्ति सुचली कीं, रामभट काकांची मध्यस्थी घालावी. आमचे चुलते वरसईस शेजारीं निराळें घर बांधून विभक्त राहिले होते, परंतु त्यांचें बंधुत्वांत रहस्य फार चांगलें होतें. शेतें, माळ, झाडें, पुस्तकें, पोथ्या वगैरेंची वांटणी झाली नव्हती, नफानुकसानी-संबंधीं सर्व एकच आहों असें समजून उभयतां बंधु निष्कपटपणें व काळजीनें वागत असत. त्यांचे घरीं जाऊन त्यांना सर्व हकीकत कळविली, व तुम्ही तरी कांहीं सांगा अशी फार गळ घातली. त्यांनीं सांगितलें कीं विचार करून उदईक तुला सांगूं. दुसरे दिवशीं त्यांजकडे गेलों तो अति सुमुहूर्तावर गेलों असें म्हणण्यास हरकत नाहीं.

काकांचा स्वतः हिंदुस्थानांत येण्याचा निश्चय दिसला. ते म्हणूं लागले कीं, "मजला थोडेंबहुत देणें झालें आहे व वास्तु नीट करणें आहे. माझा तर वृद्धापकाळ झाला; मुलगा आहे, पण तो कांहीं विद्या करून पैसे मिळवील असें दिसत नाहीं. त्यापेक्षां लोकांचें देणें नाहींसें करून वास्तु नीट बांधून ठेवणें माझे शिरावर आहे. याजकरितां मीही हिंदुस्थानांत तुजबरोबर येतों. तूं मात्र मजला सांभाळून घरीं आणून पोंचविलें पाहिजे. हिंदुस्थानांत मी बरोबर असलों तर उभयतांस सुख होईल. पितापुत्राप्रमाणें परदेशांत वागून जें द्रव्य मिळेल तें निमे वांटून घेऊं. माझ्या माहितीमुळें ग्वाल्हेरीस व झांशीस आपल्यास जास्त फायदा होईल. तुझे बापापासून परवानगी मी देववितों." हे शब्द ऐकतांच अत्यानंद झाला. हरीपंतास तावडतोब पत्र लिहून पेणेहून बोलावून आणिलें, व रात्रौ सर्व कुटुंब एकत्र बसून विचार सुरू झाला. मी प्रथम नम्रतेनें बोलूं लागलों, "एकंदर आपल्यास कर्ज इस्टेटीपेक्षां जास्ती झालें आहे. अन्न-वस्त्राचा खर्च, तसेंच जीं नैमित्तिक कृत्यें येतात त्यांचा खर्च, लोकव्यवहारा-संबंधें पहीपाहुणा, पट्टी वगैरेंचा खर्च, एवढ्यालाच आपली प्राप्ति पुरत नाहीं. याजमुळें दरवर्षीं थोडथोडें कर्ज वाढतें. तेव्हां एक रकमी पुष्कळ पैसा मिळण्यास देशान्तरीं फिरल्याशिवाय इलाज नाहीं. मी जरी दूरदेशीं अद्याप गेलों नाहीं तरी मला पक्का भरंवसा आहे कीं मी नीट वागेन, व माझ्यानें

प्रवासांतील हाल सर्व सोसवतील. तशांत काका मजबरोबर संभाळण्याकरितां आहेतच. मला हिंदुस्थानांत जाण्याबद्दल परवानगी द्यावी. कुटुंबाकरितां यत्न करीत आहें, तरी कुटुंबाच्या नशिबानें सर्व संकटें पार पडून सर्वें चांगलेंच होईल. कर्वे यांचे गाडींत एक भाग गाडीभाडें देऊन करूं, भोजनखर्च वगैरे हिस्सेरशीनें देऊं. आपले सोयरेधायरे, ग्वाल्हेराहून पत्र आलें आहे, त्यापेक्षां जावें असेंच म्हणतात." असें म्हणून स्वस्थ राहिलों. तीर्थरूपांनीं पूर्वींच्या सर्व हरकती पुन्हा काढिल्या, त्यांस मीं धीर करून उत्तर दिलें कीं, "मी हिंदुस्थानांत जातों तो स्त्रियांकरितां जात नाहीं, व मी शपथपूर्वक सांगतों कीं, मी त्यांच्या नादास बिलकूल लागणार नाहीं, भांग वगैरे अमली पदार्थ अगदीं सेवन करणार नाहीं, शरीरप्रकृतीस फार जपून वागेन, शिवाय त्या देशचे पक्के माहितगार काका मजबरोबर आहेतच. ते माझें हित-अनहित पहातील व मला कुमार्गाकडे जाऊं देणार नाहींत." इत्यादि पुष्कळ वाटाघाट मध्यरात्रीपर्यंत होऊन अखेरीस तीर्थरूपांनीं आज्ञा दिली. दुसरे दिवशीं मातुश्रीपाशीं बसून तिची समजूत पुष्कळ प्रकारें केली. सर्वांत मातुश्रीचें प्रेम अनिर्वचनीय आहे. दोन तीन घटकांपर्यंत मला कुरवाळून रुदन करीत होती; मी दूरदेशीं जाऊन सुखरूप परत कसचा येतों ह्या कल्पनेनें वारंवार तिला अश्रुपात येत. रात्रौ पत्नीनेंहि न जाण्याविषयीं पुष्कळ आग्रह केला; परंतु तिला सांगितलें कीं, तूं नुकतीच जिवावरच्या दुखण्यांतून उठली आहेस, काठी धरूनसुद्धां दोन पावलें चालतां येत नाहीं, डोकीचे केश पुष्कळ गेले आहेत. तरी आणखी वैद्याचें औषध घेऊन स्वस्थ पांच सहा महिने तीर्थरूप-मातुश्रींची सेवा करून रहा. हल्लीं उन्हाळ्याचे दिवस आले आहेत. व आम्ही मार्गशीर्ष पौषाचे सुमारास खचित परत येतों. हें ऐकून ती निरुत्तर झाली व जाण्याबद्दल तिचा रुकार पडला. दुसरे दिवशीं काकांनींहि येऊन तीर्थरूपांस सांगितलें कीं, "आम्ही दोघे हिंदुस्थानांत जातों; तुम्ही काळजी किमपि न करितां येथील दोन्ही प्रपंच चालवावे. विष्णूबद्दल निर्धास्त असावें, तो पुत्र व मी पिताच आहे, याउपर काय सांगूं." याप्रमाणें बोलणें झाल्यावर तीर्थरूपांनीं मुहूर्त पहाण्यास सांगितलें. आमची मातुश्री फार गरीब व भावार्थी होती, ती नेत्रांस पाणी काढून म्हणाली कीं, "विष्णु पुन्हा दृष्टीस पडेल तो सुदिन आहे. मजला बोलण्याचें ज्ञान नाहीं म्हणून मी बोलत नाहीं.

सर्व ऐकून घेतें." त्या समयीं मजला गहिंवर येऊन तिचे पाय धरून मीं सांगितलें कीं, मी आपला कार्यभाग झाल्यावर उगीच कांहीं नादानें तिकडे राहीन तर हेच पाय मजला साक्ष आहेत. तूं अगदीं काळजी करूं नको. इत्यादि बोलून तिचें कांहीं समाधान केलें. धोंडभट हा फार लहान होता, तरी मजला एकान्तीं भेटून दूर देशीं न जाण्याविषयीं बोलूं लागला. तेव्हां त्याचेंहि थोडक्यांत समाधान करून उपदेश केला कीं, "मी व काका गेल्यावर यजमानकृत्यें चालविण्यास तूंच राहिला आहेस, त्यापेक्षां वेदाची आवृत्ति म्हणून काव्याचा एक श्लोक म्हणावा. बाकी वेळांत याज्ञिकीचे प्रयोग पाठ करावे. एकंदर फार सावधपणें रहावें. हरिपंत पेणेस आहेत, तीर्थरूपांपाशीं तूंच आहेस, त्यांचे आज्ञेनें वागावें व आमची आठवण होऊं देऊं नये. हरिपंत व्यवहार पाहील, परंतु घरचा खटला तुलाच पाहिला पाहिजे. वायकामुलांचे हाल करूं नकोस. मातुश्रीस देवधर्मास जें खर्चास लागेल तें देत जा व तिचे आज्ञेंत वागत जा व तिचें वस्त्र रोज तूंच धूत जा. मीं घरीं असल्यावर हा नियम चालविला आहे व माझेमागें तूं चालव, आळस करूं नकोस." कृष्णाबाई बहीण ही लहान असल्यामुळें तिजला गंगायमुनी झारी आणण्याचें कबूल करून तिचें समाधान केलें.

निघण्याचा दिवस प्राप्त झाला. कर्वे यांजपाशीं गाडीभाडें, भोजनखर्च, वगैरे-संबंधीं ठराव करून आदले दिवशीं रात्रीं सर्व तयारी करून पडशीं भरून ठेविली. तयारींत व चिंतेंत व भाषणांत, त्या रात्रीं झोंप कोणास आली नाहीं. "रात्रिरेव व्यरंसीत्" दोन घटका रात्रौ उठून मुखमार्जनादि आटोपून गाडी घेऊन कर्वे बाजाररस्त्यावर येऊन उभे राहिले व आम्हांस बोलावणें पाठविलें. नंतर तीर्थस्वरूप काका व मी कुळस्वामिनींस हळद कुंकू वाहून प्रार्थना करून तीर्थरूप मातुश्रीचे चरणावर मस्तक ठेविलें व बाहेर पडून गाडीपाशीं आलों. तेथें इष्टमित्र व वेदशास्त्रसंपन्न विनायकशास्त्री हेहि आले होते, त्यांचें सर्वांचें समाधान करून निरोप घेतला व प्रयाणास आरंभ केला. गांवाबाहेर पुष्कळ लांबपर्यंत घरचीं सर्व माणसें येतच होतीं. तीं कांहीं केल्या माघारीं जाईनात. पुन्हां एकवार उभें राहून त्यांचें समाधान केलें. तीर्थरूप व मातुश्री यांचे नेत्रांस पाणी येऊन कंठ भरून आल्यामुळें त्यांचा बोलण्याचा इलाज नव्हता, व माझाहि गळा भरून आला होता. तथापि मातुश्रीचे कंठास मिठी मारून सांगितलें कीं, मी पूर्वी

सांगितल्याप्रमाणें आपले प्रकृतीस फार जपेन व माघ फाल्गुनचे सुमारास घरीं खचित परत येईन; तूं काळजी करूं नकोस. त्या समयीं मातुश्री बोलली कीं, तुझी भेट पुन्हा होईपर्यंत मीं आपले प्राण कंठांत ठेवले आहेत. असें म्हणून माझे डोळे आपले पदरानें पुसले. हरहर! मी अतिशय संकटांत पडणार व बंडाच्या तडाक्यांत सांपडून केवळ मृत्युमुखांतून बाहेर सुटणार व सात महिन्यांचे बोलीनें निघालों तो दोन वर्षांनीं परत येणार, ही घोर दैवगति आमचे स्वप्नींसुद्धां आली नाहीं.

आतां कोठवर येणार असा सर्वांनीं आग्रह करून तीर्थरूप व मातुश्री व इतर घरची मंडळी परत फिरविली, परंतु हरिपंत माघारा जाईना; तो आमचेबरोबर एक कोसपर्यंत आला व त्यास माघारें जाण्याबद्दल बहुत आग्रह केला, परंतु परतेना. शेवटीं गाडी व मंडळींस तसेंच पुढें जाऊं दिलें, व आम्ही दोघे एका झाडाखालीं स्वस्थ उभे राहिलों. कंठ दाटून आल्यामुळें कोणाच्यानेंहि बोलवेना. कांहीं वेळ एकमेकांस मिठी मारून कंठमुक्त रडल्यावर हरिपंत म्हणाला, “ पहा, एक वर्षाचे आंत परत येण्याची मुदत केली आहे. आजपर्यंत आपलें बंधुत्वरहस्य फार उत्तम होतें व वियोगदुःख नव्हतें, तें आतां प्राप्त झालें आहे. ज्याप्रमाणें राम वनवासास निघाले त्या वेळेस भरतानें पुष्कळ सांगितलें परंतु फिरले नाहींत व त्यांनीं नंदिग्रामास राहून ब्रह्मचर्य व उपोषणाचा नियम केला, त्याप्रमाणेंच मी शपथ वाहून तुम्हांस सांगतों कीं, तुम्ही वर्षाअंतीं परत न आलांत तर मजला संसाराची कांहीं जरूर नाहीं. मी निश्चित यतिवेष धारण करून चालता होईन. एवढा माझा नियम लक्षांत ठेवावा व स्वस्थपणें जावें, आतां तुम्ही घरची कांहीं काळजी करूं नये. मी पेणेहून आठा दिवसांनीं घरचा समाचार घेत जाईन. ” असें स्वस्थपणें बोलल्यावर आम्ही चालूं लागलों. पुन्हां पुष्कळ बोलणीं झालीं व सरते शेवटीं पुन्हा एकदां आपल्या कृतनिश्चयाची आठवण देऊन अश्रुपूर्ण नयनांनीं आमचेकडे पहात पहात तो माघारा फिरला.

हरिपंताचें मजवर प्रेम अमर्याद होतें यांत संशय नाहीं. पुढें जेव्हां आम्ही बंडांत गुरफटून आमची काय स्थिति झाली याचा बिलकुल मागमूस लागेना, तेव्हां आमचे घरचे मंडळींची तर झाली खरीच, पण हरिपंताची काय स्थिति झाली असेल याची कल्पना करवत नाहीं. आम्हीं सुरक्षित घरीं यावें याकरितां त्या विचाऱ्यानें कांहीं दिवस नित्य एकादशणी व हजार प्रदक्षिणांचा नेम करून

आपल्या शरीरकष्टानें परमेश्वराची आराधना केली. हीच पुण्याई वेळोवेळीं आमचो उपयोगास कशी आली हें पुढें स्पष्ट होणार आहे. असो. आम्ही पुढें चालूं लागलों, तो दिवस शक १७७८, कालयुक्त संवत्सर, फाल्गुन मास, वद्य पंचमी मंगळवार होता. त्या दिवशीं खोपवली मुक्कामीं धर्मशाळेंत वस्ती करून जेवणें केलीं. पहांटेस घाट चढून गेलों. तिसरे मुक्कामास पुणें शहरांत शिरलों. पुण्यास स्वस्थ एक दोन दिवस राहून वरसईची भाड्याची गाडी परत पाठविली व तीर्थरूपांस एक पत्र व एक मुकटा पाठवून दिला. आम्हीं पुण्यास कपडेलत्ते वगैरे सर्व सरंजाम तयार करविला व सोबत पाहून एक इंदूरपर्यंत भाड्याची गाडी ठरवून त्यांत कर्वे, त्यांची पत्नी व एक आठ वर्षांची कन्या व स्वयंपाकीण-बाई, अशा प्रकारें आम्हीं कांहीं चालत, कांहीं पाळीपाळीनें गाडींत बसत, असा चैत्र शुद्ध पंचमीस पुणें सोडून प्रवासास आरंभ केला.

---

## २ : : प्रवास व बंडाची सुरुवात

देशजातिकुलानां च ये धर्माः प्राक्प्रवर्तिताः ।
तथैव ते पालनीया प्रजा प्रक्षुभ्यतेन्यथा ॥
जनापरक्तिर्भवति बलं कोशश्च नश्यति ॥ १ ॥

—व्यवहारमयूख.

तारुण्याच्या भरांत, शक्तीच्या अमदानींत प्रवासासारखी मौज नाहीं. निर-निराळे प्रदेश, देखावे, नद्या, नाले, डोंगर, झाडें, शहरें, खेडीं, माणसें, रीतीभाती नजरेस पडून नूतनपणाची करमणूक मनास होते, व निरनिराळी माहिती होते, शहाण-पणा येतो. सुखाची खरी आनंद देण्याची शक्ति कांहीं दुःखाची मिसळ असल्याशिवाय बाहेर पडत नाहीं. चालण्यानें आंग दुखणें, आज जेवावयास न मिळणें, उद्यां भर दोनप्रहरीं एखाद्या बाभळीच्या विरल छायेंत पाणी पाणी करीत बसणें, परवां रात्रीच्या भर थंडींत अरण्यांत कुडकुडत पडणें, एखादा जिन्नस विसरणें, थोडीशी

भामट्यांची भीति असणें, वगैरे प्रसंगीं घडणाऱ्या गोष्टी प्रवासाच्या सुखांत मिळून सुखरूपच होऊन जातात. पहांटेस उठून आम्ही बहुतेक प्रातःकाळच्या थंडाव्यांत चालत असों, व नऊ दहाचे सुमारास कोठें तरी वस्ती करावी, मग एकाद्या सुंदर नदीचे प्रवाहांत दोन हात टाकून स्वच्छ स्नान करावें, किंवा प्रसंगोपात् एखाद्या डबक्यांतून पंचा नेसून तांब्यानें स्नान करावें. स्नान करून ब्रह्मकर्म संपतें आहे तों भात पिठलें तयार होऊन जेवीत असूं व बहुतकरून दुपारची तीव्र उन्हाची वेळ टाळून पुन्हा चालूं लागत असूं. याप्रमाणें पुणें सोडून वाघोलीचा मुक्काम करून मजल दरमजल नगराजवळ येऊन पोंचलों. तों जंगलांत ओढ्याचे दोन्ही कांठांनीं तांबड्या पांढऱ्या अगणित कण्हेरी लागून गेल्या आहेत असें दृष्टीस पडलें. एका दिवसांत लक्षपुष्पपूजा होईल असें पाहून फार आनंद झाला. व पुष्पेंहि पुष्कळ गोळा केलीं. नंतर तेथेंच मुक्काम करून दुसरे दिवशीं दहा वाजण्याच्या सुमारास नगरांत शिरलों व नव्या कारंजापाशीं राजेश्री नाना जोशी मुळे यांजकडे जाऊन उतरलों. नगरांत कांहीं दिवस मुक्काम केला व शहर सर्व पाहिलें. पुढें हिंदुस्थानांत जाणाऱ्या दोन तीन गाड्या मिळाल्या, त्यांत यज्ञाकरितां निघालेले कांहीं विद्वान् ब्राह्मण होते, त्यांचे संगतीनें नगराहून कूच केलें. मुक्काम दरमुक्काम करीत माले-गांवचे नदीवरचे धर्मशाळेंत उतरण्याकरितां आलों, तों पांच सहा गाड्या उतरल्या आहेत, पंचवीस तीस माणसें खटपटीस लागलीं आहेत, व एकीकडे स्वयंपाक सुरू आहे असें दृष्टीस पडलें. आम्हींहि तेथेंच एका कोपऱ्यांत उतरलों. चौकशीअंतीं बापूसाहेब संगमनेरकर तेथें उतरले आहेत असें कळलें. ते हारदेहांडे म्हणून त्यांचें नेहमींचें राहण्याचें ठिकाण होतें तेथें जात होते. बापूसाहेबांस वतनाचें सालिना अडीच हजार उत्पन्न असून जवळ अर्थहि पुष्कळ होता. हे गृहस्थ फार सज्जन व धर्मशील होते व चांगले व्युत्पन्न असून वेदहि बराच पठण केला होता. नेहमीं स्मार्ताग्नि सिद्ध ठेविल्यामुळें याज्ञिकीची माहिती त्यांस चांगली होती. त्यांचे हातून सप्तसंस्था दोन चारदां झाल्या होत्या, व जवळ गृह्याग्निसागर वगैरे मोठमोठाले ग्रंथ होते. त्यांची पत्नी फार साध्वी पतिसेवापरायण होती. अशा गृहस्थाच्या भेटीचा आम्हांस परम लाभ झाला. चार विद्वान् ब्राह्मण साहजिक आले आहेत, तेव्हां जागरण करावें असें त्यांच्या मनांत आल्यावरून दोन प्रहरीं मजला व दुसरे दोघांस बरोबर घेऊन श्रीमंत राजेबहादूर मालेगांवकर यांच्या भेटीस गेले. तेथें

सत्कार वगैरे झाल्यावर रात्रौ जागरणाचा बेत ठरला. मालेगांवचे चार विद्वान् व आम्ही एकत्र नऊ असामी मिळून तेरा असामींचें दोन वाजेतोंपर्यंत जागरण झालें. आटीव दूध पुष्कळ होतें व एक एक रुपया दक्षिणा मिळाली. नंतर आम्ही धर्मशाळेंत परत येऊन स्वस्थ निजलों. आमचेबरोबर मंत्रजागरण होईपर्यंत एक यजुर्वेदी ब्राह्मण बापूसाहेबांचे पदरचा जागत होता व पुढें आमचेबरोबर धर्मशाळेंत येऊन निजला. त्या दुर्दैवी ब्राह्मणास पहांटेच्या सुमारास सर्पदंश झाला. त्याच्या ओरडण्यानें मंडळी जागी झाली, व मोठा घोळ होऊन गेला. मणिमंत्रौषधि वगैरे उपाय सुरू झाले. राजेबहाद्दरहि हें वर्तमान समजतांच मांत्रिक व वैद्य घेऊन तेथें आले. परंतु 'सुरक्षितं दैवहतं विनश्यति.' कांहीं उपाय चालेना. तो गरीब बिचारा आपली घरची आठवण काढून रडूं लागला. पत्नीस रजोदर्शन झालें आहे. घर नगर जिल्ह्यांत आहे तिकडे जाणें आहे, वगैरे त्यानें फार विलाप केला. पुढें शुद्धी नाहींशी झाली व सूर्योदयाच्या सुमारास परलोकयात्रेस आरंभ केला. त्या वेळची ती स्थिति लक्षांत आली म्हणजे माझे अंगावर कांटा उभा राहतो. प्रवासांत धर्मशाळेंत, अरण्यांत पाहिजे तेथें पडावें लागतें, आणि अकल्पित मृत्यु कसा येतो, ह्याचें ढळढळीत उदाहरण डोळ्यांसमोर असल्यामुळें मनाची फार उद्विग्न स्थिति झाली व घरची आठवण येऊन किंचित् अश्रुहि आले. असो. त्याचें उत्तरकार्य बापूसाहेब यांनीं निवर्तलें, व आम्ही पुढें चालूं लागलों तों मजल दरमजल धुळ्यावरून सातपुड्याच्या पायथ्यापाशीं करवंद बारीचे मुक्कामावर येऊन पोहोंचलों.

सातपुड्यांतील वनप्रदेश अति रमणीय आहे. एकंदर पर्वताची रुंदी सुमारें साठ सत्तर कोस असून मधून मधून मात्र उंच शृंगें आहेत, बाकी डोंगर सखल आहे. एकदम चढावहि नाहीं. कांहीं चढाव आहे कांहीं उतार आहे. सातपुडा म्हणण्याचें कारण असें आहे कीं, डोंगराचे सात पुडे आहेत व सरसकट डोंगरापलीकडे जाण्यास सात दिवस लागतात. आम्हीं डोंगर पहांटेच्या चार घटका राहिल्या होत्या तेव्हां चढावयास आरंभ केला. प्रातःकाळचा गार वारा मंद मंद वहात होता. चांदण्याच्या प्रकाशानें वनप्रदेश संसारसुखाच्या आशेप्रमाणें अस्पष्ट रमणीय दिसत होता व अहंपणारूप सुवासानें वन दणदणून सोडलें होतें. आम्हीं पांच सहा कोस आलों तरी सुवास भरून राहिला आहे हें पाहून आश्चर्य वाटलें

व अरुणोदयानें दिसूं लागलें तों अनंत बिल्ववृक्ष डोंगरावर लागून राहिले आहेत व त्यांजवर कोंवळ्या आरक्त पल्लवांनीं युक्त सुगंधी पुष्पें भरलीं आहेत असें दृष्टीस पडलें. अगोदर आम्ही शैव, त्यांत पार्थिव पूजा मीं लहानपणापासून घेतली आहे, तेव्हां तें शिवप्रिय वृक्षवन पाहून मला अत्यानंद झाला. कोंकणांत सगळ्या गांवामिळून दोनचार बेलाचीं झाडें असतात, तीं पुनः सगळ्या गांवाच्या पूजेकरितां बोरखडून टाकलेलीं असून त्यांत सबंध त्रिदळ मिळावयाची पंचाईत. अशा अवर्षणाच्या देशांतून आलेल्यां आम्हां उपोषितांस ते कोमल, आरक्त, त्रिदळांनीं भरलेले व सुवासिक पुष्पयुक्त बिल्ववृक्ष पाहून परम हर्ष झाला यांत नवल काय? आम्हीं पुष्कळ पत्रें व पुष्पें खुडलीं व लागलींच एके रस्त्याचे बाजूचे धर्मशाळेंत उतरलों. अफूचे व्यापाराकरितां सरकारनें रस्त्याचे बाजूनें सहा सहा कोसांवर पाण्याच्या आश्रयानें कौलारू बंगले बांधले आहेत, तशा एका बंगल्यांत स्नान व जेवण झाल्यावर पुनः चालूं लागलों. ते दिवस वसंताचे होते, यामुळें वृक्ष सर्व पल्लवित, पुष्पित, फलित झाले होते. रक्तचंदन, मधुप, साग वगैरे वृक्ष मोठमोठाले उंच डोंगरावर दाट लागले होते. कोशिंबाचे वृक्ष अगदीं लाल होऊन गेले होते. मधून मधून भिल्ल लोकांच्या गल्ब्या म्हणजे किल्ले चिरेबंदी तट वगैरें सुद्धां लाखों रुपये खर्च करून बांधलेल्या उंच उंच शिखरावरून रमणीय दिसत होत्या, व रस्त्यावर कोठें पाण्याच्या जागेवर चिरेबंदी चौथरे सोईकरितां बांधलेले दृष्टीस पडले. वाटेनें भिल्लांचीं मातीचीं बांधलेलीं गांवें फार लागलीं.

याप्रमाणें सातपुड्याची शोभा पहात जातां जातां महूच्या छावणीहून तीन मजलाच्या सुमारास संध्याकाळचे वेळेस सडकेच्या बाजूचे बंगल्यांत उतरून जेवणखाण केलें. रात्र चार पांच घटका आली तों दोन पलटणी शिपाई बंगल्यांत उतरावयास आले. प्रवासांत ओळखी तावडतोब होतात; शिवाय ते शिपाई गोव्याकडील असल्यामुळें आम्हीं एकदेशी व एकभाषी जुळलों. मग स्वस्थपणें पानसुपारी खात बसून चोहोंकडील हकीकती व सुखदुःखाच्या गोष्टी सुरू झाल्या. ते सांगूं लागले कीं, आजपासून तिसरे दिवशीं पृथ्वीवर राज्यक्रान्ति होऊन मारामारी, लुटालुटी होणार त्यापेक्षां आम्हाला असें वाटतें कीं, तुम्हीं देशी परत जावें. हें ऐकून आम्हास भीती उत्पन्न झाली व मोठ्या उत्कंठेनें आम्ही त्यांस पुसूं लागलों, " अहो शिपाईबोवा, तुम्ही म्हणतां याचा अर्थ काय? मारामारी

कशासाठीं होणार व कोण करणार ?" तेव्हां त्यांनीं सांगण्यास प्रारंभ केला—

"इंग्रज सरकार आजपर्यंत चांगल्या रीतीनें राज्य करीत आलें परंतु आतां त्यांची बुद्धि नष्ट झाली. गुदस्त सालीं विलायतेहून उत्तम कडामिनीच्या बंदुका आणविल्या व त्या बंदुकांकरितां काडतुसें तयार करीत आहेत. तीं दातांनीं तोडावीं लागतात. एकदम छावणींत अशी गोष्ट झालीं कीं, एक ब्राह्मण शिपाई स्नानास गेला असतां एका चांभारानें त्याजपाशीं लोटा पाणी पिण्यास मागितला. तेव्हां ब्राह्मण म्हणूं लागला कीं, मी लोटा दिला तर तो विटाळेल. हें ऐकून तो रागानें म्हणाला, 'अरे! तुम्ही जात जात म्हणून फार उड्या मारूं नका. हल्लींचीं काडतुसें तयार करितात त्यांस गाईची व डुकराची चरबी लागते व ती चरबी आम्हीं तयार करून देतों. तीं काडतुसें तुम्हीं दातांनीं तोडलींत म्हणजे गाईची चरबी तुमचे तोंडांत जाणार व तुम्हीं बाटणार. उगीच जातीची घमेंड कशाला पाहिजे?' असें होतां होतां दोघे हात-पिटीस आले व पलटणी लोक बहुत जमले व त्यांनीं सर्व वृत्तान्त ऐकिला. काडतुसें बाटविणारीं आहेत ही बातमी थोडक्यांतच चोहींकडे पसरली. गाईच्या चरबीच्या भीतीनें हिंदु व डुकराच्या चरबीच्या भीतीनें मुसलमान सारखे विथरले. सरकार आपणांस युक्तिप्रयुक्तीनें ख्रिस्ती करणार ही भीति सर्वांचे पोटांत उत्पन्न होऊन स्वधर्मरक्षणाकरितां विचार करूं लागले. शिपाई लोकांनीं आम्ही काडतुसें घेणार नाहीं असें आपापले मुख्य अधिकाऱ्यांस कळविलें, व तो मजकूर कलकत्त्यास गव्हर्नरसाहेब यांस समजला. काडतुसाचें वर्तमान इतक्या जलदीनें चोहींकडे पसरलें कीं त्याची कल्पनासुद्धां करवत नाहीं.

"काडतुसाबद्दल हिंदु व मुसलमान शिपायांत गवगवा चालला आहे ही गोष्ट फौजेंतील ऑफिसर लोकांस माहीत होती व कित्येक राजनिष्ठ शिपायांनीं याजपासून दंगा होण्याचा संभव आहे असेंहि त्यांस केव्हां केव्हां मुद्दाम पत्रें पाठवून कळविलें होतें. परंतु याजपासून कांहीं भयंकर परिणाम घडतील असें कोणाच्याहि लक्षांत आलें नाहीं. कलकत्त्यास काडतुसांचे प्रकरणाचा निकाल करावा याजकरितां विलायतेहून एक साहेब आला व त्याचे आणि गव्हर्नर साहेबांचे विचारें असें ठरलें कीं, हीं काडतुसें खुषीनें किंवा बळजबरीनें सर्व पलटणीच्या शिपायांस वांटलीं पाहिजेत. यांत धर्माची वगैरे कांहींएक बाब न

ऐकतां जूनचे दहावे तारखेस प्रत्येक ऑफिसर लोकांनीं आपले पलटणीचे शिपाई विनहत्यार सकाळचे दहा वाजतां परेडीचे जागयावर बोलावून वेलाशक त्यांजकडून काडतुसें घेववावीं. जीं पलटणें घेतील त्यांस हत्यारें घेऊन यावीं, न घेतील त्यांचें काय करावें याचा मागाहून निकाल होईल. याप्रमाणें धर्मसंबंधें एकंकार करणारा हुकूम कलकत्त्याहून सुटला आहे.

"इंग्रज सरकारचे मनांत हिंदु व मुसलमान यांच्या धर्माचा कोणत्याहि प्रकारचा मान ठेवावयाचा नाहीं, व होईल तितकी ख्रिस्ती धर्मास मदत करावयाची, असा निश्चय ठरल्यावरून त्यांनीं हें काडतुसांचेंच प्रकरण काढलें असें नाहीं. हिंदुधर्मशास्त्रांत सांगितलेल्या गोष्टी चालवूं नयेत अशाबद्दल एक चौऱ्यांशीं कलमांची याद तयार करवून हिंदु राजेरजवाडे यांची एक सभा कलकत्त्यास भरविली. त्या सभेंत सर्वांस पाचारण केलें होतें. शिंदे, होळकर, गायकवाड, धुळपुकार, विलखियाचा राजा, दतीयेवाले व ओडशीवाले वगैरे सर्व बडे लोकांस बोलावणीं केलीं. त्यांत नानासाहेब पेशवे, लखनूरची बेगम, झांशीची राणी व दिल्लीचा फिरोजशाहा यांस मात्र बोलावणें झालें नाहीं. बाकी दरोबस्त वडे लोक राजे व मांडलीक यांस बोलावणीं सरकारनें कलकत्त्यास यावें म्हणून केलीं. सर्व लोक आपापले जागीं योग्य सत्कार होऊन वसल्यावर सभेपुढें ती याद वाचली. त्या यादीचा मुख्य सारांश असा होता कीं, हिंदु–मुसलमान यांचे धर्मासंबंधें कायद्यानें कांहींएक हक्क ठेवावयाचे नाहींत. उदाहरणार्थ, एक कलम असें होतें कीं जर चौघां भावांपैकीं एक इसम पक्का बाटला म्हणजे ख्रिस्ती झाला तर त्याचा वांटणीसंबंधें हक्क जाऊं नये, तो पतित झाला तरी त्यानें आपला भाग घेऊन घरांत जेथें वांटणी येईल तेथें रहावें. दुसरें एक कलम असें होतें कीं, हिंदुधर्मात पुनर्विवाह स्त्रियांनीं करूं नये असें लिहिलें आहे. करतील तर त्यांस पतित समजून जातीबाहेर टाकाव्या. असें असतां असा ठराव करण्यांत आला कीं, जर कोणी विधवा पुनर्विवाह करील तर तिचे मुलगे हे पतित नव्हत व तिला जिंदगी वगैरेचा सर्व हक्क आहे. असो. याप्रमाणें हिंदु-मुसलमान धर्माचा अपमान करणारीं कलमें त्या यादींत पुष्कळ होतीं. याद सभेंत वाचून दाखवून, ही याद तुम्हांस कबूल केली पाहिजे व याप्रमाणें पुढें आम्ही हिंदुस्थानांत कायदा चालविणार अशी समजूत दिली. त्या वेळेस बाणपूरचा राजा उठून सभेंत बोलूं लागला कीं, 'हें

हिंदुस्थान भरतखंड जंबुद्वीप आहे. या भूमीस कर्मभूमि असें म्हणतात. या द्वीपाला लागून सर्व सिंहलद्वीपादि आहेत. परंतु हिंदूचें मुख्य हेंच आहे. तर हिंदूचे देवास आमचा कंटाळा आला असल्यास साहेबाचे म्हणण्याप्रमाणें कबूल होईल, नाहींपेक्षां जें होणें तें होवो. सार्वभौम राजा प्रजेस अधर्माच्या गोष्टी करण्याविषयीं जरी उपदेश करील तथापि प्रजा ऐकणार नाहीं. जर करितां चौऱ्यांशीं कलमें अंमलांत आणावयाचीं आहेत तर धर्मसंबंधीं बखेडा होईल.'* नंतर एक नबाव उठून बोलला कीं, 'या हिंदुस्थानांत मुसलमान व हिंदु एके ठिकाणीं राहात आहेत, परंतु परस्परांचे धर्मास उपद्रव करीत नाहींत. या उभयतांचे धर्मास हानि करणरा राजा जय पावत नाहीं. पहा, दिल्लीचे तक्तावरच्या बादशहाचे मनांत हिंदुधर्म बुडवून सर्व मुसलमानी करावी असें येतांच त्याचें सार्वभौमत्व नाहींसें झालें. याजकरितां इंग्रज सरकारांनीं या यादींतील कलमें अमलांत आणूं नये.' याप्रमाणें त्या सभेंत अनेक भाषणें झालीं असें ऐकतों, परंतु त्यांचा उपयोग झाला नाहीं व राजेरजवाडे लोक आपापले ठिकाणीं नाखुष होऊन परत गेले.

"त्या समयीं तेथेंच लोक बोलूं लागले कीं, आतां ज्या चात्यानें विचार पहावा. पृथ्वीवर मनुष्यांचा संहार होणार. हिंदु लोक व मुसलमान लोक धर्माविषयीं आम्ही मरूं परंतु बेधर्मी होणार नाहीं असा निश्चय करून एक विचार करून वागूं लागले आहेत. ती नेमलेली तारीख आजपासून तीन दिवसांवर आली आहे. ठरलेल्या तारखेच्या दिवशीं अधिकारी यांस धर्माकरितां आम्ही काडतुसें घेणार नाहीं असें तीनवार सांगून पाहावें, नाहीं म्हणतील तर लागलीच त्या त्या

* पराचा कावळा होऊन लोकांत कशा प्रकारच्या कंड्या पिकतात याचें वरील भाषणांत चांगलें चित्र आहे. सन १८५७ चे नुकतें पूर्वीं म्हणजे सन १८५६ त लोकांच्या आग्रहावरून विधवाविवाहाचा कायदा पसार झाला होता. तसाच ख्रिस्ती झालेल्या लोकांचा हक्क कायम ठेवणारा कायदाहि त्याच वर्षी पसार झाला, त्यामुळें सरकारचा धर्मसंबंधांत हात घालण्याचा विचार आहे अशी लोकांत भीति साहजिकच उत्पन्न झाली. इतक्यांत काडतुसांचें प्रकरण उपस्थित झालें. याच संधीस म्हणजे मार्च सन १८५७ त जयाजीराव शिंदे कलकत्त्यास गव्हर्नर जनरलचे भेटीस गेले होते. (केचा बंडाचा इतिहास, पान ५३८) या सर्व गोष्टींवर वरील कल्पना रचिल्या असाव्या.

छावणींत जे गोरे लोक असतील त्यांस कापून काढून दारूगोळा, मेगजीन खजिना गुदामसुद्धां आपले ताब्यांत घेऊन छावणीस आग लावून द्यावी अशीं गुप्त पत्रें ठिकठिकाणीं मिरत येथील छावणींतून गेलीं आहेत. अशी भयंकर स्थिति आजपासून तिसरे दिवशीं हिंदुस्थानांत येणार, सबब आम्हीं रजा घेतली आहे. आम्ही घरीं मुलांमाणसांत जाणार. तुम्ही दक्षिणी ब्राह्मण पुढें जाण्याचा विचार करीत असल्यास फार संकटांत पडाल. तुम्हीं परत जावें हें फार चांगलें असें आम्हांस वाटतें." हा मजकूर ऐकून आम्ही फार घोटाळ्यांत पडलों. यज्ञाकरितां एथवर दूर आल्यावर कांहीं तरी पैसा मिळाल्याशिवाय देशीं परत जाणें फार जिवावर आलें. शेवटीं असें ठरविलें कीं, आपण लढवई लोक नाहीं, गरीब भिक्षुक ब्राह्मण आहों. काळे लोक एकत्र होऊन धर्माकरितां भांडतात तर आपल्यास भय नाहीं. असा विचार ठरून नित्याप्रमाणें पहांटेस उठून गाड्या भरून चालूं लागलों. वाटेनें पांच-चारदां शिपाई लोक भेटले, त्यांनीं सांगितलें कीं, तुम्ही यात्रेकरी लोक कसे सुरक्षित जाल तें खरें. निदान जूनचे दहावे तारखेपर्यंत इंदूर शहरांत तरी जावें. आम्ही तसेच जोरानें पुढें चाललों. सायंकाळीं एके बंगल्यांत वस्ती केली. तेथेंहि तोच मजकूर ऐकिला. उजाडत तारीख दहावी येऊन पोंचली. नित्याप्रमाणें गाड्या भरून आम्ही सर्व पुरुष चालूं लागलों. आपल्यास मह्रूचे छावणीवरून जाणें आहे. ती उलटेपर्यंत दगा आहे. एकदां मह्रू उलटली म्हणजे सुटलों. अशा धास्तीनें व आशेनें रस्ता जोरानें आक्रमीत असतां सकाळचे दहा वाजायचा सुमार झाला. मह्रूची छावणी मैलावर राहिली. तों एकाएकीं तोफांचे आवाज व बंदुकींचे आवाज शतावधि होऊन दिशा गुंग झाल्या; त्या बाजूस धुराचा कल्लोळ होऊन दिसेनासें झालें. आमचे मंडळींचे प्राण कंठांत आले. आतां काय होतें या धास्तीनें मंडळी निस्तेज झाली. परंतु पूर्वी निश्चय केल्याप्रमाणें हळूहळू पुढें चालूं लागलों; तशांत मागें फिरणेंहि दुरापास्तच होतें. छावणीचे जवळ येऊन पोंचलों, तों ती फार मोठी आहे असें दृष्टीस पडलें. उत्तर व दक्षिण हिंदुस्थान यांमधील नाकें असल्याकारणानें सुमारें तीन कोसपर्यंत पसरली होती, तेवढी सर्व पेटवून दिली होती. वायु फार सुटल्यामुळें अग्नीच्या ज्वाळा भयंकर चालल्या होत्या. मध्यान्हींचा समय झाल्याकारणानें ग्रीष्म सूर्याचें अत्यंत प्रखर

तेज वरतून पडलें होतें. सर्व जिकडे तिकडे भणभणीत व उदासीन दिसत होतें. काळे लोक बेदिल होऊन एकमेकांस आरोळ्या मारीत होते. असा भयंकर अनर्थ व कलकलाट होऊन गेला होता.

आम्ही जवळ जातांच दोन-तीनशें लोक धांवत येऊन आम्हांभोंवतीं गराडा घातला व गाड्या एकदम उभ्या केल्या. आमची मंडळी धास्तीनें होरपळून गेली होती, परंतु मी धीर धरून बोलूं लागलों, "अहो शिपाईबोवा, आम्ही गरीब भिक्षुक ब्राह्मण आहों. पुणें प्रान्तांत राहतों. बायजाबाईसाहेब शिंदी सर्वतोमुख यज्ञ करणार आहेत म्हणून पत्रें आल्यामुळें आम्ही यज्ञास जात आहों. आम्हांपाशीं पोथ्यापुस्तकें आहेत हीं आपण पहावींत. तुम्ही हिंदु-धर्मासाठीं जर इंग्रजावरोबर भांडतां तर आम्हां गरीब वेदशास्त्र पढलेले ब्राह्मणांस लूटमार करणें तुम्हांस यशस्वी होणार नाहीं. तुम्ही आमचें या दंग्यांत संरक्षण करून आमची एकाद्या शहरांत सोय लावून द्या. या गोष्टीनें तुम्हांस जय येईल व दुःख पडणार नाहीं. या * तारखेस दंगा होणार हें आम्हांस तीन दिवस अगोदर माहीत आहे. परंतु आम्ही निर्भय आहों. कारण काळे लोक जर धर्मासाठीं भांडणार तर आम्हां वेदशास्त्रसंपन्न गरीब भिक्षुकांस बिलकुल भय नाहीं." इत्यादि माझें बोलणें ऐकून व आमच्या पोथ्या वगैरे पाहून त्यांनीं एकदम आम्हांस असें सांगितलें कीं, आतां यज्ञ तर राहिला; परंतु तुम्हीं निर्भयपणें आम्हांबरोबर असावें. खर्चवेचाची कांहींएक काळजी करूं नये. इतक्यांत रस्त्यानें घोड्याच्या गाडीचें टपाल आलें. शिपाई लोकांनीं त्याजवर हल्ला करून डाकवाल्यास ठार मारून दोनतीन ओझीं कागद माळावर फेकून दिले व लोकांच्या बंग्या वगैरे आपल्या ताब्यांत घेतल्या. नंतर तारायंत्राचे खांब उपटून तारांच्या हातीं धरण्यास काठ्या केल्या.

याप्रमाणें त्या झोटिंग लोकांच्या स्वाधीन आम्ही झाल्यावर त्यांनीं पाण्याचे नजीक एका लिंबाचे झाडाखालीं आम्हांस उतरावयास जागा दिली. तेथें गाड्यांसुद्धां उतरून स्नानसंध्या-भोजनादि कृत्यें आटोपलीं. काळे लोक बायका-पोरेंसुद्धां बाहेर पडले होते. काळे लोक फौजेसह रिसाला वगैरे बरोबर घेऊन इंदुराकडे कूच करूं लागले. मजल दरमजल उज्जयिनीवर येऊन दोन कोसांवर पाणी

* के चा इतिहास पाहतां हा दंगा तारीख १ जुलैस झाला असें दिसतें.

झाडी चांगली पाहून सर्व फ़ौज उतरली. आम्हासहि फौजेंतच जागा उतरावयास दिली होती. नित्यकर्म आटोपल्यावर मोठ्या दिलगीर वृत्तीनें एके ठिकाणीं बसून विचार सुरु झाला, “ या बिघडलेल्या लोकांपासून आपली सुटका कशी होणार. हे लोक आपल्या जिवावर उदार झाले आहेत व नेहमीं मारूं मरूं याशिवाय त्यांस दुसरें कांहीं सुचत नाहीं. यांजबरोबर राहून आपल्यास सुख व्हावयाचें नाहीं. शिवाय आपल्यास राहण्यावागण्याची फार अडचण होऊन गेली आहे. देतील तितकें खाल्लें पाहिजे. निघतील तेव्हां निघालें पाहिजे. रात्रीं बेरात्रीं चाललें पाहिजे. एक घटका दिवस राहिला कीं बिकिट लागून जिकडे तिकडे पाहरेबंदी होणार. मग शौचासमुद्धां जाण्याची हाकाहाक. थेट हवलदारापर्यंत वर्दी पोंचवून परवानगी काढावी लागते. आणि शिवाय फिरतांना वेडेंवांकडें पाऊल पडलें तर पटकन् एकादी गोळी लागून स्वर्गयात्रा आपोआपच घडणार. तेव्हां कांहीं योग्य कारण दाखवून त्यांचे त्रासांतून सुटून गेलों तर पुनर्जन्म झाला असें समजून परमेश्वराचे आभार मानूं.” इत्यादि विचार झाल्यावर दोन तीन पलटणी सुभेदार माझे परिचयाचे झाले होते त्यांजपाशीं मी संधि पाहून स्वतः गेलों आणि बोलूं लागलों, “ सुभेदार, आम्ही तुम्हाबरोबर आज आठदहा रोज राहिलों. आम्हांस फार सुख झालें. कोणतीच आम्हांस न्यूनता नाहीं. इंदूर मुक्कामीं आमचे पुण्याहून आणलेले गाडीवान ठरल्याप्रमाणें सोडून गेले, तरी तुम्ही आम्हांस गाडया देऊन एथवर आणिलें हे उपकार या दिवसांत फारच आहेत. आतां आमचा घरून निघाल्यापासून अभिप्राय असा आहे कीं, द्रव्य मिळेल तें मिळवावें व यात्रा घडतील त्या कराव्या. हल्लीं ही उज्जयिनी नगरी आली आहे. इजला अवंतिका म्हणतात. येथें ज्योतिर्लिंग श्रीमहाकाळेश्वर आहे. क्षिप्रा नामक गंगा आहे. हें क्षेत्र श्रीकाशी क्षेत्रासमान आहे. यास्तव येथें क्षेत्रोपोषण करून क्षौर वगैरे प्रायश्चित्तें करावीं व श्राद्धादि कृत्यें धर्माप्रमाणें करावीं असें आमचे मनांत फार आहे. यास्तव आपण कृपा करून गाड्या देऊन आम्हांस क्षेत्रांत पोंचविलें पाहिजे. उज्जयिनी जवळ आहे खरी परंतु अराजक असल्यामुळें एकटें जाण्यास आम्हांस फार भय वाटतें. यास्तव मेहेरबानीनें इतकें आमचें केलें तसें बंदोबस्ताकरितां लोक बरोबर देऊन क्षेत्रीं आम्हांस पोचतें करावें.” इतकें म्हणून स्वस्थ राहिलों.

बंडवाले लोकांची धर्मावर श्रद्धा फार चांगली होती. अद्याप निर्दय व निरर्थक मारहाण व कामक्रोधादिकांचें प्राबल्य बंडाच्या बाल्यावस्थेमुळें त्यांचे ठिकाणीं वसूं लागलें नव्हतें. त्या भाविक सुभेदारांनीं माझें म्हणणें स्वस्थपणें ऐकून घेतलें, व संतोषानें उदईक प्रातःकाळीं तुमची रवानगी करितों असें तावडतोब सांगितलें. दुसरे दिवशीं उजाडतां कांहीं गाड्या व सुमारें पंचवीस शिपाई बरोबर घेऊन सुभेदार आम्ही होतों तेथें आले. आमच्या पायांवर डोकीं ठेवून दर ब्राह्मणास दोन दोन रुपये दक्षिणा दिली व आम्हांस गाड्यांत बसवून पन्नास कदमपर्यंत बोळवीत येऊन नमस्कार करून परतले. ते पुढें शिंदे सरकारचा आश्रय मिळविण्याकरतां निघून जाणार असा त्यांचा अभिप्राय आम्हांस समजला होता. आम्हांस मोठ्या संकटांतून सोडविलें याजबद्दल अवंतिका क्षेत्राची मोठी आभारपूर्वक स्तुति करीत चवाठ्यावर येऊन पोंचलों. तेथें गाड्या रिकाम्या करून शिपायांच्या स्वाधीन केल्या व ते आम्हांस रामराम करून परत निघून गेले. आमचेबरोबरचे लोक आपापले बिऱ्हाडाचे पत्ते लावून निघून गेले. आम्हीं वरसईकर मिळून दानाध्यक्ष वैशंपायन यांचे आप्त विष्णुपंत जोशी उज्जयिनींत राहतात असें माहीत असल्यावरून त्यांचा शोध काढीत द्वारकाधीशाचे मंदिरांत गेलों. तेथें शोध लागला, त्यांची भेटहि झाली. आम्हांस सुरक्षित पाहून त्यांस फार आनंद झाला व आम्हांस सांगूं लागले कीं, ' वैशंपायन यांजकडून पत्र आल्यास पांचचार रोज झाले. त्यांत मजकूर असा कीं, आमचे जांवई कर्वे गोडशासहवर्तमान इकडे येण्यास निघाल्याचें पुण्याहून पत्र आलें आहे. ते आपल्यास भेटल्यास त्यांस कळवावें कीं, तूर्त इकडे येऊं नये. दंगा फार आहे, दंगा कमी झाल्यावर पत्र येईल तेव्हां यावें. तेव्हां आतां तुम्हीं येथेंच राहावें.' हें भाकित आम्हांस पूर्वीच कळलें होतें. मग विष्णुपंत यांजकडेच बिऱ्हाड ठेविलें व यथाक्रम यथावकाश क्षेत्रकृत्यें आटोपलीं.

उज्जयिनी क्षेत्रांत बराच मुक्काम घडला. क्षेत्रांत क्षेत्रचालीप्रमाणें दाट वस्ती व अरुंद, दगडांनीं माचून काढलेले रस्ते आहेत. हें शहर फार प्राचीन असून येथें मोठमोठाले इतिहासप्रसिद्ध विक्रमादि चक्रवर्ती होऊन गेले. त्यांच्या अमानुष महत्त्वाची साक्ष देणारीं अशीं मोठमोठालीं दोन ताड उंचीचीं व पंधरा वीस हात रुंदीचीं भिंताडें चुनेगची बरीच दृष्टीस पडतात. असें म्हणतात कीं, उज्जयिनी नगरी

पालथी घातली आहे. तेथें नवीन विटा भाजण्याची जरूरी नाहीं. बहुतकरून भुई-मध्यें जुन्या विटा सांपडतात. एकादें जमिनींत भिंताड लागलें म्हणजे मोठ्या इमारतीचें काम होतें. येथें भर्तृहरी पूर्वी राज्य करीत होता. त्यास विषयसंबंधें अति पश्चात्ताप होऊन सर्व राज्य सोडून विदेही होऊन तपश्चर्येस बसला, त्या गुहेस हल्लीं भर्तृहरीची गुंफा म्हणतात. तें ठिकाण भैरवगडावर असून फार रमणीय, शान्त-रसानुकूल आहे. अशी उज्जयिनीची मजा पहात पहात पांच सहा दिवस लोटले. बंडासंबंधें दररोज नवीन नवीन बातम्या येऊन जिकडे तिकडे हालचाल होऊन गेली होती. तों एके दिवशीं धारचा राजा मरण पावल्याची खबर आली. धारेस पवार या नांवाचे राजे राज्य करीत होते. हल्लींचा राजा फार चांगला, शूर, विचारी, शहाणा व धर्मशील असा होता. राज्य चांगलें चालत असल्यामुळें खजिन्यांत द्रव्य सांठलें होतें. वृद्ध झाला तरी पोटीं पुत्रसंतान नसल्यामुळें विरक्ति उत्पन्न होऊन त्यानें पुष्कळ दानधर्म केला; व नाशिक, त्र्यंबक, वांई, पंढरपुर वगैरे पुष्कळ यात्रा केल्या व पुढें काशीयात्रेची तयारी झाली होती. दिवाणजींनीं शालजोड्या, धोतरें, पीताम्बर वगैरे ब्राह्मणांस देण्याकरितां तयार करून ठेविलें होतें, व खर्चास आठ लक्ष रुपये रोख तयार होते. तों कोणी दुष्टांनीं त्या सुशील राजास मूठ मारिली. "मनसा चिंतितं कार्यं दैवमन्यच्च चिंतयेत्" त्यानें मरण-समयीं आपल्या निकट संबंधाचा एक मुलगा दत्तक घेतला. नंतर राणी व दिवाणजी यांचे विचारें असें ठरलें कीं, यात्रेनिमित्त काढलेला सर्व पैसा उत्तरकार्यास लावावयाचा. त्याप्रमाणें उत्तरकार्यांतील दक्षिणा मिळविण्याकरितां उज्जयिनींतून ब्राह्मणांच्या झुंडीच्या झुंडी निघाल्या. मजला बातमी समजतांच येथें स्वस्थ बसण्यापेक्षां धार शहर व उत्तरकार्याची मौज पाहून यावें, असें माझे मनांत फार भरलें. तेव्हां काकांजवळ गोष्ट काढिली कीं, "आपणास मर्तिकासंबंधें दान बिलकूल घ्यावयाचें नाहीं. परंतु आपण मेहनत करून दानखंड, दानचंद्रिका, दानमयूखादि मोठमोठे ग्रंथ पाहिले आहेत; कोणत्या दानास दानांग होम आहे, कोणत्यास नाहीं, कोणत्या दानास ब्राह्मणास किती पावलें पोंचवावें वगैरे प्रयोग प्रत्यक्ष पाहण्यास सांपडतील. आजपर्यन्त असा लाखों रुपयांचा उत्तरकार्यास दानधर्म झाला नाहीं व पुढेंहि होणें कठिण. यास्तव येथें तरी स्वस्थ बसणें आहे, त्यापेक्षां आठदहा रोजांत सर्व कृत्य जाऊन पाहून येऊं." काकांचे मनांत हीं

बोंष्ट भरली व दुसरे दिवशीं कर्वे यांचा निरोप घेऊन आम्ही उज्जयिनींतून निघालों. वाटेंत चर्मण्वती नदीचें मनोहर पात्र लागलें. तेथें हजारों ब्राह्मण चोंहींकडून जमले होते. यथेच्छ स्नानसंध्या, भोजनादि करून मजल दरमजल करीत धारानगरींत शिरलों; तों सर्व शहर ब्राह्मणांनीं भरून राहिलें आहे असें दिसलें. उज्जयिनी, इंदूर, देवास वगैरे ठिकाणांहून सुमारें दहा हजार दक्षिणी ब्राह्मण दक्षिणार्थ जमला होता. शहरांत ब्राह्मणाकडे तर जागा उतरण्यास राहिलीच नव्हती. पण शूद्राकडेहि मिळण्याची पंचाईत झाली होती. शहरांत शिरल्यापासून एक प्रहरभर बिऱ्हाड ठेवण्यास जागा शोधीत होतों. परंतु मिळेना. शेवटीं बाजारांत एक दक्षिणी सोनार पाहून त्याचे दुकानाचे ओट्यावर नको नको म्हणतां ओझें ठेवून उभयतां बसलोंच. जागा मिळावयाची नाहीं असें ते निक्षून सांगतच होते, पण आम्ही बटवा काढून पानसुपारी, तंबाखु काढली व त्याला दिली व बोलूं लागलों, "आम्ही मुशाफर आहों, आम्हांस मागीलदारीं फक्त जेवण करण्यास जागा दिली तर फार मेहेरबानी होईल. आम्ही या ओट्या-वर निजत जाऊं, तुम्हांस बिलकुल तोशीस लागूं देणार नाहीं." अशी पुष्कळ गळ. घातल्यावर सोनारानें कबूल केलें. आम्हीं तेथें बिऱ्हाड लाविलें व रात्रीं फराळ करून स्वस्थ निजलों. दुसरे दिवशीं उठून शहरांत दानें कोठें होणार त्या जागेचा शोध करीत करीत नगराचे उत्तरेस दानशाळा सांपडली. तेथें पाहतों तों मोठा हत्ती जाण्यासारखा दरवाजा असून चोहोंकडून बांधलेली जागा दृष्टीस पडली. दानें सर्व आंत होणार; बाहेर पिंपळाचे पार दोन तीन होते, त्याचे छायेखालीं सर्वांनीं जमा व्हावें; ज्याचें नांव निघेल त्यानें आंत जावें, असा बेत दिसला. तेव्हां ज्या हेतूनें आपण आलों तो सिद्धीस जात नाहीं व बाहेर राहिल्यानें दानविधि दृष्टीस पडणार नाहीं असा विचार पडला. बिऱ्हाडीं येऊन स्नानसंध्यादि आटोपून बाजारचा शिधा सरंजाम आणला व भोजन केलें. तिसरे प्रहरीं दानशाळेंत जाण्याची परवानगी कशी मिळवावी याचा विचार करूं लागलों. परंतु रस्ता सुचेना. शेवटीं दानाध्यक्षाच्या नांवाचा एक अर्ज लिहिला. "आम्ही देशान्तरचे ब्राह्मण आहों. यात्रेस जातांना उज्जयिनींत येथील सर्व दुःखकारक हकीकत कळली. आम्हांस मृतासंबंधें दान बिलकुल घ्यावयाचें नाहीं; परंतु दानसमारंभ पाहण्याची फार इच्छा आहे. अलीकडे दानधर्मास एवढा खर्च

कोणीं केला नाहीं व पुढेंहि विचारच आहे. त्यापेक्षां सविधि दानप्रयोग पहाण्याचे इराद्यानें येथें आलों आहों. परंतु दानशाळेंत जाण्यास परवानगी लागते, याज- करितां तेवढी परवानगी द्याल तर फार उपकार होतील. मिळत नसल्यास परत गेलें पाहिजे." असा मजकूर लिहून दानाध्यक्षाचे घराचा शोध काढून शिपायाचे हातें अर्ज लावून दिला. अर्जाप्रमाणें तावडतोब परवानगी चिठ्या मिळाल्या. दुसरे दिवशीं सकाळींच भोजन आटोपून चिठ्या दरवाजावर दाखवून दानशाळेंत गेलों. आंत यादीचे ब्राह्मण सुमारें दोनशें जमले होते. एकंदर अनेक दानें झालीं. ऐन्याच्या अंबारीसह सालंकार एक हत्ती दिला. वरती आठ हजार रुपये दक्षिणा दिली. शिवाय नुसते तीन हत्ती पांच हजार दक्षिणा देऊन दिले. चार घोडे, तीन उंट, दहा बैल, नऊ म्हशी व तेरा दासी दिल्या. एक शय्यादान झालें. महादानाचे ब्राह्मणास पायजमा, धोतरजोडा, अंगरखा, शिपाईगिरी पागोटें, ढाल, तरवार व पुष्पाचा हार इतकें सामान चढवून पूजा करून गुलाल उडवून जितकीं पावलें यजमानानें बरोबर आलें पाहिजे तितकीं पावलें यजमानानें पोंचवून दरवाजावाटे बाहेर काढून द्यावा. बाहेर पडल्यावर त्याची छी थू काय विचारावी. बाहेर हजारों तेलंग वगैरे लोक जमलेले असतच. त्यांनीं हुर्यो करून त्या बिचाऱ्यावर शेणमार करावा. दासी दान घेणाराची तर फारच फजिती. एखाद्या सुंदर सर्वालंकारयुक्त असा दासीचा पदर एखाद्या गरीब बावळ्या ब्राह्मणाचे धोतराशीं बांधून त्याची दरवाजाबाहेर धिंड निघाली म्हणजे लोकांच्या चावनट थट्टांनीं व शेणमारांनीं त्यांची दुर्दशा दुर्दशा होऊन जाई. तशांत ती दासी लुची असली म्हणजे त्या ब्राह्मणाबरोबर झराझर चालेनाशी झाली कीं ब्राह्मण गर्था- वर्या होई. शय्यादान घेणारा मनुष्य एक यजुर्वेदी होता. त्यास ताटीवर बसवून एक सोन्याचा मृत देह करून त्याजजवळ ठेवून ताटी चार माणसांचे खांद्यावर देऊन दरवाजाबाहेर काढून दिली. हत्तीदानाचे लोक शहराबाहेर आले कीं पुन्हा राजाचे सेवकास हत्ती विकून टाकीत. कारण फुकट मिळाला तरी हत्ती रंकाला काय होय? याप्रमाणें तीन दिवस प्रातःकाळपासून बारावर चार वाजेतोंपर्यंत दानांची मौज पाहिली. चौथे दिवशीं भूयसीचा संकल्प होऊन अनुष्ठान पाहण्यास शिष्ठ बसत होते त्यांची याद होऊन प्रत्येकास पांच पांच रुपये व धोतरजोडे मिळाले. आम्हांसहि मिळाले. नंतर एक दिवस राजधानी सर्व हिंडून पाहिली.

धारानगर फार टुमदार आहे. तेथें भोज वगैरे राजे राज्य करीत होते, अशा कथा आहेतच. या शहरास दगडी चुन्याचा कोट आहे. कोटाबाहेर तलाव पुष्कळ आहेत. पाणी महामूर आहे. अडीच साडेतीन हातांचे आंत मोटेइतकें पाणी लागतें, याजमुळें बागबगीचे फार सुरेख असून बागाइती उत्पन्न अति स्वस्त आहे; भाजीपाला, केळीचीं पानें, पुष्पें व फळें या शहरासारखीं दुसरीं कोठें मिळत नाहींत. धारानगरचे पश्चिमेस तीन चार मैलांवर एक लहान पर्वत आहे. त्याजवर कविश्रेष्ठ कालिदास याची वरद देवता श्रीमहाकालिका इचें देवालय सुरेख आहे. देवस्थानची नेमणूकहि फार खाशी आहे. चौघडा आहे. पूजेचें साहित्य, समया वगैरे सर्व रुप्याचें आहे. कालिकेचें दर्शन घेऊन आम्ही धारेहून निघालों. उज्जयिनीस आलों तों वैशंपायन यांजकडून इंदूराहून पत्र आलेलें कर्वे यांनीं दाखविलें. त्यांत मजकूर कीं, 'दंगा लवकर मोडेल असें वाटत नाहीं. तरी शिंदे सरकारचे शिपाई सुमारें पंचवीस तीस उज्जयिनीहून येणार आहेत. त्यांची सोबत पाहून सर्वांसह निघून यावें.' नंतर लागलींच शिपायांचा शोध लाविला, व त्यांजबरोबर भाड्याच्या गाड्या करून ग्वाल्हेरीस जाण्यास निघालों.

वाटेनें सारंगपुर म्हणून एक टुमदार शहर लागलें. येथील वस्ती चांगली असून बाजारपेठेंत भर मजल्याच्या हवेल्या आहेत. देवळें फार मनोहर आहेत. शहरचे दोन्ही बाजूनें नदी निकट वाहात आहे व बाहेर हिरवें गार बागाईत लागून गेलें आहे. अशीं शहरें पहात पहात ग्वाल्हेरीस पोंचलों; व वैशंपायन यांजकडे उतरलों. चोहोंकडे दंगे उत्पन्न झाल्याकारणानें यज्ञ राहिला होता, परंतु बायजाबाईसाहेबांनीं दक्षिणेंतून आलेल्या ब्राह्मणांची बरदास्त चांगली ठेविली होती. पावसाळा सुरू असल्याकारणानें बहुतेक मंडळी चातुर्मास्य तेथेंच राहिली. त्यांस बाईसाहेब दरमहा दहा रुपये खर्चाबद्दल पोंचवीत असत. आम्हीहि मुजुमदार यांचे वाड्यांत स्वतंत्र बिऱ्हाड करून स्वस्थ चार महिने राहिलों. ग्वाल्हेर किल्ल्यापासून नजीकच लहानसा गांव आहे. महादजी शिंदे बादशहावर स्वारी करण्याकरितां बरोबर मोठें लष्कर तोफखाना घेऊन जातांना येथेंच मुक्काम केला. येथून स्वाऱ्या करून शत्रूंपासून खंडण्या घेऊन जय होत गेला. याजमुळें येथेंच वाडा बांधून राहिले. लष्करी लोक जेथें जेथें उतरले होते तेथेंच घर बांधून राहिले.

एकंदर लष्कर वसाहत सुमारें तीन–साडेतीन कोस झाली आहे; भोंवतालीं भुंडे डोंगराचें एक कडेंच आहे. झाडी कोठेंच नाहीं. शहरांत कोठें कोठें तलाव उकरले आहेत, राजधानीचे रस्ते प्रशस्त असून फरसबंदीचे आहेत. शहराजवळ फुलबाग म्हणून फार विस्तीर्ण सुंदर उपवन आहे. त्यांत नाना तऱ्हेचे देशोदेशींचे वृक्षवेल, पुष्पवाटिका असून मध्यभागीं हवा खाण्याकरितां एक जलमंदिर बांधलें आहे. त्याचें काम पाहण्यालायक आहे. तेथून सुमारें चार मैलांवर नदी आहे. त्या नदीचे कांठावर मोठी शिंदेसरकारची छावणी आहे.

याप्रमाणें ग्वाल्हेरींत सकाळ–संध्याकाळ फिरून चातुर्मासाचे दिवस काढले. शहरांत एका नामांकित गृहस्थाचे येथें आषाढ महिन्यांत मुलाचा व्रतबंध झाला. त्याजबद्दल मोठें प्रामण्यच माजलें. त्यामुळें लोकोत्तर विद्वानांच्या सभा पाहण्यास सांपडल्या. हा फार अलभ्य लाभ झाला. वेदशास्त्रसंपन्न तातु दीक्षित हे फार विद्वान् वेदशास्त्रनिष्णात होते, व त्यांच्या मतावरून व्रतबंध झाला होता. त्यांनीं विठ्ठलमंदिरांत स्मृतिवाक्यें, सूत्रप्रमाणें व मैत्रायणीय परिशिष्टावरून आषाढांत उपनयन विष्णुशयन होईतोंपर्यंत करावें असें सिद्ध केलें. व पंचगौडांत अशी वहिवाट आहे, असें एका मथुरेच्या ब्राह्मणाचे साक्षीवरून ठरलें. सारांश, मुंज शास्त्रोक्त ठरून सभा विसर्जन झाली. कार्तिकांत बाईसाहेबांनीं दक्षिणेंतून आलेल्या ब्राह्मणांची सभा करवून बिदागिरी दिली. त्यांत आम्हांस पीताम्बर व दीडशें रुपये रोख मिळाले. याप्रमाणें ग्वाल्हेरीचें कार्य मनाजोगें झाल्यावर आतां पुढें काय करावें याविषयीं विचार करूं लागलों.

---

## ३ : : : बंडवाल्यांची हकीकत

**सहसा विदधीत न क्रियामविवेकःपरमापदां पदम् ।**

ग्वाल्हेरींत असतांना बंडाच्या बातम्या दररोज आम्हास ऐकूं येतच होत्या. आज ही पलटण उठली, उद्यां ती उठली, येणेंकरून सर्व लोकांची मनें घांदलून गेलीं होतीं व निरनिराळ्या लोकांचे नाना तरंग चालत होते. कोणी सव्वा हात रंभापत्रावरच्या भोजनांत गर्क होते, कोणी चीजवस्त कोठें लपवावी याचे विचारांत होते, कोणी दक्षिणेंत जाण्याचा बेत करीत होते, कोणी दुसऱ्याचें द्रव्य उपटावयास सांपडेल या आशेवर बसले होते. शिंदे, होळकर इत्यादि सरदार या प्रसंगास काय करितात याजवर लोकांचे डोळे लागून राहिले होते. ग्वाल्हेरींत दिवाण दिनकर रावजी यांचें चित्त इंग्रजाकडे पूर्ण आहे, असें स्पष्ट दिसून आलें होतें, परंतु यांचा पगडा शिंद्यावर कितपत पडतो, त्याचा अंदाज लोकांस झाला नव्हता.

आमचे चुलते श्रीमंत बाजीरावसाहेबांचे वेळेस ब्रह्मावर्तास होमशाळेवर अध्यक्ष होते, म्हणून पूर्वींच सांगितलें आहे. ब्रह्मावर्ताहून हमेशा काकांचे ओळखीचे लोक जिवाचे आशेनें पळून ग्वाल्हेरींत रहावयास येऊं लागले, व त्यांजपासून तेथील हकीकती समजूं लागल्या. श्रीमंत नानासाहेब यांचें पेनशन अजी बंद केल्यामुळें त्यांचे मनांत इंग्लिशाविषयीं अत्यंत द्वेषबुद्धि उत्पन्न झाली होती; व स्वतः धैर्यवान् व शूर असल्यामुळें व पदरीं बंधु बाळासाहेब व रावसाहेब तसेंच तात्या टोपी इत्यादि हिंमती मंडळी असल्यामुळें राज्यक्रान्तीचे विचार मनांत घोळत असत. लखनौची बेगम व दिल्लीपति इत्यादि इंग्रज सरकारचे अन्यायामुळें समदुःखी झालेल्या लोकांशीं त्यांचा पत्रव्यवहार होता व मधून मधून धर्मभयानें आतुर झालेल्या पलटणीच्या ऑफिसर लोकांशींहि त्यांच्या मुलाखती होत. परंतु स्वपरबलाबल जाणून, अग्नींत पतंगासारखें मरून जावें व सर्वस्वी कुलाचा नाश करावा एवढा हिय्या करण्याचें सामर्थ्य त्यांचे मनास येईना. असें सांगतात कीं, एके दिवशीं संध्याकाळचे सुमारास घाटावर संध्येस निवडक मंडळी

बसलो आहे, गंगेचें शुभ्र उदक मंद वाहत आहे, व उष्णकाळ असल्यामुळें अत्यंत प्रिय 'भागीरथी-निर्झर-शीकराणां वोढा मुहुः कंपित-देवदारुः' असा वायु चित्तास आनंद देत आहे व वेदमूर्ति रामचंद्र शास्त्रीबोवांशीं कांहीं धर्मविषयक बोलणें चाललें आहे, तों एक पलटणी अम्मलदार, फेंसानें भरलेला घोडा भरधांव टाकीत घाटावर आला व नानासाहेबांस मुजरा करून बोलूं लागला कीं, सरकार, मिरत येथील छावणींतील लोक धर्मभयास्तव उठून इंग्रज लोकांस ठार मारून दिल्लीस जाऊन त्यांनीं बादशाहास अधिपतित्व दिलें. हिंदु धर्मावरहि तोच कठिण प्रसंग आला आहे, व शिपाई लोकहि धर्मासाठीं मरूं, परंतु बेधर्मी होणार नाहीं, असे दृढ निश्चयाचे आहेत; हिंदु धर्मास तर आपल्याशिवाय अधिपति राहिला नाहीं. जर हिंदूचें आधिपत्य स्वीकारावयाचें असेल तर ह्या क्षणीं कानपूरावर ही तलवार व हा घोडा घेऊन चला. हा अकल्पित प्रसंग पाहून शास्त्रीबोवादि मंडळी घावरून जागचे जागीं शून्यदृष्टि बसली. नानासाहेब किंचित् आरक्तनेत्र होऊन त्या स्वाराकडे सारखी टक लावून कांहीं वेळ स्तब्ध राहिले. शेवटीं एकाएकीं नानासाहेब म्हणाले कीं, बरें आहे, जर हजारों लोक धर्मासाठीं मरून जाण्यास तयार आहेत तर मीहि आपल्या बायकापोरांची आशा सोडतों. यास श्रीगंगामातुश्री साक्ष आहे. असें म्हणून घोड्यावर बसून आवेशानें घोडा फेंकला. वाड्यांत येऊन बाळासाहेब इत्यादिकांस मजकूर निवेदन केला, व लागलींच आपले बरोबरचे लोक घेऊन कानपूरचा रस्ता धरला.

ब्रह्मावर्त बंडास जाऊन मिळालें ही बातमी हां हां म्हणतां चोंहींकडे पसरली. कांहीं द्रव्यवान् शहाणे लोक जिंदगीची व्यवस्था करण्यास लागले, कांहीं दुसऱ्या मुलुखांत निघून जाण्याचे तयारीस लागले, कांहीं स्वामिभक्त तेथेंच राहून धीर देऊं लागले, विचारशून्य आनंद मानून उडया मारूं लागले. नानासाहेबांस बंडवाली फौज ब्रह्मावर्ताचे रस्त्यावर भेटली. फौजेंतील ऑफिसर लोकांचें व नानासाहेबांचें बरेच वेळ खलबत झाल्यावर सर्व शिपायांनीं आम्ही तुमची आज्ञा पाळूं व जीव आहे तोंपर्यंत नोकरी करूं, इंग्लिशांस कधीं शरण जाणार नाहीं व सैन्य सोडून पळून जाणार नाहीं; वगैरे आणाशपथा वाहिल्या. नंतर निरनिराळ्या कामाच्या नेमणुका झाल्या व फौज कानपुरावर परतली.

भाद्रपदमासीं एके दिवशीं ग्वाल्हेर शहरांत फार धांदल उडून गेली आहे

असें आमच्या दृष्टीस पडलें. रस्त्यांत लोकांची गर्दी जमून कुजबुज चालली आहे. शिबंदी स्वार इकडून तिकडे धांवत आहेत. पुष्कळ दुकानें बंद आहेत, असें पाहून कांहीं तरी बंडाची धामधूम ग्वाल्हेरींत चालली आहे असें समजून आम्हीं बाहेर पडलों. तेव्हां असें समजलें कीं, श्रीमंत नानासाहेबांकडून तात्या टोपी शिंदे सरकारची कुमक मागण्याकरितां आला आहे.

तात्या टोपी यास आम्ही बाजारांत पाहिलें. मुरारीचे पलटणींपैकीं चार पलटणी त्यानें अनुकूल करून घेतल्या, आणि शिंद्यास कळविलें कीं, आम्ही इतके दिवस येथें राहिलों परंतु तुमचे शहरास किंवा मुलुखास बिलकुल धक्का लाविला नाहीं. तरी आम्हांस ओझ्याकरितां गाड्या, घोडीं, उंट वगैरे सर्व तयारी तुम्हीं करून दिली पाहिजे. असा त्यांचा अभिप्राय समजल्यावरून जयाजीराव शिंदे व दिनकरराव हे मुरारीचे छावणींत तात्या टोपी यास भेटावयास गेले. शहरापासून तीन कोसांवर नदीचे कांठीं ती छावणी होती. तेथें जाऊन सर्वांस भेटून—जो जाण्यास सरंजाम लागेल तो आम्ही देतों परंतु आमच्या मुलुखास हात न लावतां तुम्हीं निघून जावें—असा ठराव होऊन पानसुपारी, अत्तरगुलाब झाला. दुसरे दिवशीं शिंदे यांनीं जो सरंजाम—गाड्या, घोडीं, उंट, हत्ती, बैल, खेंचरें वगैरे लागला—तो पुरवून तात्या टोपी यास रवाना केलें व ग्वाल्हेरीचें विघ्न टाळलें. मुरारीचे पलटणींत विषाचे गोळे अकरा होते. एका एका गोळ्यास दोन हजारांवर खर्च झाला असून त्या गोळ्याचा असा चमत्कार असे कीं, गोळा फुटतांच आंतून धूर निघून तो धूर मनुष्याचे डोळ्यांस लागला कीं डोळे फुटून जावे व मनुष्यहि मरावें. जे जे साहेबलोक शिंदे यांजपाशीं जीव बचावण्याकरितां राहिले होते, ते शिंदे सरकारास नेहमीं सांगत असत कीं, मुरारी पलटणी जें मागतील तें त्यांस द्यावें, परंतु त्यांस बिघडूं देऊं नये. कारण हे लोक फार लढवई असून त्यांचेपाशीं विषधूम्राचे गोळे आहेत. ते गोळे व त्या पलटणी तात्या टोपी मिळवून घेऊन चालता झाला.*

नंतर तात्यासाहेब गुलसराईवाले यांचे हद्दींत शिरून केशवराव गुलसराईवाले यांजपाशीं तीन लक्ष रुपये खर्चाकरितां मागूं लागले. केशवराव यांनीं उत्तर

*ही हकीकत इतिहास पाहतां कानपूरच्या पहिल्या लढाईनंतरची आहे व या पलटणी कानपूरच्या दुसऱ्या लढाईंत होत्या.

केलें कीं असे शिपाई मिळवून मुलूख काबीज झाले असते तर कित्येक करते. तुम्ही शुद्ध बंडवाले आहां; आम्ही तुम्हांस कांहींएक देणार नाहीं व तुम्ही आमचे मुलुखांतून तावडतोब चालतें व्हावें. हें ऐकून तात्या टोपी यानें लागलींच युद्धाची तयारी करून डंका वाजविला; व शहरास वेढा देऊन तोफांचा भडिमार सुरु केला. केशवराव याजपाशीं लोक थोडे असून त्यांजवळ बंदुका जुन्या चालीच्या, सुताचे तोडयानें पेटविण्याच्या होत्या. अशा तऱ्हेचे लोक पाहून तात्या टोपी याचे लोक एकदम हल्ला करीत पुढें गेले, व गोळ्या घालून कडामिनीचे दोन दोन आवाज काढले. तेणेंकरून संस्थानचे बहुत लोक मरण पावले व बाकीच्यांनीं घावरून पळ काढला. ते समयीं तात्याच्या लोकांनीं आडवें होऊन पुन्हा आवाज कादिले. त्यामुळें पुन्हा पुष्कळ लोक मरण पावले. बाकी राहिले त्यांनीं हातांतील बंदुका टाकून देऊन भूमीवर नमस्कार घातले. तुम्ही गरीब आहां, तुम्हांस आम्ही मारीत नाहीं, परंतु केशवराव यास जिवंत धरून देऊं असें वचन घेऊन त्यांस जीवदान दिलें. त्या लोकांनीं केशवराव यास शोधून आणून तात्या टोपी याचे स्वाधीन केला. नंतर खजिना लुटून केशवराव यास बरोबर घेऊन तात्या टोपी मजल दरमजल करीत कानपुरावर येऊन पोंचला.

कानपुरास गंगातटांत धूस बांधून, म्हणजे वाळूच्या गोण्या भरून त्या कोटा-सारख्या रचून आंत गोरे लोकांचीं पलटणें राहिलीं होतीं. तीं त्या धूसाचा आश्रय करून लढाई माजवीत असत. बाहेरून काळे लोक पुष्कळ प्रयत्न करीत परंतु धूस तोफांनीं फुटेनात. बहुत दिवस लढाई चालली. मुरारीच्या पलटणी आल्या त्याहि पुष्कळ लढल्या, परंतु कानपुर हातीं येईना. शेवटीं व्यूह कोणत्या आंगानें फोडावा याजबद्दल एक नेपाळी ब्राह्मण नानासाहेबांचे मार्फत अनुकूल करून त्यास पांच सातशें रुपये देऊन कानपुरास आणविला. त्यास सर्व धूस दाखवून त्यानें सांगितल्याप्रमाणें तोफांचे मोर्चे बांधून भडिमार सुरू केला. आंतूनहि तोफा व कडामिनी सुरू झाल्या. वाद्यें वाजूं लागलीं. ते समयीं विषाचे गोळेहि आंत टाकीत चालले त्यामुळें आंतले लोक डोळे फुटून त्रस्त होऊन तडफडून स्वर्गाचा रस्ता धरूं लागले. बहुतेक गोरे लोक मरण पावले. बाकी राहिलेले गंगेकडील बाजूनें बाहेर पडले, ते काळे लोकांनीं धरून कैद केले. या लढाईंत बाळासाहेब स्वतः मोरच्यावर जाऊन तोफेस बत्ती देत असत.

यांप्रमाणें जय मिळाल्यामुळें कानपुर शहर हस्तगत जाहलें व गोरे लोकांचें सामान, दारूगोळा, खजिना, तंबू वगैरे श्रीमंतांनीं आपले ताब्यांत घेतलें, आणि शहरांत आपल्या नांवाची द्वाही फिरविली. बाजार उघडून सर्व व्यवहार सुरू करविले. श्रीमंतांनीं ब्रह्मावर्तास जाण्यास जोशीबोवास मुहूर्त विचारून चंद्रानुकूल्य पाहून सांगितल्या मुहूर्तावर मोठ्या थाटानें कूच करण्यास आरंभ केला. हजारों स्वार व पायदळ पुढें चालत होतें, व मागें पुढें रोहिले, अरब, शिद्दी यांचा पहारा चालत होता. चौघडा, वाजंत्री, ताशे, नगारे, शिंगें वगैरे अनेक मंगल वाद्यें वाजत होतीं. याप्रमाणें हळूहळू थाटानें मिरवत मिरवत व भालदार वारंवार पुकारत जातां जातां रात्र पडली, तेव्हां वाटेनें शेंकडों चंद्रज्योती लाविल्या. शेवटीं स्वारी ब्रह्मावर्तास पोंचली. शहर गुढ्या तोरणें वगैरे अलंकारांनीं शोभिवंत केलें होतें, व नागरिक लोक पुष्पें दूर्वा स्वारीवर टाकीत होते. नानासाहेब पालखींत बसले होते, व बाळासाहेब आणि रावसाहेब हत्तीवर, अंबारींत बसून बाजूनें चालत होते. अशा थाटानें स्वारी वाड्यांत जाऊन पोंचली. नंतर दुसरे दिवशीं शास्त्रीबोवा वगैरे विद्वान् मंडळींस शालजोड्या, धोतरजोडे व दक्षिणा देऊन संतोषित केलें, व त्यांच्याच विचारें राज्यप्राप्तीकरितां अनुष्ठानें व ब्राह्मणभोजनें सुरू केलीं. याप्रमाणें जिकडे तिकडे शहरांत आनंदोत्सव होऊन नाच तमाशे चालू झाले.

पंचवीस वर्षांचे पूर्वीं हिंदुधर्माची स्थिति व त्याजवरील लोकांची श्रद्धा फारच निराळी होती यांत संशय नाहीं. आणि असेंहि म्हणण्यास हरकत नाहीं कीं, हल्लींचे दिवसांत केवळ काडतुसांचे कारणावरून इतकें भयंकर बंड कधींहि झालें नसतें. साहेबलोकांचीं पलटणें दक्षिणेंतून व चोंहींकडून राज्य रक्षणाकरितां धांवून येत आहेत व झाडोझाड सापराध निरपराध लोकांचीं प्रेतें लोंबत आहेत अशा प्रसंगांत मनुष्यास ब्राह्मणभोजनें आठवावीं व पत्रिकेच्या लांब लांब गुंडाळ्या सोडून गणित करून ग्रहानुकूल्य काढीत बसावें, हें हल्लीं फार चमत्कारिक वाटेल. परंतु त्या वेळेच्या लोकांची धर्मश्रद्धा अशी बळकट होती कीं, तरवारीच्या धारेपेक्षां अग्नींतील घृतधारा जास्ती फलद्रूप होईल, आणि सुमुहूर्तावर प्रयाण केलें तर शत्रुक्षय खचित होईल असें लोक मानीत होते. याप्रमाणें जिकडे तिकडे शास्त्रोक्त अनुष्ठानें व ग्रहशान्ति चालू केल्या व ब्राह्मणसंतर्पणेंहि सुरू केलीं. परंतु

शहरचें संरक्षण करण्याच्या बंदोबस्तास विसरले नव्हते. शहरची तटबंदी करून गंगेचे बाजूनें ध्रुवघांटापासून मोर्चे बांधून तोफा लावून ठेविल्या होत्या.

एके दिवशीं क्षेत्राचे खालील बाजूनें इलाबाद उर्फ प्रयागकडे एक आगबोट गोरे लोकांनीं भरलेली चालली होती; त्यांत साठ सत्तर गोरे लोकांच्या बायका व वीसएक मुलें व सुमारें पंधरा पुरुष होते. ती नाव जात असतां दुर्बिणीनें ध्रुवघांटावरचे गोलंदाजानें हेरली; आणि तावडतोब श्रीमंतांस जाऊन कळविलें कीं एक नाव गोरे लोकांनीं भरलेली प्रयागाकडे जात आहे व त्यांत बहुतेक बायका आहेत. हुकूम झाल्यास नाव टप्प्यांत आल्यावर गोळा टाकतों. हें ऐकून नानासाहेबांनीं जबाब दिला कीं, नावेंत जर बायकामुलें असतील तर त्यांस मारण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं. गोलंदाज परत आल्यावर नाव तशीच पुढें येऊन ध्रुवघांटावरून ब्रह्मेश्वराखालून जात असतां भूतेश्वरानजीक त्या गोरे लोकांचे दुर्दैवामुळें गंगेचे तळीं वाळवंटांत रुतली. शुद्ध भागीरथींत आगबोट चालत नाहीं, धुमाकस म्हणजे लहानशी आगबोट मात्र चालते. कारण गंगाबाईचा हरवक्त वाळूचा खेळ चाललेला असतो. म्हणजे पात्रांत एकाएकीं एके ठिकाणीं वाळूचा ढिगार बनतो. आगबोट जात असतां वाळूवर लागली, हें पाहून गोलंदाजानें नानासाहेबांस कळविलें कीं, ध्रुवघांटावर नाव आली त्या वेळेस आपण हुकूम दिला नाहीं, परंतु आतां दिला पाहिजे. कारण श्रीगंगेचीच त्यांजवर अवकृपा, म्हणोन शत्रुक्षेत्रांत नाव अडकली. त्यापेक्षां तोफेचा गोळा टाकून आम्ही सर्व माणसें मारून टाकतों. असें सांगून तोफेवर येऊन तोफेस बत्ती दिली. तिकडे नावेवरचे लोक कांहीं पाण्यांत उतरून नाव लोटीत होते तों गोळा नावेंत पडला. गोळा नावेंत पडतांच आंत दारू होती ती पेटून भडका झाला आणि सर्व बायकामुलें जळून गेलीं. पैकीं दहा बायका व तीन मुलें व चार पुरुष इतके वांचले त्यांस धरून कैद केलें व छोटी नाव घालून आगबोटीवर दहा हजारपर्यंत खजिना सांपडला तो आणला.*

ब्रह्मावर्त मुक्कामीं गोरे लोकांच्या बायका सुमारें साठ व कांहीं मुलें अशीं कैद करून ठेविलीं होतीं, त्यांजवर पंचवीस लोकांचा पहारा नेमिला होता. व तुरुंगहि

* केचा इतिहास पाहतां ही नाव फत्तेगडाहून आली होती. के व्हॉ. २ पा. ३५२.

मजबुतीचा होता. प्रतिदिवशीं सकाळीं झाडयाकरितां सर्व कैदी लोक पहारेकरी यांनीं गंगेचे वाळवंटावर नेऊन सर्व विधी आटोपून पुन्हा परत आणावे. याप्रमाणें क्रम सुरू असतां, त्या बायकांत एक स्त्री मोठी राजकारणी हुशार होती. तिनें एक भंगीण फितूर करून दोन मोहरा देऊन प्रयागास पत्र नेण्याचें तिच्याकडून कबूल करविलें. नंतर एके दिवशीं एक इंग्रजी पत्र लिहून जेथें ती स्त्री झाडयास बसली होती तेथेंच संकेताप्रमाणें टाकून तेथून ती उठून गेली. पलीकडे तें पत्र भंगीणीस उचलून घेतेसमयीं पहारेकरी यांनीं पाहिलें. त्यांनीं त्या भंगीणीस तेथेंच कैद करून व तें पत्र घेऊन नानासाहेब यांजसमोर दोघांस हजर केलें. त्या भंगीणीस पंचवीस फटके देतांच सर्व फितूर कबूल होऊन तिनें सर्व मजकूर सांगितला. नंतर इंग्रजी वाचणारा आणवून त्याजकडून पत्र वाचून पाहतात तों आंत असा मजकूर होता कीं, कानपुरावर जय होऊन शत्रूचे लोक आनंदानें नाच तमाशे करीत ब्रह्मावर्तांत बेहोष पडले आहेत; फौजेचा बंदोबस्त नीट नाहीं, सर्व गाफील आहेत. याजकरितां शत्रूवर चालून येण्याची वेळ ही फार उत्तम आहे. इत्यादि मजकूर ऐकून पलटणी लोकांस एकदम आवेश येऊन दंगा करून म्हणूं लागले कीं, या शत्रूच्या स्त्रिया इतक्या राजकारस्थानी आहेत कीं, त्यांनीं अशा अडचणींतहि फितूर करून प्रयागास पत्र पाठविण्याची तजवीज केली. तर या कोणते वेळेस दगा करतील याचा नेम नाहीं. याजकरितां या सर्वांस ठार मारून टाकावें हें फार बरें. असें म्हणून शिपाई लोकांनीं फार उचल केली. ते समयीं नानासाहेबांनीं हुकूम केला कीं, स्त्रियांस मारणें हें रास्त नाहीं, याजकरितां जिनें फितूर केला तीस मात्र तोफेचे तोंडीं द्यावें. हें ऐकून शिपाई लोक विथरून गेले व मोठ्या आवेशानें तेथें निघून कैदखान्यांत येऊन तरवारीनें व बंदुकांनीं त्या दुष्ट अनावर झालेल्या लोकांनीं बायका-मुलांचा चेंदामेंदा केला.

बायकामुलांचा हा जो भयंकर घात झाला तो नानासाहेबांच्या हुकुमानें झाला असो किंवा पलटणी लोकांनीं केला असो, परंतु हा प्रसंग अत्यंत निंदास्पद झाला यांत संशय नाहीं. पूर्वी असें मराठीशाहींत कधीं झालें नव्हतें. शिवाजीमहाराजांनीं कल्याण येथें हस्तगत झालेली एक मुसलमानाची स्त्री सत्कार करून नवऱ्याकडे परत पाठविली. तसेंच चिमाजी आप्पा यांनींहि वसईच्या किल्ल्याच्या वेढयाचे वेळीं एक शत्रूकडील स्त्री नावेंत पळून जातांना सांपडली, तिला लुगडें-चोळी देऊन शत्रूकडे

परत पाठविली. याप्रमाणें शत्रूकडील स्त्रियांचा मान पूर्वी ठेवीत गेले. कानपुर येथें घडलेला प्रकार हिंदुस्थानच्या इतिहासांत मोठाच कालिमा आणणारा झाला व या कृत्यामुळें अश्वत्थाम्याप्रमाणें नानासाहेबांच्या नांवास कायमचा कलंक लागला. तेच समयीं शहाणे व वृद्ध बोलूं लागले कीं, या प्रसंगीं आम्हांस वाटत होतें कीं, गोरे लोक विलायतेस परत जातात आणि पुन्हां हिंदु-मुसलमानी राज्य होतें; परंतु ती आशा आतां राहिली नाहीं, कारण स्त्रियांचा वध करणें हें महापातक आहे व शास्त्रांतहि स्त्रियांस कोणत्याहि अपराधास देहान्त प्रायश्चित्त नाहीं. परंतु हें दुष्कर्म यांजपासून फार घडलें, याजमुळें त्यांना जय येणें दुरापास्त आहे.

या कृत्यास पंधरा दिवस झाले नाहींत तों चोंहींकडून गोरे लोकांच्या पलटणी कानपुरावर जमल्या. प्रयागाहून व कलकत्त्याहून व उत्तरेकडून व दक्षिणेंतून मद्रासी काळ्या पलटणी एकाएकीं कानपुरावर येऊन मोर्चे बांधून लढाईची तयारी करूं लागल्या. ही बातमी ब्रह्मावर्तास समजतांच पेशवे यांनीं तात्या टोपी व लालपुरी-बोवा गोसावी व जळका रामभाऊ या तिघांस फौजेसुद्धां ताबडतोब रवाना केलें व कानपुरास जाऊन मोर्चे बांधून युद्धाची तयारी करण्यास सांगितलें. मागाहून सुमुहू-र्तावर नानासाहेब, बाळासाहेब व रावसाहेब देवांस नमस्कार करून बाहेर पडतात तों अपशकुन एकाएकीं होऊं लागले. प्रथम मांजर आडवें गेलें, नंतर एक तेलंग ब्राह्मण टोपलींत भस्म घेऊन पुढें आला, पुढें जातात तों लांकडें विकण्याकरितां आलीं, नानासाहेबांचा घोडा एकाएकीं अडला आणि एक घटका खोळंबा झाला, आणि रावसाहेबांचे घोड्याचे नेत्रांस पाण्याची धार लागली होती. याप्रमाणें अनेक अपशकुन झाले. परंतु आतां ही परत फिरण्याची वेळ नाहीं, असें जाणून शूरत्वाचे आवेशानें तसेच पुढें चालले. कानपुरावर येऊन पोहोंचले तों लढाई सुरू झाली होती. दोहों पक्षांकडील तोफा बहुतेक सारख्याच होत्या, परंतु इंग्रजांकडील फौज पुष्कळ व कवाईत शिकलेली व नव्या दमाची होती. तोफा, कवाईत वगैरे कामांत इंग्रज लोक काळे लोकांपेक्षां हुषार असतात यांत कांहीं संशय नाहीं. पेशव्यांकडील इंग्रज लोकांनीं तयार केलेल्या पलटणी होत्या व गोलंदाज होते. याप्रमाणें दोहों पक्षांकडील लढाईची सामग्री बहुतेक सारखीच होती.

कानपुरचा जंग फार निकराचा झाला. इंग्रजी शिपाई मारलेल्या बायका-

 

पोरांच्या हकीकती ऐकून अगदीं चवताळून केवळ सूड उगविण्याकरितां लढत होते, व त्यांचेजवळ चांगल्या तोफा व कसबी गोलंदाज असल्यामुळें शत्रूच्या सैन्याचा भराभर नाश करीत चालले. काळे शिपाईहि राज्याकरितां व जिवाकरितां लढत होते. तोफेच्या कामावर स्वतः नानासाहेब व बाळासाहेब जिवाची परवा न करितां मेहनत करीत होते. शेंपन्नास स्वार घेऊन तोफेवर तुटून पडून गोलंदाजास कापून काढून तोफेच्या कानीवर खिळा ठोकावा, याप्रमाणें बहुत सरदार व शिपाई शूरत्वाचीं कामें करीत. सूर्यास्त झाल्यावरहि दोहोंकडे चंद्रज्योति व मशाली लाविल्या व रणभूमीस उजेड करून लढूं लागले. वीरांस श्वास सोडण्यासमुद्धां फुरसत राहिली नव्हती. काळे लोकांस स्नान, भोजन, निद्रा नाहींशी झाली. लढाईचा नंबर आला म्हणजे लढून मागें येऊन हातावरचे हातावर साखरपुरी खाऊन भिस्त्यांपासून ओंजळीनें पाणी पिऊन पुन्हा युद्धास प्रवृत्त व्हावें. याप्रमाणें युद्ध दहा दिवस चाललें. उभय पक्षांकडील बहुत लोक मरण पावले. शेवटीं पुरुषप्रयत्न निष्फळ, दैवबळ प्रधान होऊन अकरावे दिवशीं एकाएकीं वारा फिरला. शत्रूकडील व यांचेकडील तोफांचा व बंदुकांचा धूर यांचे अंगावर येऊन शिपायांस दिसेनासें झालें. धुळीनें नेत्र भरून गेले. अगोदरच काळे शिपाई बहुत मरण पावले होते. पुष्कळ पळाले होते. बाकीचे दुर्दैवानें भयभीत होऊन रण फुटूं लागलें. गोरे लोकांनीं मोर्च्यांतून तोफा बाहेर ओढून पुढें चाल केली, व काळे लोक भयातुर होऊन दशदिशा पळत सुटले. बाळासाहेब यांनीं मोठ्या आवेशानें लोकांस परत हांक मारून, एका तोफेवरचा गोलंदाज मेला होता त्या तोफेवर जाऊन तोफ चालू केली, तों दुसरे तोफेवरचा गोलंदाज मेला. याप्रमाणें तोफा रिकाम्या पडत चालल्या व लोकहि पळूं लागले. इतक्यांत नानासाहेब व रावसाहेब भरधांव घोडे टाकीत तेथें आले, आणि बाळासाहेबांस विनंति केली कीं, युद्धाची शिकस्त झाली, परंतु ईश्वरानें यश दिलें नाहीं. तरी येथें विनाकारण रांडमरणानें मरून जावें त्यापेक्षां येथून पळून जाऊन पुन्हा उद्योग करून सैन्य जमवूं व शत्रूस लढाई देऊं. मग एक शत्रूस जिंकूं नाहीं तर महारणांत पडून स्वर्ग जिंकूं. तस्मात् आतां ब्रह्मावर्ताचा रस्ता धरणें फार बरें असें वाटतें. हे शब्द ऐकून बाळासाहेब लागलेच आपल्या घोड्यावर बसले व तिघांनीं ब्रह्मावर्ताकडे घोडे फेंकले. बरोबर कांहीं पायदळ व घोडेस्वार मात्र राहिले होते. बाकीच्यांनीं अंतरवेदींत उतरून फत्तेपुराकडे पळ काढला.

संध्याकाळच्या श्रीसूर्याचे सरते रक्तकिरण ब्रह्मावर्तावर पडून नाहींसे झाले. दिवसाचे परिणामसमयामुळें जणुं काय अंत काळकळा चोहोंकडे पसरली. जिकडे तिकडे उदास, भयाण व निश्चल दिसूं लागलें, व पक्ष्यांची किलबिल मृतसमयींच्या स्वजनांच्या आक्रोशासारखी भासूं लागली. अंधकार अधिकाधिक पसरून क्षेत्र जणुं काय काळाच्या जबड्यांत शिरतें आहे अशी भीति पडूं लागली. बहुतेक लोक आपापल्या घरीं गेले होते; परंतु कांहीं रिकामटेकडी मंडळी व कांहीं जिवास जीव देणारी हितेच्छु मंडळी मिळून सुमारें पन्नास लोक भूतेश्वराजवळ पारावर नित्याप्रमाणें कानपुराकडून काय बातमी येते हें समजण्याकरितां तशीच बसली होती. तों तीन–चार स्वार भरधांव येत आहेत असें दृष्टीस पडलें. पटकन् उतरून मंडळी पुढें येत आहे तों स्वार येऊन ठेपले. घोडे नखशिखान्त फेंसानें भरले असून वरती धुराळा बसला होता. तिघांहि बंधूंचे कपडे धुळीनें व रक्तानें भरले असून मुद्रा किंचिदारक्तनेत्र उदास व कठोर दिसत होती. प्रत्येकाचे मनांत सर्व संपलें हा एकच विचार चाललेला होता व तोंडावरहि निराशेचा ठसा पूर्ण उठला होता. हें पाहतांच मंडळीचे पोटांत धस्स झालें. व श्रीमंत जवळ येऊन घोडा उभा केला तरी कोणाचे तोंडांतून अक्षर निघेना. नानासाहेब मोठ्यानें श्वास सोडून हरहर शब्दाचा उच्चार करून बोलले कीं, आजपर्यंत हिंदुधर्माकरितां यत्न केला तो व्यर्थ जाऊन आमचे जीविताचीहि आशा आम्ही सोडली आहे असा आज प्रसंग गंगाबाईनें आणला आहे. ईश्वरेच्छा झाली पाहिजे असें म्हणून क्षेत्रांत शिरले व घोडा फेंकीत वाड्याशीं येऊन उतरले.

कानपुरावर पेशव्यांचा मोड झाला ही बातमी तावडतोब ब्रह्मावर्तात पसरली; त्या वेळीं शहरांत जी गडबड उडून गेली तिचें वर्णन करतां येत नाहीं. आतां श्रीमंत फौजेसुद्धां कोठें तरी निघून जातील व गोरे लोक येऊन आमचीं मुलें-माणसें मारतील, जिंदगी लुटतील, घरें जाळतील, नाना तऱ्हेचे हाल करतील, ही दुस्तर भीति चोहोंकडे पसरली. कांहीं मित्रे लोक जे पूर्वी भोजनसमारंभांत तृप्त होऊन श्रीमंतांस लांबलचक आशीर्वाद देत होते, तेच त्यांस आतां शिव्या देऊं लागले व जिकडे वाट फुटेल तिकडे आपलें वित्त घेऊन पलायन करूं लागले. कांहीं धैर्यशील स्वस्थतेनें आपल्या वित्ताची विहिरींत व जमिनींत व्यवस्था करूं लागले. कांहीं अतिभ्याड बायकापोरांची व्यवस्था न करितां आतां आमचें काय

होईल असा रस्त्यावर पडून आक्रान्त करूं लागले. याप्रमाणें तें क्षेत्र त्या रात्रीं दुःखरूप दिसूं लागलें.

इकडे श्रीमंतांनीं घरीं येऊन स्त्रियांस थोडक्यांत झालेला मजकूर निवेदन केला व असें सांगितलें कीं, आतां शत्रु येईल, त्यापेक्षां येथून निघून लखनौचे मुलुखांत गंगा उतरून गेलें पाहिजे. तेथें लखनौची बेगम हीस मिळून जें करणें तें करूं. याकरितां जें घेणें असेल तें घेऊन बाहेर पडून गंगेवर नाव तयार आहे तिकडे जावें. बरोबर कोणी घेऊं नये. अरेरे! त्या बिचाऱ्यांस घराबाहेर पालखीशिवाय पडण्याचा कधीं प्रसंगहि नाहीं. मग प्रवासांत लागतें काय याची चौकशी त्यांस कशास माहीत? अगोदरच घर कोसळल्याचें दुःख झालें होतें, त्यांत जिवाच्या धास्तीनें भांबावून गेलेल्या त्या बिचाऱ्यांस कांहीं सुचेना. शून्य मनानें बरोबर कांहींएक न घेतां शिपायाबरोबर त्यांनीं नदीचा रस्ता धरला.

नंतर श्रीमंतांनीं घरांत एक मोठा शेला पसरून त्यांत जे अलौकिक अमोल पदार्थ होते ते बांधून घेतले. पूर्वी शिवाजीमहाराज छत्रपति यांनीं श्रीसमर्थ रामदासस्वामीस गुरु करून पादशहापासून राज्य मिळविलें तेव्हां दासांनीं महाराजांस प्रसादार्थ आपल्या छाट्या दिल्या होत्या त्या तशाच चंदनाचे पेटींत बहुत बंदोबस्तानें देवघरांत ठेवून राजेसाहेब पूजीत होते. त्या छाट्या पुढें शाहू छत्रपति यांनीं श्रीमंतांस दिल्या. ती पेटी देवघरांत ठेविली होती ती आणून पेटींतून छाट्या काढून शेल्यांत घेतल्या. तसेंच थोरले माधवराव यांस अमोलिक रत्नासारखें वडाचें पुष्प मिळालें होतें तेंहि घेतलें. दक्षिणावर्त शंख घेतला. गौरीशंकर नांवाचा अत्युत्तम कान्तीचा बाण होता तोहि घेतला. याप्रमाणें आणखी कांहीं राजरत्नें होतीं तीं शेल्यांत बांधून घेऊन देवास नमस्कार करून संपत्तीनें भरलेला वाडा सोडून बाहेर पडले. त्या समयीं तिघांचेहि नेत्रांतून अश्रुधारा चालल्या होत्या. ज्या ठिकाणीं लहानपणापासून आपण वाढलों, खेळलों, आनंदानें तारुण्याचे दिवस काढले अशा प्रिय जन्मभूमीचा अत्यंत वियोग किती दुःसह आहे हें सांगावयास नको. वाड्यांतील, रस्त्यांतील, देवालयांतील तीं तीं ठिकाणें पाहून व तेथील त्या त्या आठवणी येऊन त्यांना अधिकाधिक दुःख होई. आतां हें सर्व पुरे, सर्व मित्र व ओळखी व सर्व सुखें सुटलीं, व पुढें दुःख, दारिद्र्य, कदाचित् मरणहि येणार अशा कल्पनेनें त्यांचीं मनें अगदीं होरपळून

गेलीं होतीं. रस्त्यांत पुरवासी लोकांची गर्दी झाली होती. त्यांतून दीनवदन अनवाणी तीं माणसें जातांना पाहून लोकांस गहिंवर आला, व जिकडेतिकडे हर हर! शिव शिव! इत्यादि उद्गारांचा कल्लोळ झाला. गंगातीरीं आल्यावर नानासाहेबांनीं श्रीगंगेचें पूजन करून तांबडी पैठणी व हिरवी जरीकांठी चोळी अर्पण करून हात जोडून प्रार्थना केली कीं, गंगे भागीरथी मातुश्री! आजपर्यंत तूं आमचा सांभाळ केलास आणि आतां तुझ्याच इच्छेनें तुझा वियोग होणार. असो. तुजला जें वाटेल तें कर. आम्हीं दीनांनीं तुझी प्रार्थना काय करावी! असें म्हणून तीरावर आलेल्या ब्राह्मणांस साष्टांग नमस्कार घालून नावेवर चढले. पाठीमागून तिघांच्या स्त्रिया, कैलासवासी श्रीमंत बाजीरावसाहेब यांचें कुटुंब व त्यांची औरस कन्या अशा पांच बायका चढल्या. मागून रावसाहेब बसले. नंतर बाळासाहेब सर्वांस नम्रपणानें नमस्कार करून किंचित् सद्गदित होऊन म्हणाले कीं, 'कानपुरावर आमचा मोड झाला त्या प्रसंगांत तात्या टोपी, जळका रामभाऊ व लालपुरीबोवा गोसावी इत्यादि आमचे सरदार कोठें गेले त्याचा आम्हांस पत्ता नाहीं. असो. ते शूर आहेत, त्यांजबद्दल आम्हांस बिलकुल काळजी नाहीं. तुम्हांस सोडून जाणें मात्र आमचे जिवावर आलें आहे. परंतु इलाज नाहीं. हिंदुधर्माकरितां व हिन्दुराज्याकरितां पुन्हा एकवार झटलें पाहिजे. याजकरितां हें जें संकट ईश्वरानें आमचे हातून तुमचेवर ओढविलें याजबद्दल, व दुसरे जे अपराध आमचे झाले असतील त्याबद्दल कृपा करून आम्हांस क्षमा करा.' हें ऐकून पदरचे मंडळींपैकीं वेदशास्त्रसंपन्न रामचंद्र शास्त्री व जोशीबुवा यांनीं उत्तर दिलें कीं, बहुत काळपर्यंत हें देह आपले अन्नांनीं पोषण झाले. आपले आश्रयानें आजपर्यंत संसार केले. आणि आपल्यास विपत्ति आली म्हणून सोडून देऊन सुखाची इच्छा धरूं तर इहलोकीं निंदेस पात्र होऊं, व परलोकीं तर नरकवास यावत् कल्पक्षय होईल तावत् भोगावा लागेल! याजकरितां महाराजांनीं आम्हांस बरोबर न्यावें. आपल्याबरोबर कांहींहि आमचें होवो. हें ऐकून नानासाहेब नावेंत उभे राहून सर्वांची प्रार्थना करून म्हणाले कीं, आपला आम्हांबरोबर येण्याचा निश्चय हा आपल्यास भूषणप्रद आहे; परंतु दुर्दैवानें तसा आजचा समय नाहीं. समय येईल त्या वेळेस मी तुम्हांस कधींहि विसरणार नाहीं. तुमचा वियोग मजला दुःसह आहे हें मी किती सांगूं? तुम्हीं वृद्धांनीं माझें वडिलांप्रमाणें पालन केलें, बरोबरचे लोकांनीं बंधूप्रमाणें मित्रभावानें

आनंदानें मजबरोबर कालक्षेप केला; परंतु आजचा प्रसंग फार दुर्घट आहे. यास्तव माझी अशी विनंति आहे कीं, आपण सर्वांनीं स्वस्थानीं जाऊन आपापली तजवीज पहावी. याउपर जर आग्रह धराल तर सर्वांचा येथेंच आज प्राणघात होईल. नाहींपेक्षां ईश्वरेच्छेनें योजित कार्यें होणारीं आहेत. आपला व आमचा समागमहि लौकर होईल. तर आतां नमस्कार आणि बरोबर येण्याची गोष्ट कोणीं बोलूं नये. बोलेल त्यास श्रीगंगाबाईचीच शपथ आहे. हें श्रीमंतांचें उत्तर ऐकतांच सर्व लोक खालीं माना घालून अति दुःखित होऊन स्वस्थ राहिले. इतक्यांत राघोबा नांवाचा शिष्य होता तो पुढें येऊन हात जोडून बोलूं लागला, "महाराज, माझी मातुश्री मी एक वर्षाचा असतां मरण पावली असें सांगतात. तीर्थरूप व्रतबंध झाल्याबरोबर वारले. मला चुलता मामा वगैरे कोणी नाहीं. माझे सर्व आपणच आहांत. माझें घर ऐकण्यांत येतें कीं राजापुराकडे आहे. माझा बाप महाराजांचे अन्नाच्छादनांनीं वाढला. सबब माझा पिण्डच मुळीं आपले अन्नाचा आहे, आणि आजपर्यंत पोषणहि आपण करीत आलांत. आतां मी जीव वांचवून भिक्षा मागून रहावें हें मजला ठीक वाटत नाहीं. आपल्या बरोबरहि कोणी नाहीं, त्यापेक्षां मी नावेवर चढतों. जें होणें असेल तें होवो. महाराजांचे मनांत मजला नेणें नसल्यास गंगेंत ढकलून द्यावें. हें शरीर दुसरीकडे भिक्षान्नानें वांचवावें त्यापेक्षां गंगेंत पडून स्वर्गप्राप्तीस जाईल तर फार बरें." असें म्हणून एकदम नावेवर चढलाच. तेव्हां श्रीमंतांचीं मनुष्यें आठ व राघोबा शिष्य अशीं नऊ मनुष्यें नावेवर झालीं. श्रीमंतांनीं कोळ्यास सांगितलें कीं, राघोबा व आम्ही नाव पलीकडे नेतों. तुम्हीं सर्वांनीं उतरून जावें. कोळी उतरून गेल्यावर रावसाहेबांनीं सहा-सात मेणबत्त्या घेतल्या होत्या त्या लाविल्या; आणि राघोबा व बाळासाहेब यांनीं दोहींकडे वल्हीं घालून होडी लोटली. त्या समयीं क्षेत्रवासी सर्व पुरुष व बायका एकदम हलकल्लोळ करून जसा प्रेत उचलते वेळीं आप्तजन एकदम आकान्त करितात त्याप्रमाणें आकान्त करून मुक्तकंठ रडूं लागल्या; व नावेकडे पहात उभ्या राहिल्या. नाव सुमारें मैलभर मोठ्या धारेंत गेल्यावर श्रीमंतांनीं एकदम मेणबत्त्या मालवून अंधार केला व मोठ्यानें सुस्कारा सोडून 'जगदीशा! आज दीडशें वर्षें ऐश्वर्य भोगून पेशवाईचा आज लय झाला. सर्व वैभव नष्ट झालें. आतां हीं अमानुष रत्नें जगतीतलावर राहून काय उपयोग?' असें म्हणून शेला सोडून त्यांतील एक एक वस्तु आपले हातून गंगाबाईस

अर्पण केली. इकडे पुरवासी लोकांनीं नाव जातां जातां एकाएकीं नाहींशी झाली याजवरून श्रीमंतांनीं सर्वांसह नाव गंगेंत बुडवून घेतली अशी खात्री होऊन अति शोक करण्यास आरंभ केला, तो काय वर्णन करावा. एक प्रहरपर्यंत सर्व प्रजा गंगातीरीं मोठ्यानें शोक करीत व पूर्वीच्या आठवणी काढीत उभी राहिली व शेवटीं निराशेनें घरीं परत गेली.

इकडे गंगा उतरून पलीकडच्या तीरास सर्व मनुष्यें उतरलीं. नाव घाटावर न लागतां भलत्या बाजूवर लागल्यामुळें त्या ठिकाणीं कांठापासून एक मैलपर्यंत अति चिखल होता. कोठें ढोंपरभर, कोठें पोटऱ्याभर, अशा अति चिकट चिखलांतून श्रीमंतांचे मनुष्यांस जावें लागल्यामुळें जें दुःख व श्रम झाले त्याची तुलना कोठेंच नसेल. आजन्म ज्या पायांस भूमीचा स्पर्शहि ठाऊक नाहीं, गंगेवर जाणें तर पालख्यांतून; गंगेवर उतरणें तर शालजोडयांवर, ते जेव्हां ढोंपर ढोंपर चिखलांत बुडूं लागले व नाजुकपणामुळें बाहेरसुद्धां निघेनात त्या वेळचा तो प्रसंग पाहून त्या रणशूर कठिण हृदयास अश्रुधारा आल्या. परंतु 'आलिया भोगासी असावें सादर' या न्यायावर दृष्टि देऊन पुरुषांनीं त्या स्त्रियांस हात देऊन एक पाय चिखलांतून काढावा व दुसरा घावा याप्रमाणें पुष्कळ वेळानें कोरडया भूमीवर पोंचविलें. नंतर श्रीगंगेस वळून सर्वांनीं नमस्कार करून चालण्यास आरंभ केला. कांहीं वेळानें एक गांव लागला. तो लखनौचे भागांत असून तेथें मामलेदार होता. त्यास लखनौच्या बेगमचें पत्र होतें कीं, नानासाहेब कानपुरचे लढाईंत हरले आहेत, ते लखनौचे मुलुखांत आल्यास त्यांचा बंदोबस्त नीट ठेवावा. गांवाबाहेर पश्चिम बाजूस एक हनुमंताचें देवालय होतें त्यांत तीं सर्व थकलेलीं माणसें जाऊन उतरलीं. तेथें जागा पहातां तीन हातहि जागा सपाट नव्हती. जिकडे तिकडे खांचखळगे पडले होते. वाटेच्या श्रमानें स्त्रियांस फार तहान लागली होती. देवळाजवळ पाण्याची विहीर होती; परंतु जवळ भांडें व दोरीहि नव्हती. अशा संकटांत राघोबा शिष्यानें आपलें धोतर व नानासाहेबांचें उपरणें यांस गांठ देऊन विहिरींत सोडलें; परंतु पुरेना. मग बाळासाहेब यांचा रुमाल घेऊन गांठ देऊन विहिरींत सोडला व पाण्यानें भिजवून काढून स्त्रियांचे ओंजळींत पिळून त्यांची तृषा हरण केली. नंतर मारुतीचे देवालयांत येऊन निद्रा केली. रात्र सुमारें पंधरा घटका झाली होती, यामुळें थंडी पडली होती; परंतु अंथरावयास व

पांचरावयास कांहीं नव्हतें. 'शय्या भूमितलं दिशोऽपि वसनं ज्ञानामृतं भोजनं" अशा साधुवृत्तीनें ती सर्व रात्र त्या दैव फिरलेल्या माणसांनीं कंठली. अति दुःखांत रात्र गेल्यावर सकाळीं उठून ईश्वराचें प्रातःस्मरण करून गंगेवर जाऊन शौच-मुखमार्जनादि विधि सर्वांनीं आटोपला, व पुन्हां मारुतीचे देवलयांत येऊन बसले. पूर्व दिवशीं जेवणाची तर धांदलच झाली होती, व रात्रीं देवालयांत पाणी पिण्यासहि पुरतें मिळालें नाहीं, यामुळें सर्वांस फार क्षुधा लागली. त्या समयीं बरोबर कांहीं घेतलें नव्हतें. जवळ एक छदाम नव्हता, पाणी पिण्यास पात्रहि नव्हतें. पुरुषांजवळ दोन वस्त्रें व एक डोक्यास; व बायकांजवळ एक वस्त्र या-शिवाय जास्ती कांहींच नव्हतें. अशा संकटांत ते धीर पुरुष एकमेकांचे तोंडाकडे पाहूं लागले. बायका तर रडूं लागल्या. तेव्हां स्वामिभक्त राघोबा शिष्य पुढें होऊन हात जोडून म्हणाला, "महाराज, आपण किमपिहि दिलगीर होऊं नये; माझे बंडीचे खिशांत सुदैवानें एक रुपया आहे. मी गांवांत जाऊन शिधासामुग्री घेऊन सर्व तयारी करितों." हे शब्द ऐकतांच नानासाहेबांस आनंद होऊन म्हणाले, "शाबास; आम्ही नको नको म्हणत असतां आमच्या दुःखनिवारणार्थच तूं आम्हांस ईश्वरानें दिला यांत संशय नाहीं. तर मग आतां लवकर तयारी कर." राघोबानें बाजारांत जाऊन कणीक, तूप, मीठ, लांकडें वगैरे सामान घेऊन वरण शिजविण्यास एक मडकें, पाण्याकरितां मोठें मडकें, पाणी पिण्यास लहान लहान मडकीं अशी सामुग्री घेऊन आला; व स्नान करून स्वयंपाकास प्रारंभ करून कणकीचे गाखर भाजून वरण तयार करून ठेविलें. नंतर पुरुषांनीं मडकें घेऊन उपरणें भिजवून स्नानें केलीं. परंतु स्त्रियांचे स्नानांची फार पंचाईत पडली. त्यांचे हाल पाहून पाणी भरण्यास कांहीं नागरिक स्त्रिया आल्या होत्या त्यांचेहि नेत्रांतून पाणी आलें. असो. स्नानें झाल्यावर मारुतीची पूजा करून गाखराचा नैवेद्य दाखवून सर्वजण भोजनास बसले; परंतु त्यांस तें रुक्ष अन्न कसचें जातें. पहिल्या भुकेला जितकें गेलें तितकें खाऊन बाकी टाकून दिलें. इतक्यांत गांवचे मामलेदारास बातमी समजली कीं, मारुतीचे देवालयांत कोणी दक्षिणी वाटसरू उतरले आहेत; त्यांचेजवळ वस्त्रहि नाहीं, पाणी पिण्यास भांडेंहि नाहीं. परंतु चेहेऱ्यांवरून कोणी मोठे असावेत असें दिसतें. बरोबर बायका आहेत त्यांचे अंगावर कांहीं नाहीं; परंतु नाकांत नथी मात्र फार किंमतीच्या आहेत. नथींत हिरेहि आहेत. हें समजतांच मामलेदार धांवत आला; व चौकशी करितां हें

श्रीमंत नानासाहेब आहेत अशी खात्री होऊन गढीवर परत जाऊन घोडे व मेणे घेऊन आला व श्रीमंतांस गांवांत चालण्याचा आग्रह केला. नंतर सर्व मंडळी मारुतीस नमस्कार करून गढींत गेली. गढींत गेल्यावर आचारी, पाणके, शिष्ये, कारकून वगैरे तैनातीस मिळून वस्त्रप्रावर्णाची सर्व तजवीज लागली व बारा वर्षांचा नव्हे पण बारा तासांचा अरण्यवास संपला.

नंतर इकडे दुसरे दिवशीं कानपुरांत 'खल्क् खुदाका, मुल्क् बादशाहका, अम्मल् अंग्रेज सरकारका' अशी शहरांत दवंडी पिटून इंग्रजांनीं रयत निष्काळजी केली व आपला अम्मल चोहोंकडे बसविला. कानपुरांत पेशवे यांचे मसलतींत जे जे होते त्यांचा ठिकाणा लावून कांहीं फांशीं, कांहीं तोफेचे तोंडीं देऊन त्यांचा निकाल केला. कानपुरांत दोन दिवस राहून बंदोबस्त झाल्यावर गोरे लोकांची व काळे लोकांची एक अशा दोन पलटणी बिठूर अगर ब्रह्मावर्ताकडे वळल्या. श्रीमंत गंगापार झाल्यावर तिसरे दिवशीं सकाळीं चार घटका दिवसास ब्रह्मावर्तावर हल्ला सुरू झाला. क्षेत्र निराश्रयच होतें. गोरे लोकांनीं एकदम आंत शिरून सडक बिजनास आरंभ केला. जे पुरुष सडकेवर सांपडतील त्यांस बंदुकीनें ठार मारावें. याप्रमाणें चार प्रहर बिजन होऊन हजारों लोक मरण पावले. क्षेत्र अगदीं दीन होऊन गेलें. दुसरे दिवशीं लूट सुरू झाली. गोरे लोकांनीं सोनें, रुपें लुटण्यास आरंभ केला. जेथें द्रव्य सांपडेल तेथें खणून काढीत. कांहीं लोक कमरेस अर्थ बांधून रस्त्यानें ध्रुवघाटाकडे पळून जाऊं लागले, त्यांस गोरे भेटले म्हणजे त्यांनीं लुटावें, सुटले तर गांवकुठार गंगापुत्र वगैरे दांडगे लोकांनीं मारहाण करून लुटावें. याप्रमाणें तेथील प्रजेचे दुःखास पारावार नाहींसा झाला. बारा वाजेतोंपर्यंत गोरे लोकांची लूट झाल्यावर ते श्रीमंतांचे वाड्यांत शिरले. व काळे लोकांनीं शहरांत तांबें, पितळ, वस्त्रप्रावर्णाची लूट मांडली. याप्रमाणें त्या लोकांनीं आपल्या अनेक पापांबद्दल हजारों जीव व आपलें सर्वस्व इंग्रज सरकारास अर्पण करून प्रायश्चित्त घेतलें. तिसरे दिवशीं इंग्रज सरकारनें आपले नांवाची द्वाही फिरवून लोकांस निर्भय केलें. जनरली झेंडा उतरून कलेक्टरचा अम्मल सुरु केला.

ब्रह्मावर्त क्षेत्र श्रीमंतांची व नानासाहेबांची निवासभूमि असल्यामुळें गोरे शिपाई हजारों मनुष्यांचे बळीनें व द्रव्य संतर्पणानें शान्त झाले नाहींत. त्यांनीं श्रीमंतांचा अनेक वर्षांच्या संपत्तीनें भरलेला वाडा लुटून त्यास शेवटीं अग्नि

लावून दिला. शहरचे तट व दरवाजे पाडून टाकले. राममंदिर सुरेख होतें तें पाडून मूर्तिसुद्धां ठेविल्या नाहींत. बागांच्या भिंती पाडून उध्वस्त करून टाकिल्या. श्रीमंत बाजीरावसाहेबांनीं सरस्वतेश्वर सांबाचें देवालय लाखों रुपये खर्च करून संगमरवरी दगडाचें गंगातीरीं बांधलें होतें. त्याचें कारण असें होतें कीं, त्यांची सरस्वतीबाई म्हणून एक अति प्रिय पत्नी होती, ती रूपानें व गुणानें लोकोत्तर असून मोठे मनाची, दानशूर, हसतमुखी अशी होती. ती इतकी तेजस्वी व न्यायी होती कीं, एखादा गैर चालीचा पुरुष अगर स्त्री तिचे दृष्टीस पडल्यास त्यास ती एकदम वाड्याबाहेर हाकून देई व महाराजहि कांहीं बोलत नसत. जेव्हां जेव्हां स्वारी महाराजांपर्यंत जात असे तेव्हां तेव्हां महाराजांनीं मोठ्या भीतीनें आपले-जवळील माणसें असतील तीं दूर करावीं. तिनें एकादी गोष्ट सांगितल्यास ते ताबडतोब करीत. अशी त्यांची प्रियपत्नी नवज्वरानें कैलासवासी झाल्यावर महाराजांस अति दुःख झालें. तिचे मरणकाळीं पंचवीस तीस हजार रुपये धर्म केला, व गंगातीरीं उत्तम जागा पाहून चंदनकाष्ठांनीं व कापुरानें तिचा देह दग्ध केला, व मर्तिकासंबंधानें दीड लक्ष रुपये दानधर्म केला. ज्या जागेवर दहन केलें तेथें मोठें टोलेजंग देवालय बांधून आंत गर्भागार व सभामंडप पांढरे संगमरवरी दगडांनीं बहुत खर्च करून बांधलें व आंत श्रीसांबाची प्रतिष्ठा करुन सरस्वतेश्वर असें नांव ठेविलें. तें देवालय पाडून, शिवलिंग काढून टाकून संगमरवरी दगड खणून नेले, तेथें देवळाचा मागमूसदेखील ठेविला नाहीं.

या जगतीतलावर कालाचा महिमा किती थोर आहे! त्यापुढें समुद्रवलयांकित भूमिपतीचेंहि वैभव अगदीं तुच्छ व क्षणिक आहे. जी स्त्री आपल्या अलौकिक गुणांनीं जगतास मोहित करून धन्यता पावली ती आतां लोकांस कर्णोपकर्णीं माहितसुद्धां नसेल, व तिच्या पतीनें आपल्या अपार सामर्थ्यानें पृथ्वीवर तिचें स्मरण चिरकाल रहावें म्हणून तिला अनुरूप असें अत्युत्तम शिवमंदिर बांधलें त्या सरस्वतेश्वराची आतां लोकांस कथाहि माहीत नाहीं. त्या ठिकाणीं तिच्या गुणांची व तिच्या पतीच्या वैभवाची साक्ष देणारा एक संगमरवरी दगडहि नाहीं! येथें चंदनकाष्ठांनीं एक लोकोत्तर देह दग्ध झाला आहे, याची कल्पनाहि मनांत न येतां क्षेत्रस्थ श्वापदें त्या खणून टाकलेल्या जागेवर उकिरडा फुंकीत असतील.

असो. इकडे श्रीमंत लखनौचे मुलुखांत उतरले ते बेगमेस जाऊन मिळाले. लखनौचें राज्य फार प्राचीन व धनाढ्य होतें. तें बादशहा मरण पावतांच हावरे इंग्रज सरकारनें मोठ्या शिताफीनें गट्ट केलें होतें. परंतु बेगम आपल्या वाड्यांत राहून तेथेंच राज्य करीत होती. जिकडे तिकडे लढाया सुरू झाल्यावर कांहीं पलटणी बेगमेस मिळून त्यांचे साहाय्यानें व नेपाळचे दिवाण जंगबहादुर यांचे साहाय्यानें इंग्रजांस आपले मुलुखांतून हाकलून देऊन पुन्हां बेगम राज्यकारभार पाहूं लागली. परंतु इंग्रज सरकारनें जंगबहादुर यास पुष्कळ द्रव्य देऊन आपले बाजूस वळविलें आणि लखनौवर हल्ला केला. ती जबरदस्त लढाई सहा दिवस चालली होती. शेवटीं इंग्रज बहादुरांनीं शहर हस्तगत केलें. बेगम फौजेसुद्धां बरोबर द्रव्यानें लादलेले उंट, हत्ती घेऊन वायव्येकडे पळून गेली; तिजबरोबर मोठमोठे सावकारहि पळून गेले. इंग्रज सरकारनें शहर घेतल्यावर शहरांत एक प्रहरपर्यंत सडकबीजन करून बहुत लोक मारले व नंतर लुटीस आरंभ केला. लखनौ शहर फार श्रीमंत होतेंच. हजार वर्षांपावेतों तेथील राजे व नबाब नेहमीं नम्रतेनें वागून खंडणी देत आल्यामुळें लुटलें गेलें नव्हतें. याजमुळें फार प्राचीन काळापासून शहरांत संपत्ति तुंबली होती ती सर्व लुटून इंग्रजानें नेली.

सत्तावन्न सालच्या बंडापासून इंग्रज सरकारचें यत्किंचितहि नुकसान न होतां उलटा अनेक तऱ्हेनें त्यांचा फायदाच झाला. ज्यास दैव अनुकूल असेल त्याचें अनिष्ट करण्याचा यत्न केला तरी इष्टच होतें, व ज्यास दैव प्रतिकूल आहे त्यानें आपल्या फायद्याकरितां यत्न केला तरी त्यापासून नुकसानच होतें. इंग्रज लोकांस हिंदुस्थानांतून हांकलून द्यावें म्हणून बंडवाल्यांनीं यत्न केला, परंतु इंग्रज सरकार जय पावलें. इतकेंच नव्हे, तर त्यांस दिल्ली, बिठूर, लखनौ, चित्रकूट वगैरे अनेक ठिकाणीं लाखों रुपयांचा ऐवज मिळाला; व हिरे, माणकें, मोतीं यांचीं या प्राचीन हिंदुस्थानांत जीं अनेक भूषणें राजेरजवाड्यांच्या भांडारखान्यांत होतीं तीं सर्व त्यांस मिळून त्यांनीं विलायतेची लंका बनविली.

तात्या टोपी जो कानपुराहून पळाला तो अंतरवेदींत उतरून पळालेलें सैन्य मिळालें तेवढें जमा करून यमुना नदी उतरून काल्पीचे मुलुखांत शिरला. तेथें त्यास आणखी बंडवाल्या पलटणी मिळाल्यावर काल्पीचे किल्ल्यावर हल्ला केला. तेथें गोरे लोक फार कमी होते. ते लढाईची हूल दाखवून पळून जाऊं लागले; परंतु शत्रूस सांपडून मारले गेले. तात्यानें काल्पी शहरांत लागलीच श्रीमंतांचे

नांवाची द्वाही फिरवून शहराचा बंदोबस्त केला. काल्पीखालील मुलुखावर अम्मल चालवून मामलेदार नेमून जमाबंदी सुरू केली. पुढें पलटणीचें असें म्हणणें पडलें कीं, आम्हांस यजमान कोणी नाहीं, याजकरितां रावसाहेब किंवा बाळासाहेब यांपैकीं कोणी इकडे आल्यास आम्हांस बळकटी जास्त येईल. असा अभिप्राय समजतांच तात्या टोपी यानें पंचवीस स्वार रवाना करून श्रीमंतांस हकीकत कळवून त्यांचे अनुमोदनानें रावसाहेबांस काल्पीवर आणलें. रावसाहेब आठ हजार फौज घेऊन यमुनेचे कांठीं आले तों यमुनेस उतार नाहीं व उतरून जाण्यास नावाहि नाहींत. मग तेथेंच आठ दिवस मुक्काम केला, परंतु गोरे लोकांनीं जवळ असूनहि त्यांजवर हल्ला केला नाहीं. तात्या टोपी यांनीं नावा जमवून सर्व सैन्य उतरून आणिलें. रावसाहेब सुरक्षित आल्यामुळें मोठा आनंद होऊन पंचवीस तोफांची सलामी झाली. नंतर रावसाहेब किल्ल्यांत राहिले व तात्या मुलुखाचे बंदोबस्ताकरितां फिरूं लागले. लालपुरीबोवा थोडी फौज घेऊन अंतरवेदींतून काल्पीस येऊन यमुनेचे घांटावर उत्तरेस बारा कोसांवर घांटनाकें धरून राहिला. सरदार लक्ष्मण शिंदा काल्पीचे पश्चिम बाजूवर पंधरा कोसांवर बंदोबस्त करून राहिला व जळका रामभाऊ आठ हजार फौज घेऊन दक्षिणेस डंघाईचे मुलुखाचे डोंगरावर बंदोबस्त करून राहिला. याप्रमाणें काल्पीचे मुलुखांत पेशवाईचा अंमल सुरू होऊन जिकडे तिकडे भगवे झेंडे फडकूं लागले. नवीं पलटणें ठेवून शिकविण्याचें काम जारीनें सुरू झालें. त्या समयीं गोरे लोकांची पलटण हिंदुस्थानांत थोडी असून त्यांचा सर्व भर दिल्लीवर पडला होता. याजमुळें काल्पी प्रान्तांत पेशवाईचा अम्मल स्वस्थतेनें चालत होता.

याप्रमाणें ब्रह्मावर्ताकडील श्रीमंतांच्या हकीकती ग्वाल्हेरींत असतां आम्हांस समजत गेल्या. ग्वाल्हेरींतील बायजाबाईकडील संभावनेचें काम आटोपल्यावर आतां कोठें जावें याचा विचार करितां काकांचे ब्रह्मावर्ताकडील ओळखीचे गृहस्थ झांशीवाली लक्ष्मीबाई इचेपाशीं झांशीस आहेत, त्यांचे आश्रयानें झांशीस बरीच संभावना होईल असा अभिप्राय काकांचा पडल्यावरून झांशीस जाण्याचा निश्चय झाला. नंतर सोबतीची चौकशी करितां एक मराठा सरदार ग्वाल्हेरीहून आपले गावाकडे जाण्यास निघणार होता, त्याजबरोबर हत्यारबंद पंचवीस शिपाई होते. त्यांचे आश्रयानें एक गाडी करून कार्तिक शुद्ध पंचमीस तेथून निघालों, तों मजल दरमजल करीत झांशीस येऊन पोंचलों.

---

## ४ : : झांशी येथील पूर्ववृत्तान्त

यन्मनोरथशतैरगोचरं न स्पृशंति कवयोऽपि यद्गिरा ।
स्वप्नवृत्तिरपि यत्र दुर्लभा लीलयैव विदधाति तद्विधिः ॥ १ ॥

झांशी हें संस्थान पूर्वापार कऱ्हाडे ब्राह्मणांचें आहे. पूर्वीं हिंदुस्थानांत श्रीमंतांनीं अनेक लढाया मारून दिल्लीचे बादशहापासून पुष्कळ मुलुख काबीज केला व वजीरकीचीं वस्त्रेंहि मिळविलीं. त्या मुलुखाचे बंदोबस्ताकरितां महादजी शिंदे यांची ग्वाल्हेरीस स्थापना करून सर्व मुलुखाचा कारभार करूं लागले. त्या वेळेस शिंदे यांजवर नजर राखण्याकरितां एक स्वतंत्र सुभा पुण्याकडे खासगत असावा असें वाटल्यावरून झांशी हें शहर जुनें, मजबूत बांधीव व किल्ला फार बळकट असें जाणून झांशीचा प्रान्त सुमारें पंधरा लक्षांचा श्रीमंतांनीं खासगत ठेविला. व पुण्याहून रा. शिवरामभाऊ पारोळेकर खानदेशांतील पारोळें येथील राहणारे यांस सुभेदार नेमून रवाना केलें. त्यांचे पुत्रपौत्र पेशवाई लयास जाईपर्यंत तें काम चालवीत आले व दरसाल खर्चवेंच जाऊन सुभ्याचें उत्पन्न पुण्यास पाठवीत असत. पेशवाई बुडते वेळीं झांशी सुभा होता तो बुडून संस्थान झालें. संस्थानच्या शेवटच्या दोन चार पिढया दत्तकांच्या व निपुत्रिकांच्या झाल्या. शेवटचे संस्थानिक गंगाधरबाबा म्हणून होते, त्यांचें कुटुंब आजारी पडून कैलासवासी झालें. तेव्हां पुन्हां विवाह करण्याची इच्छा झाल्यावरून मोठी, सुरेख व कुलीन अशा कन्येचा शोध करूं लागले. गोत्राशीं जमणाऱ्या अशा पुष्कळ गोरगरीबांच्या मुली पाहिल्या, परंतु लग्नाचें जमेना. याचें कारण असें होतें कीं, गंगाधरबाबा ह्यांच्या वागण्याविषयीं लोकांत कांहीं विलक्षण ग्रह होता. तत्रापि राज्यसंबंधें गंगाधरबाबांची नोकरांस व रयतेस चांगली जरब होती. रोजचीं कामें वेळच्या वेळेवर व्हावीं अशी त्यांची ताकीद असे. विलंब झाल्यास अपराध्यास माशाची शेपटी घेऊन स्वतः शासन करीत असत. न्यायाचे कामांत त्यांचें लक्ष फार विलक्षण होतें. बहुतकरून शहरांत व राज्यांत चोरी फारच थोडी होत होती. असें सांगतात कीं, बाबासाहेबांनीं चोरीचा बंदोबस्त इतका केला होता कीं, लोकांनीं आपलीं कवाडें उघडीं टाकून निर्धास्त निजावें. प्रत्येक ठिकाणचे सुरक्षिततेबद्दल

जिमेदार घेतलेले असत. कदाचित् चोरी झाली असतां हे जिमेदार लोक मालाची नुकसानी भरून देत व कित्येक प्रसंगीं सरकारांतूनहि चोरी झालेल्या रकमेबद्दल ऐवज दिला जात असे. चोरी करतांना पकडलेल्या मनुष्यास धर्मशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें कधीं कधीं हात तोडून टाकण्याचीहि शिक्षा होत असे. यामुळें गंगाधरबाबांची रयतेवर व विशेषतः बदमाष लोकांवर फारच जरब होती. रयतेस न्याय देण्यास ते कधींहि विलंब लावीत नसत; व त्यांजकडे कोणाचीहि दाद लागल्याशिवाय राहात नसे. ते राज्य एकंदरीनें न्यायानें व विचारपूर्वक चालवीत होते; व साहेबलोकांत सतेजपणें आपला मोठेपणा सांभाळून होते. एकदां बाबासाहेबांचें व गार्दनसाहेबांचें भाषण झालें, त्यांत बाबासाहेब म्हणाले कीं, 'मी एक लहान मांडलिक राजा आहे. परंतु इंग्रज बहादुरापुढें पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर देशांत जेवढे राजेरजवाडे आहेत, तेवढ्यांनीं हातांत बांगड्याच भरल्या आहेत असें म्हटलें तरी चालेल. पहा, तुम्ही परद्वीपस्थ असून आमच्या द्वीपांत येऊन आम्हां सर्वांस करद केलें आहे, हें आश्चर्य नव्हे काय ?' अशा प्रकारचे बाबासाहेबांचे उद्गार ऐकून बाबासाहेबांच्या सतेजपणाबद्दल व कर्तबगारी-बद्दल गार्दनसाहेबांची खात्री झाली असली पाहिजे. असो. याप्रमाणें बाबासाहेबांचे राज्यांत रयतेस सर्व प्रकारें सुख असून त्यांचा इंग्रजांचे दरबारांत मोठा मान असे. परंतु बाबासाहेबांची घरची फार जरब असल्यामुळें त्यांस मुलगी देण्यास लोक धजत नव्हते. इतक्यांत बाबासाहेबांचे कारकुनास अशी बातमी लागली कीं, ब्रह्मावर्तास श्रीमंतांचे होमशाळेंत तांबे म्हणून भिक्षुक आहेत. त्यांची कन्या सुरेख असून उपवर झाली आहे. असें समजतांच कारकुनांनीं गंगाधरबाबांचे कानावर गोष्ट घालून मागणी घालण्याकरितां लागलेच लोक रवाना केले.

आमचे चुलते होमशाळेवर पंधरा वर्षें ऋत्विज्य करून होते, त्यांचेच हाताखालीं मोरोपंत तांबे हे शिष्यपणानें होते. तांबे यांचें कुटुंब वारलें, त्या वेळेस त्यांची मुलगी चार वर्षांची होती. घरांत दुसरें कोणी नसल्यामुळें तांबे यांनीं मुलगी फार प्रेमानें वाढविली. ती दिवसेंदिवस शुक्लपक्षाच्या चंद्राप्रमाणें अधिकाधिक सतेज होत चालली. मुलगी फार गौर, अंगानें कृश व उंच उभारणीची होती. तोंडा-वळा किंचित् लांबट असून नाक सरळ, कपाळ उंच, डोळे कमलाप्रमाणें विशाल व वाटोळे होते, व कान मुखाला शोभा देणारे होते; मध्यभागा शरीराचें झोंका-

प्रमाणें बारीक होता. याप्रमाणें ती मनमोहक मुलगी बापाचीं काय पण सर्वांची लाडकी होऊन गेली होती, व याचमुळें तिला छबेली म्हणून म्हणत असत. घरांत बायकोमाणूस कोणी नसल्यामुळें तिचें खेळणेंरेळणें, खाणेंपिणें होमशाळेंत व श्रीमंतांबरोबर होत असे. मुलीस लहानपणापासून पुरुषांत खेळण्याची संवय लागल्यामुळें व जात्या फार अचपळ व हुषार असल्यामुळें तिला पुरुषाचे गुण लागत चालले. लोकांनीं तिला मोडी–बालबोध लिहिण्यावाचण्यास शिकविलें, कोणीं तिला घोड्यावर बसावयास शिकविलें, कोणीं बाण मारावयास शिकविलें, कोणीं तिला हत्तीवर बसून फिरवावें, तालमींत घेऊन जावें, बंदूक हातांत देऊन बायबार काढवावे, तरवारीचे हात शिकवावे, याप्रमाणें श्रीमंती सुखांत रुळलेली व ज्यानें त्यानें लाड केलेली ती मुलगी शरीरानें दांडगी होऊन अकरा बारा वर्षांचे सुमारास पित्यास लाज आणूं लागली. त्यानें वराबद्दल पुष्कळ शोध केला; ब्रह्मावर्तीं कऱ्हाड्यांचीं घरें थोडीं असल्यामुळें जालवण, गुलसराई वगैरे ठिकाणीं यत्न केला; परंतु मुलीस भावी राजयोग घडणार असल्यामुळें कोठेंच जमेना. शेवटीं बापास फार काळजी लागून मुलगी ब्राह्मणाचे हातीं देऊन आपण निश्चिंत कधीं होऊं असें होऊन गेलें. असें निरुपम कन्यारत्न मोरोपंत तांब्यांच्या जोडीच्या एखाद्या चत्वामंत्रानो करणाऱ्या भिक्षुकांच्या अनभिज्ञ बटूच्या हातीं पडणार नाहीं व कटावर पाण्याचे घट वाहण्याखालीं त्याच्या राजकीय गुणांचें मातेरें होऊन जाणार नाहीं अशी आनंद देणारी कल्पना कोणाचे तरी मनांत आली होती काय? परंतु दैवगति थोर आहे. गुणज्ञ वैभवानें आपलें योग्य भाजन शोधून काढून तें त्याचे घरीं आपण होऊन चालत आलें.

झांशीवाल्याचे कारकून ब्रह्मावर्तास येतांच मोरोपंत तांब्यांस फार आनंद झाला. गोत्रास गणास पडल्यावर मुलगी देण्याचा निश्चय झाला. ब्रह्मावर्ताकडील मध्यस्थ जोशीबोवा यांनीं असें बोलणें लाविलें कीं, मुलीबद्दल आम्हांस पैसा घेणें नाहीं; परंतु तांबे यांजला पुत्रसंतान नाहीं म्हणून द्वितीय विवाह करणें आहे. त्याजबद्दल खर्च झांशीवाल्यांनीं करावा व तांब्यांस झांशीस राहण्यास जागा द्यावी. ही शर्त कारकुनांनीं गंगाधरबावांस कळवून मंजुरी आणल्यावर तांबे मुलीसह झांशीस गेले. त्यांस शहरांत स्वतंत्र वाडा देऊन आचारी, पाणके, ब्राह्मण वगैरे देऊन त्यांचे तैनातीस ठेवून दिलें. सुमुहूर्तावर लग्नसमारंभ होऊन वधूचें नांव

लक्ष्मीबाई ठेविलें. याप्रमाणें लाडक्या छबेलीच्या थोरल्या लक्ष्मीबाईसाहेब बनल्यावर तांब्यांच्या वैभवास काय विचारतां? जिकडे तिकडे सोनें होऊन गेलें. त्यांचा विवाह होऊन एक मुलगा व एक मुलगी अशीं दोन अपत्यें झालीं.

लग्न झाल्यापासून लक्ष्मीबाईस कोणत्याहि प्रकारचें सुख नव्हतें. नवरा तर षंढच होता; परंतु त्याचा अंमलहि फार करडा असे. त्यामुळें तिला स्वतंत्रता फार थोडी होती. वाड्याच्या बाहेर पडण्याची तिला मोकळीक नव्हती, इतकेंच नव्हे पण बाईसाहेब बहुतकरून कुलुपांत असत. तिच्या भोंवतीं नेहमीं बायकांचा पहारा असे. पुरुषांचें वारेंहि तिला लागूं दिलें नाहीं. अशा प्रकारच्या जुलुमी वागविण्यानें तिचे राजशाली गुण नाहींसे होऊन तिला कांहीं दुर्गुणहि जडते; परंतु सुदैवानें गंगाधरबाबा लग्न झाल्यावर फार दिवस जगले नाहींत. त्यांस नवज्वर होऊन त्यांचा परिणाम झाला. त्यांस औरस पुत्र नव्हता. सबब गार्दनसाहेब रेसिडेंट यांस मरतेसमयीं बोलावून आणून त्यांनीं विनवून सांगितलें कीं, माझे आप्त पारोळास पुष्कळ आहेत त्यांपैकीं एक लहानसा हुषार मुलगा पाहून आणून माझे स्त्रीचे मांडीवर द्यावा. गार्दनसाहेबांचाहि बाबांवर लोभ फार होता. त्यांनीं पुष्कळ खटपट केली, परंतु गव्हर्नरसाहेबांनीं एकदम औरसपुत्र नाहीं सबब राज्य खालसा करावें असा हुकूम केला. गार्दनसाहेबांनीं वाड्यास हात न लावतां बाकी सर्व प्रान्त आपले ताब्यांत घेतला व चोंहींकडे इंग्रजांचे नांवाची द्वाही फिरविली. लक्ष्मीबाई ही फार दक्ष व हुषार बायको होती. तिनें नवऱ्याचे आज्ञेप्रमाणें पारोळाहून आप्तांपैकीं एक मुलगा आणवून दत्तक घेतला व त्याजला राज्य देण्याविषयीं सरकारांत अर्ज नेला, व आपण त्याचे नांवानें शहरांत व वाड्यांत राज्य करूं लागली. पुढें बंड झाल्यावर इंग्रज लोक राज्य सोडून कसे गेले व लक्ष्मीबाई सर्व मुलुखाचा बंदोबस्त करून राज्य कसें करूं लागली याची हकीकत आम्ही झांशीस आल्यावर आम्हांस समजली.

आम्ही झांशीस मजल दरमजल येऊन पोहोंचल्यावर सोबत्यांबरोबर बाहेर एक मोठा बाग होता त्या बागांत उतरून जेवणखाण केलें, व शहरांत जाऊन कोठें उतरावें याचा विचार करूं लागलों. तांबे हे पक्के परिचयाचे होते खरे, परंतु राणीचे वडील असल्यामुळें एकदम त्यांचे येथें जाऊन उतरावें असें मनांत येईना. अशा विचारांत आहों तों शहरांतून सहज हवा खाण्याकरितां ब्राह्मण

मंडळी बाहेर येतांना दृष्टीस पडली. त्यांस विचारतां त्यांनीं असें सांगितलें कीं, तुम्ही विद्वान् आहां, त्यापेक्षां तुम्हांस उतरण्यास उत्तम जागा वेदमूर्ति राजेश्री केशवभट्ट मांडवगणे म्हणून ऋग्वेदी महाविद्वान् प्रतिष्ठित ब्राह्मण आहेत. राजाश्रय नाहीं तरी स्वतंत्र असून फार सभ्य चालीचे आहेत त्याचे येथें मिळेल. त्यांची पत्नीहि फार साधी व माणुसकीस उत्तम अशी आहे. त्यांचे येथें आपण जाऊन उतरावें. नंतर आम्ही शहरांत गेलों आमचे सोबती आपआपले ठिकाणीं गेल्यावर आम्हीहि मांडवगणे यांचे घराचा पत्ता लवीत त्यांचे घरीं गेलों. वाड्यांत शिरलों तों स्त्रीपुरुषें सहज बाहेर बसलीं होतीं, त्यांस नमस्कार करून राहण्याबद्दल विचारतांच त्यांनीं संतोषानें राहण्यास परवानगी दिली. त्या दिवशीं सायंकाळीं आम्हांस क्षुधा नव्हती तरी त्या स्त्रीनें रात्रौ आम्हांस फार आग्रह करून फराळास दिलें, व भोजनोत्तर इकडील तिकडील राज्यसंबंधें सर्व हकीकती झाल्या. तिसरे दिवशीं आम्ही केशवभटजी यांचे आश्रयानें स्वतंत्र बिऱ्हाड त्याच वाड्यांत केलें. गांवची रीतभात व हकीकत पक्की समजल्याशिवाय तांबे यांस भेटूं नये असा विचार ठरून सात दिवस तसेच शहरांत फिरून काढले.

झांशी शहर उत्तर हिंदुस्थानांत फार सुरेख व टुमदार आहे. तेथील किल्ला फार जुनाट असून मोगलांनीं बांधलेला मोठा बळकट आहे अशी प्रसिद्धि होती. तो शहराचे पश्चिम बाजूला एक लहानसा डोंगर आहे त्याजवर बांधलेला आहे. पायथ्याशीं सभोंवार रुंद व खोल खंदक पाण्यानें भरलेला असल्यामुळें एकाच बाजूनें आंत जाण्यास रस्ता होता. डोंगराचे माथ्यावर मोठा चुनेगची तट सभोंवार बांधून आंत ४००० मनुष्य राहील इतकी जागा आहे. मुख्य सरकारी वाडा चार पांच मजली व आठ चौकी असून सभोंवतीं लहान लहान निरनिराळ्या कामाचे उपयोगी बंगले होते. वाड्याचे पश्चिमेस शिपाई लोकांची कवाईत वगैरे करण्यासारखें विस्तीर्ण मैदान आहे. त्यांत चिंचेचीं झाडें पुष्कळ होतीं. तटाची रुंदी पुष्कळ असून मधून मधून टोलेजंग बुरूज व बुरुजांखालीं मोठीं तळघरें होतीं. मुख्य वाड्याचें काम जुनें, मजबूत व सुरेख होतें. व तो इतका विस्तीर्ण होता कीं, सर्व दालनांची माहिती होण्यास सुमारें एक महिना लागे. वाड्यास ठिकठिकाणीं बैठकी, गालिचे व गाद्या टाकून तयार ठेविलेलीं दालनें व हवा खाण्याकरितां कुंड्यांतून झाडें ठेवून रमणीय केलेल्या गच्च्या साधल्या होत्या.

४

वाड्याचे दक्षिण बाजूचा बंगला फार उंच सात मजली होता. व उत्तर बाजूस पंचवीस पायऱ्या खालीं उतरून सपाट जागा होती तेथें पाण्याचा चोपडा म्हणजे हौद होता; त्यास पाणी महामूर होतें. व यामुळेंच त्या जागेंत एक मोठी विस्तीर्ण व रमणीय बाग, फुलझाडें, द्राक्षाच्या वेली, आंबे, पेरू वगैरे लहान-थोर झाडांनीं भरलेली होती. बागेंत एक लहानसा बंगला होता त्यास शंकर किल्ला म्हणत. तो केवळ ऐषआरामाच्या उपयोगी सर्व सामानांनीं भरला असून क्रीडाभुवनच होता असें म्हणण्यास हरकत नाहीं.

किल्ल्याचे नैर्ऋत्य कोनापासून दक्षिण बाजूनें पूर्वेकडे व वायव्य कोनापासून उत्तर बाजूनें पश्चिमेकडे असा शहरचा कोट गेला होता. तोहि उंच, रुंद व मजबूत असून मधून मधून त्यास बुरूज होते, व मुख्य अंबारीचे हत्ती जाण्यासारखे पांच दरवाजे होते. बाकी लहान लहान बरेच होते. किल्ल्याचे पूर्वेस कोटाचे आंत बरेंच मैदान टाकून शहरास आरंभ झाला आहे. त्या मैदानांतून शहरांत जाण्याचे रस्ते फार सुरेख दिसतात. पुढें शहरची वस्ती दाट असून रस्तेहि अरुंद आहेत; व कोष्टीपुरा व हलवाईपुरा वगैरे कांहीं मुख्य मुख्य भाग उंच उंच हवेल्यांनीं भरलेले असून सुरेख आहेत. शहराचे मध्यभागीं भिडयांचा मोठा बाग आहे व त्यांत पांच सहा मोठ्या विहिरी आहेत. याशिवाय शहरांत अनेक लहानसहान बाग आहेत. शहरांतील मुख्य सरकारी चवरचौकी वाडा आहे त्याचें काम पहाण्यासारखें आहे. एकंदर घरें मजल्याचीं व विंध्याद्रि जवळ असल्यामुळें पर्जन्य पुष्कळ पडतो सबब धाब्याचीं नसून कौलारू आहेत. घरोघर विहिरी व विहिरीस पाणी जवळ आहे. शहरचे दक्षिण दरवाजाबाहेर एक मोठा तलाव आहे. त्यांत महालक्ष्मीचें एक टोलेजंग देऊळ आहे. ही देवी झांशीवाल्याची कुलस्वामिनी असल्यामुळें देवस्थानाचा बंदोबस्त फार मोठ्या खर्चाचा ठेवलेला असे. नंदादीप, पूजा, महानैवेद्य, चौघडा, गायक, नर्तकी व धर्मशाळा यांची व्यवस्था मोठ्या थाटाची होती. आषाढापासून तों चैत्रापर्यंत देवास जाणें तें होडींतून जावें लागत असे. वैशाख ज्येष्ठ महिने मात्र थोडा पायरस्ता मिळे. तटाच्या आंत याशिवाय शहरांतहि गणपति, विष्णु इत्यादिकांचीं मोठीं देवालयें पुष्कळ आहेत व त्यांचे पूजेबद्दल नेमणूक सरकारांतून असे. शहरचे नैर्ऋत्य कोपऱ्यांत एक मोठा चोपडा म्हणजे पाण्याचा हौद आहे, त्यास पाणी फार आहे.

शहरची रीत वगैरे फार चांगली आहे व लोकहि श्रीमान्, उद्योगी व कसबी आहेत. गालिचे, रेशमी वस्त्रें व पितळी सामान या शहरासारखें दुसरें कोठें होत नसे. तसेंच कागदावर चित्रें काढण्याचेंहि काम येथें अप्रतिम होत असे. शहरांत ब्राह्मणांचीं घरें सुमारें ३०० असून ब्राह्मण्याला शहर फार चांगलें आहे. म्हणजे असें कीं, दक्षिणेंत पुणें व हिंदुस्थानांत झांशी. सकाळीं उठून प्रातःस्नान करून आपले हातानें धोतरें धुवून व दुसरीं स्वच्छ गुलाबी नेसून उद्योगास बाहेर पडावें असा या शहरचा रिवाज असे. संध्याकाळीं मोतिया, जाई, जुई वगैरे सुवासिक फुलांचे गजरे घेऊन गंध्याचे दुकानांतूनहि रिकामी मंडळी बरीच दृष्टीस पडे. झांशी बुंदेलखंडांतला भाग असल्यामुळें येथील स्त्रिया सुरेख व विशेषेंकरून विशाल व काळ्याभोर डोळ्यांच्या असतात. पुरुषांत षंढत्व बरेंच आढळतें. याजमुळें स्त्रियांस मोकळीक फार असे. संध्याकाळीं हातांत रुप्याचा पेला घेऊन देवदर्शनाचे निमित्तानें बाहेर पडावें व कोणा सोद्याकडे जाऊन यावें अशा चालीचा डंका शहरांत पुष्कळ होता. या शहरांत पूर्वी घडलेली एक विलक्षण गोष्ट ऐकिवांत आली ती सांगण्यासारखी आहे. थोरले माधवराव पेशवे यांचे वेळीं झांशींत पारोळकर यांचे पदरीं नारायणशास्त्री म्हणून विद्वान् ब्राह्मण होते. ते शृंगारशास्त्रांत फार निष्णात होते. त्यांनीं एके दिवशीं शौचकूपाजवळ भंगिणीची पोर पाहिली. तिच्या नेत्र, चरण, हस्त वगैरेंच्या लक्षणांवरून व अंगाचे सुवासावरून ही पद्मिनी आहे असा शास्त्रीबोवांचा निश्चय झाला. नंतर तिच्या आईस अनेक फुसलावण्या देऊन ती मुलगी वश करून घेऊन चांगलें अन्नवस्त्र देऊन वाढविली, व वयांत आल्यावर शास्त्रीबोवा तिजशीं रममाण होऊं लागले व तिला वेळोवेळीं घरींहि आणूं लागले. त्याच स्त्रीवर शहरांतील पुष्कळ लोकांचा डोळा होताच. तेव्हां त्या भंगिणीनें शास्त्रीबोवांस विचारतां त्यांनीं तिला असें सांगितलें कीं, तुला द्रव्याची इच्छा तर नाहीं, तर तूं प्रत्येकापासून द्रव्य न घेतां एक एक यज्ञोपवीत घेत जा. याप्रमाणें कांहीं दिवस लोटल्यावर शास्त्रीबोवांचें हें वर्तमान त्यांच्या पत्नीस सहजच समजलें. तिनें बहुत प्रकारें त्यांची विनवणी केली. घरांत बाटवडा केल्या-बद्दल आक्रोश केला; परंतु शास्त्रीबोवांनीं मारहाण करून तिला गप्प बसविलें. त्याजमुळें ही बातमी कर्णोपकर्णी पारोळकर यांस समजल्यावर त्यांनीं गुप्त हेर ठेवून शास्त्रीबोवांस व भंगिणीस एकें ठिकाणीं पकडविलें व आपल्यासमोर आणून निक्षून विचारतां शास्त्रीबोवांनीं उत्तर केलें कीं, मीच तर काय, परंतु शेंकडों

ब्राह्मण बाटले आहेत. असें म्हणून भंगिणीकडून यज्ञोपवीतें काढून दाखविलीं. हें पाहतांच पारोळकरांस फार धास्ती पडली. कारण हें सर्व शहर बाटल्याचें वर्तमान पुण्यास समजलें तर फार आकान्त होईल. नंतर तावडतोब दुसरे गांवचे ब्राह्मण आणवून त्यांजकडून शहराबाहेर पंचगव्य तयार करविलें, व दर एक ब्राह्मणाकडून क्षौरकर्म करवून यज्ञोपवीत व पंचगव्य देऊन शुद्ध केलें. व सर्व शहरभर रस्त्यावर व घरांतून गोमूत्राचा सडा केला. खुद्द शास्त्रीबोवा प्रायश्चित्त घेण्यास नाखुष असल्यामुळें त्यांस भंगिणीसह हद्दपार केलें. असो.

शहरासंबंधीं सर्व मौजा पाहिल्या व ऐकल्यावर एके दिवशीं मुहूर्त पाहून सकाळींच भोजन वगैरे आटोपून मोरोपंत तांब्यांचे भेटीस निघालों. वाड्यांत जाऊन पहारेकऱ्याकडून कोणी ब्रह्मावर्तांचे ब्राह्मण भेटीस आले आहेत अशी वर्दी देवविली. परवानगी मिळाल्यावर माडीवर गेलों तों तांब्ये तक्याशीं मंडळीं-सहवर्तमान बसले होते. त्यांनीं काकांस पाहतांच उठून चार पावलें पुढें येऊन त्यांस तक्याशीं जागा घेतली. मीहि जवळच बसलों. कुशलवृत्त वगैरे झाल्यावर भेटीचें कारण विचारतां काकांनीं सांगितलें कीं हा ज्येष्ठ बंधूचा ज्येष्ठ पुत्र आहे. कार्यप्रयोजनामुळें पुष्कळ ऋण झालें, याजकरितां त्याजला बरोबर घेऊन आपले भेटीचा हेतु धरून आलों आहे. ग्वाल्हेरीस वैशंपायन यांजकडे बरेच दिवस काढले. व तेथें कांहीं दिवस राहून काशीस जाऊं व तेथून घरीं जाऊं, वगैरे बरींच बोलणीं झाल्यावर तांब्यांनीं सरकारचे उपाध्ये लालूभाऊ ढेंकरे यांस भेटण्याविषयीं सांगितलें व मीहि बाईसाहेबांचे कानावर ही गोष्ट घालितों म्हणून म्हणाले. दुसरे प्रहरीं आम्ही लालूभाऊ ढेंकरे यांस भेटावयास गेलों. ब्रह्मावर्ता-कडील कोणी विद्वान् ब्राह्मण आले आहेत अशी बातमी त्यांस अगोदरच समजली होती व आम्हांस पाहतांच उठून आमचा आदरसत्कार चांगला केला व आपण स्वस्थ असावें असें आश्वासन दिलें.

क्षत्रुक्षय व्हावा व राज्य सुरक्षित रहावें या हेतूनें बाईसाहेबांनीं अनेक अनुष्ठानें चालू केलीं होतीं. महालक्ष्मीस रोज नवचंडी सुरू होती. ग्रहांबद्दल जप व दानें चालू होतींच. गणपतीचे देवालयांत रोज अथर्वशीर्षाचीं सहस्र आवर्तनें होत असत. त्यांतच काम्य ग्रहयज्ञ गृह्यपरिशिष्टोक्त सहस्रपक्ष कुंडमंडपासहित करावा; असा ठराव झाला. सरकारवाड्याजवळ जागा पाहून तेथें विस्तीर्ण

छायामंडप टाकून कुंडें, वेदी वगैरेंची सर्व तयारी झाली. काशीहून, ब्रह्मावर्ताहून मोठे मोठे विद्वान् ब्राह्मण बोलाविले होते व रोज होमाकडे शंभर ब्राह्मणांची नेमणूक झाली. मुहूर्ताचे दिवशीं पदरची बाहेरची सर्व मंडळी बसली आहे, बाईसाहेब स्वतः स्वच्छ वस्त्र परिधान करून दत्तक मुलास घेऊन बसल्या आहेत, लालूभाऊ ढेंकरे कुलोपाध्याय जवळ व्यवस्था करीत आहेत, वेदशास्त्रसंपन्न भय्या उपासने उत्तम पाटावर बसून देखरेख करीत आहेत, व जवळच मोरोपंत तांब्ये राज्ञीजनक हजर आहेत, अशा थाटानें संकल्पास आरंभ झाला. तो सर्वानुमतें बाईसाहेबांचे नांवानें केला. नंतर नान्दीश्राद्ध सुरू झालें तों त्यांत मुलाचे पितृगणाचा उच्चार करूं लागले. त्या समयीं मजला विचार पडला कीं, मुख्य संकल्प बाईसाहेबांचे नांवाचा, व नान्दीश्राद्ध भलत्याचें होतें हें कसें? येथें मोठमोठे याज्ञिक, शास्त्री, पंडित बसले आहेत पण कोणी बोलत नाहीं, आपण न बोलावें तर अनुष्ठानांत चूक होत आहे. शिवाय कुचिष्टा केल्याशिवाय प्रतिष्ठा वाढत नाहीं इत्यादि विचार करून गुरूचें स्मरण करून सभेंत बोलण्यास आरंभ केला, "अहो! किंचित् अनुष्ठान बंद करा. मला कांहीं प्रश्न केला पाहिजे. स्त्री वेदाधिकारी नसल्यामुळें पुण्याहवाचनादि कर्मांस उपाध्याय प्रतिनिधि असतो म्हणून त्याच्या पितरांचें नान्दीश्राद्ध होईल काय? मुख्य संकल्पीं रावसाहेबांनीं आपले नांवाचा उच्चार केला असता तर ठीकच होतें; परंतु येथें बाईसाहेबांचेच नांवाचा संकल्प झाला आहे, तर त्यांचेच पितरांचें नान्दीश्राद्ध केलें पाहिजे असें मला वाटतें." हें म्हणणें भय्या उपासने यांस सयुक्तिक वाटलें; परंतु विनायक भटजी याज्ञिकांना रुचलें नाहीं. उगाच बोलून तंटा उत्पन्न करण्यांत कांहीं हांशील नाहीं, ग्रंथाधार पाहिजे, असें म्हणतांच मी मयूख, हेमाद्रि वगैरे ग्रंथांचीं नांवें घेतलीं. ग्रंथ जवळच होते ते आणून पाहतां नान्दीश्राद्ध बाईसाहेबांचे पितरांचें करावें, असे सर्वानुमतें ठरलें. तेव्हां मला फार आनंद वाटला. मी दूर बसलों होतों तो मला उपासनेबोवांनीं पुढें घेऊन नान्दीश्राद्धांत बाईसाहेबांचा ऊह कसा आणावा असा प्रश्न केला. मीं लागलींच 'प्रद्वयज्ञविधायिन्यः मम मातुः' असा करावा म्हणून सांगतांच सर्वांनीं माना डोलविल्या. याप्रमाणें त्या सभेंत जयशीलालशावर उपासनेबोवांनीं माझे अंगावर पोथी टाकून मजला सदस्याचा वर्ण दिला. मींहि गुरुकृपेंकरून एक चुकी न होऊं देतां कर्म चालवून चवथे दिवशीं पूर्णाहुति देऊन समाप्त केलें. अनुष्ठानासंबंधें दररोज ब्राह्मणभोजन होत होतें व

चवथे दिवशीं मुक्तद्वार होतें. सर्व ब्राह्मणांस दक्षिणा बक्षिसें वांटलीं. त्यांत मला बारा रुपयांचा धोतरजोडा व वीस रुपयांचें पागोटें बक्षीस मिळालें. बाईसाहेबांची व काकांची ओळख पटून बरेंच बोलणें झालें. त्यांत त्यांनीं असें म्हणून दाखविलें कीं, तुमचा मुलगा चांगला विद्वान् आहे व तो येथेंच राजाश्रयानें राहील तर बरें. त्याजवर काकांनीं उत्तर केलें कीं, याकरितांच मीं त्याजला घेऊन सरकारचे भेटीस आलों आहे. त्याजवर कांहीं दिवसांनीं सप्तशतीस पल्लव लावून शतचंडीचें अनुष्ठान करावें असा बेत झाला. सर्व तयारी होऊन मुहूर्त पाहून किल्ल्यांत एक मोठी जागा पाहून तेथें घटस्थापना केली. चवदा ब्राह्मण मूळमंत्रजपाकडे बसविले. प्रत्येकाचे समोर तुपाची समई, एक अगरबत्ती व सुवासिक पुष्पें ठेविलीं असत व त्यास दिवसास क्षिप्राभोजन व रात्रौ फराळ असा बेत होता. याप्रमाणें अनुष्ठान झाल्यावर व त्यांतहि शाबसकी मिळाल्यावर मार्गशीर्ष शुद्ध ५ चे दिवशीं बाईसाहेबांनीं आम्हांस किल्ल्यांत बोलावून नेऊन हुकूम केला कीं, आजपासून उभयतां शहरचे वाड्यांत बिन्हाड आणावें. येथें कारकून तुम्हांस चीजवस्त देऊन सर्व बंदोबस्त ठेवील. तूर्त तुम्हांस तीस रुपये दरमहा मिळेल. याप्रमाणें हुकूम होतांच मांडवगणे यांस मजकूर निवेदन करून दुसरे दिवस बिन्हाड सरकारी वाड्यांत नेलें. तेथें सर्व प्रकारची उत्तम रीतीची सोय होऊन वस्त्रप्रावर्णें उंची उंची वापरावयास मिळून आम्ही आनंदानें राहूं लागलों. मोठमोठाल्या आश्रित मंडळींच्या ओळखी झाल्या व अब्रूहि वाढली. पुढें थोडक्याच दिवसांनीं मजला बाईसाहेबांनीं किल्ल्यांत हुजूर आश्रितांत घेतलें, तेव्हांपासून तर आमचा फारच वडिजाव झाला. नेहमीं रेशिमकांठी धोतरें नेसावयास, शालजोडी पांघरावयास, उत्तम पागोटें डोकीस घालावयास मिळत असे. एके दिवशीं बाईसाहेबांनीं मला शालजोडीशिवाय फिरतांना पाहिलें. तेव्हां मला संध्याकाळीं समक्ष बोलावून जरीकांठी हिरवी शाल बक्षीस दिली. बाईसाहेबांस शेंकडों नजराणे येत. ते सर्व आश्रित मंडळीचे फायद्यावर पडत. आमचें महत्त्वहि फार वाढलें. महालक्ष्मीचे देवालयांत ब्राह्मण सहस्रभोजनें चार झालीं. वांकनीस नेमून चार आणे दक्षिणा व मोतीचूर पक्वान्न असा ठराव करून कंत्राट दिलें होतें. प्रतिदिवशीं अकरा वाजतां कोणी तरी पाळीप्रमाणें पीताम्बर नेसून रुप्याची पळीपंचपात्री घेऊन महालक्ष्मीस जावें; नंतर उपाध्यांनीं उदक सोडल्यावर भात, भाज्या, कोशिंबिरी, पक्वान्न यांची चौकशी करून मग किल्ल्यांत परत यावें. याप्रमाणें मीहि दोनचारदां

गेलों होतों, अशीं अनेक सुखें भोगीत बाईसाहेबांचे सन्निध राहूं लागलों व दरबारसंबंधें व राज्यसंबंधें सर्व प्रकारची माहिती झाली.

बाईसाहेबांचा नित्यक्रम येणेंप्रमाणें होता. त्यांस शरीराचा षोक लहानपणापासून होता तो त्यांनीं स्वतंत्रता मिळाल्यावर पूर्ण केला. पहांटेस उठून कसरतशाळेंत जाऊन जोर, जोडी, मलखांब करावा; नंतर घोड्यावर बसून फिरावयास जावें व घोडा मंडळावर धरावा, कुंपणावरून उडवावा, खंदकाचे पार घालवावा, एकदम खालीं बसवावा इत्यादि नाना प्रकारच्या घोडयाच्या कसरती कराव्या. कधीं कधीं हत्तीवरहि बसत असत. याप्रमाणें सात आठ वाजेपर्यंत मेहनत झाल्यावर नेहमीं खुराख खात असत. नंतर तासभर कधीं निजत असत कधीं तशाच स्नानास जात. स्नानाविषयीं बाईसाहेब फार हौशी असत. नेहमीं पंधरा वीस हांडे कडकडीत पाणी लागत असे. दर आठ दिवसांनीं नाहाणाचे दिवशीं उत्तम सुवासिक द्रव्यानें स्नान इतका वेळ करीत असत कीं, स्नानाचें पाणी नळानें बाहेर स्वच्छ कुंडांत सोडलें होतें तेथें पुष्कळ बायकांचें नाहाण होत असे. स्नान झाल्यावर स्वच्छ पांढरें चंदेरी पातळ वस्त्र परिधान करून आसनारूढ होऊन भस्म धारण करीत. प्रथम पतिमरणानंतर केस राखण्याबद्दल तीन कृच्छ्रें प्रायश्चित्त आहे, त्याचें उदक सोडून नंतर रुप्याचे तुळशीवृंदावनांत तुळशीची पूजा करीत असत; नंतर श्रीपार्थिवलिंगपूजेस आरंभ होत असे. त्या समयीं सरकारी गवई गात असत, पुराणिकाचें पुराणहि त्यांत सुरु असे व सरदार व आश्रित लोकांचे मुजरे होत असत; परंतु बाईसाहेबांचें लक्ष चोंहोंकडे सारखें असे. जर एखादे दिवशीं दीडशें मुजरे करणारापैकीं कोणी आला नाहीं तर दुसरे दिवशीं काल आपण कां आलां नाहीं ही चौकशी झाल्याशिवाय राहात नसे. याप्रमाणें बारा वाजावयाचे सुमारास देवार्चन आटोपून जेवण होत असे. नंतर कांहीं वेळ इकडे तिकडे काढल्यावर कधीं वामकुक्षि झाल्यावर सकाळीं आलेले नजराणे रुप्याचे ताटांत रेशमी वस्त्रांनीं आच्छादून ठेवले असत ते आपले समोर आणून मनास आवडतील ते पदार्थ ग्रहण करून बाकीचे आश्रित मंडळीकरितां कोठीवाल्याचे स्वाधीन करीत. तीन वाजावयाचे सुमारास कचेरींत जात असत. त्या वेळेस कधीं पुरुषवेष धारण करीत. पायांत पायजमा, अंगांत जांभळे आंबऱ्याची बंडी, डोक्यास टोपी घालून वर पागोट्यासारखी बांधलेली बत्ती,

कमरेस काच्या किंवा जरीचा दुपेटा व त्यास लटकवलेली तरवार, या प्रकारच्या पोषाखानें ती गौरवर्ण उंच मूर्ति गौरीप्रमाणें दिसत असे. कधीं बायकांचा पेहराव असे; परंतु पतिमरणानंतर नथ वगैरे अलंकार त्यांनीं बिलकुल घातले नाहींत; फक्त हातांत सोन्याच्या बांगड्या व गोठ, गळ्यांत एक मोत्यांचें पेंढें व अनामिकेंत एक हिऱ्याची अंगठी याशिवाय दुसरे अलंकार आम्हीं बाईसाहेबांचे अंगावर कधींच पाहिले नाहींत. केसांचा नेहमीं बुचडा बांधलेला असे व नेसावयास पांढरा शालू व अंगांत स्वच्छ पांढरी चोळी असे. याप्रमाणें कधीं पुरुषवेषानें तर कधीं स्त्रीवेषानें दरबारांत येऊन, एक खोलीसारखा पडतपोशीची जागा होती व त्याच्या दरवाजास बाहेरून सोनेरी मेहरब होती. त्या दरवाजाचे आंत गादी घालून सरपोस घातलेल्या जाग्यावर लोडाशीं टेकून बसावें. दरवाजाचे बाहेर दोन भालदार रुप्याची काठी घेऊन हजर असत. समोर राजेश्री लक्ष्मणराव दिवाणजी कंबर बांधून हातांत कागदांचें पुडकें घेऊन उभा असे व पलीकडे हुजूरचे सात आठ कारकून बसलेले असत. लक्ष्मणराव जातीचा देशस्थ ब्राह्मण होता. तो अगदीं अक्षरशत्रु असे. त्यास लिहितां किंवा वाचतां बिलकुल येत नसे; परंतु तोंडची पाटिलकी करणारा मात्र फार हुषार होता. एखादें पत्र वाचा किंवा लिहा म्हटलें म्हणजे लागलींच आपल्या हाताखालच्या कारकुनाकडे नजर. कचेरींत सर्व दिवाणी, फौजदारी, मुलकी कामें होत असत. बाईसाहेब बुद्धीच्या फार चपळ असल्यामुळें हकीकत तावडतोब समजून भराभर हुकूम सांगत असत. कधीं स्वतः लिहितां वाचतां येत असल्यामुळें मजकूर जुळवून आणि हुकूम लिहीत असत. बाईसाहेब न्यायाचे कामांत फार दक्ष व कडक होत्या, व अपराध्यांस कधीं कधीं स्वतः छडी घेऊन शिक्षा करीत. दर शुक्रवारीं व मंगळवारीं सर्व स्वारी तयार करवून मुलास बरोबर घेऊन संध्याकाळीं महालक्ष्मीचे दर्शनास जाण्याचा नियम होता.

लक्ष्मीबाईचे स्वारीसारखा थाट आतां पुन्हा नजरेस पडणार नाहीं. बाईसाहेब कधीं मेण्यांत व कधीं घोड्यावरून दर्शनास जात. मेण्यावर किनखापी कापडास जरीनें बांधलेले चिकाचे पडदे असल्यामुळें मेणा फारच सुशोभित असे. कधीं स्वारी स्त्रीवेषानें असे. त्या वेळेस पांढरें पातळ नेसून जुजबी मोत्यांचे दागिने अंगावर असत. पुरुषवेषानें असल्यास अंगांत आंबव्याची बंडी असून पायांत

पायजमा, डोकीस टोपी व टोपीवरून भरजरी पागोट्याची वत्ती बांधलेली असून पाठीवर वत्तीचा पदर जरीचा लोळत असे तो फार मनोहर दिसे. अशी स्वारी मेण्यांत वसून मेणा झरझर चालवीत असतां मेण्याचे खूर धरून दोन किंवा चार सुंदर दासी दवडत असत. या दासी लहानपणापासून याच कामाकरितां वाळग-लेल्या असत. दक्षिणेंतून लहानपणीं सुरेख कुणव्याच्या मुली विकत आणून त्यांस उत्तम खावयास घालून १५-१६ वर्षांचे सुमारास या कामावर नेमीत. त्या अविवाहित असल्यामुळें तारुण्यमदानें रसरसलेल्या असत. पांच सहा वर्षें काम केल्यावर वहुतकरून त्या रतीसारख्या सुंदर दासी एखाद्या लुच्च्याच्या नादास भुलून फसून जात व एकदां त्या गर्भार राहिल्या म्हणजे मग या कामावरून दूर होऊन त्यांची गणना कुळंबिणींत होत असे. त्यांनीं जामदारखान्यांत जाऊन सोनें, मोर्ती, हिरे, यांचे दागिने नखशिखान्त घालून, भरजरीच्या चोळ्या घालून हिरव्या, तांबड्या, भस्मी रंगाच्या पैठण्या नेसाव्या, पायांत मोठमोठे तोडे घालून तांबडे लाल नवे उत्तम चर्मी जोडे घालावे, कधीं लुगड्याची कांस मारावी, आणि एका हातांत रुप्याचे किंवा सोन्याचे दांड्याची चवरी घेऊन एक हात मेण्याचे दारास लावून मेण्यावरोवर दवडावें. तेव्हां त्या अविवाहित सुंदर सिंह-कटी सर्वालंकारयुक्त दासींकडे कोणाची टक लागत नसे. स्वारीपुढें डंका निशाण असून रणवाद्यें हलके वाजत असत. निशाणामागून सुमारें दोनशें विलायती लोक असत. व मागें पुढें सुमारें शंभर स्वार असत. स्वारी निघण्याची वेळ झाली म्हणजे बाईसाहेब दोघींस किंवा चौघींस वरोबर येण्याविषयीं हुकूम करीत. मग मेण्यावरोवर घोड्यांवर कारभारी, मुत्सद्दी, मानकरी, भय्यासाहेब उपासने, कांहीं आश्रित मंडळी असत. वरोवर शिबंदीचे लोकहि असत.

याप्रमाणें थाटानें शिंगें, कर्णे वाजत, बंदुकीचे शेंकडों आवाज काढीत, स्वारी किल्ल्याचे वाहेर पडली म्हणजे किल्ल्याचे बुरुजावरील चौघडा सुरू होई तो स्वारी परत येईपर्यंत वाजत असे. व तसाच महालक्ष्मीचे देवालयाचे नगारखान्यांतील चौघडा सुरू होत असे. किल्ल्यांतून निघून भर बाजारांतून महालक्ष्मीस स्वारी जाऊन परत येत असे. कधीं कधीं सडी स्वारी घोड्यावरून जाई त्या वेळेस दासी, आश्रित, कारकून, पायदळ, वगैरे कोणी बरोवर नसत. फक्त घोडेस्वार व विलायती लोक असत. स्वारी परत येतांना रात्र झाली तर मशाली पेटवीत;

परंतु घोड्यावर स्वारी असल्यास मशाली न लावितां दवडत दवडत किल्ल्यांत परत येत.

बाईसाहेबांची आश्रित मंडळीवर फार श्रद्धा असे. त्यांस खायाप्यायास चांगलें मिळावें, कपडे लत्ते चांगले असावे, त्यांस सर्व प्रकारचें सुख असावें याजविषयीं त्यांची फार दक्ष नजर असे. त्यांस सर्व गुणांची परीक्षा असून चहा असे. जवळ मोठमोठाले शास्त्री, विद्वान्, वैदिक, याज्ञिक होते; व वडिलोपार्जित कित्त्याप्रमाणें पुस्तकांचा संग्रह फार अमोलिक केला होता. चांगले पुराणिक, गवई, सतार वाजविणारे वगैरे लोक, निरनिराळ्या कसबाचे नामांकित कारागीर त्यांच्या पदरीं होते. बाईसाहेब स्वतः फार निष्कपट व निर्मल वृत्तीनें रहात असत तरी त्यांस सर्व प्रकारची हौस असे. कोणी उत्तम गवई आल्यास त्याचें गाणें करून बिदागी पोंचविल्यावांचून रहात नसत. शिमग्यांत रंगाचा खेळ चांगला होत असे. दत्तक-पुत्र रावसाहेब यांचे स्वारीबरोबर मी त्या वर्षाचे शिमग्यांत शहरांत गेलों होतों. जागोजाग मुत्सद्दी लोकांकडे पानसुपारी होऊन रंग खेळून पुन्हा किल्ल्यांत परत आलों. त्याच दिवसांत ग्वाल्हेरीस कोंकणची नाटक मंडळी सुमार पन्नास आली होती, त्यांस शहरांतल्या लोकांनीं पत्र पाठवून झांशीस बोलावून आणविलें. त्यांचे खेळ शहरांत पुष्कळ झाले. तेव्हां बाईसाहेबांनीं त्यांस सरकारांतून शिधा चालू करवून किल्ल्यांत पुष्कळ नाटकें करविलीं. एकदां हरिश्चंद्राचें आख्यान झालें त्या वेळेस सदोबा नाटकवाला यानें विचारिलें कीं, या नाटकांत डोंबाचे घरीं हरिश्चंद्राचे डोक्यावर मडकें फोडावें लागतें. तर त्याजबद्दल परवानगी असल्यास मडकें आणवून फोडीन. त्यावर विचार होऊन बाईसाहेबांनीं परवानगी दिली, परंतु जेव्हां नाटकांत बैठकीवर घागर फोडली तेव्हांच वृद्ध मंडळी बसली होती त्यांस हा अपशकुन आहे असा चरका बसला. नाटकें फार सुरेख होत असत. नाटक-वाल्यांस 'संध्याकाळीं किल्ल्यांत घेऊन सर्व सरकारी खजिना त्यांचेपुढें मोकळा ठेविला असे. मग खरे हिऱ्याचे अलंकार व जरीचीं वस्त्रें मिळाल्यावर पात्रें कां खुलणार नाहींत. नाटक झाल्यावर सर्वांचा झाडा घेऊन नंतर किल्ल्याबाहेर पाठवीत असत. कांहीं नाटकें झाल्यावर दोन तीन नाटकें दरबारच्या मंडळींच्या बायका बोलावून त्यांस दाखविलीं. शेवटीं नाटकवाल्यांस एक मेजवानी करून बिदागी देऊन रवाना केलें. कोणास पागोटीं, कोणास धोतरजोडे दिले व सदोबा मॅनेजर यास रोख चार हजार रुपये दिले.

बाईसाहेबांस अश्वपरीक्षा चांगली होती. उत्तर हिंदुस्थानांत त्या वेळेस तिघांचें नांव गाजत असे. एक नानासाहेब पेशवे, एक बाबासाहेब आपटे ग्वाल्हेरीकर व एक लक्ष्मीबाई झांशीवाली. एके दिवशीं एक सौदागर फार देखणे व चलाख दोन घोडे विकावयास घेऊन आला. बाईसाहेबांनीं त्यांजवर बसून मंडळावर धरून किंमत ठरविली ती एकाची हजार व दुसऱ्याची पन्नास. व असें सांगितलें कीं, दुसरा घोडा जरी दिसण्यांत फार उमदा व चलाख आहे तरी तो छातींत फुटला आहे. याजमुळें अगदीं नादान आहे. त्याजवर सौदागरानें बाईसाहेबांच्या कुशलतेची तारीफ करून कबूल केलें कीं, या घोड्यास मी उत्तम मसाला देऊन देखाऊ ठेविला आहे. याची परीक्षा मीं पुष्कळ फिरलों परंतु कोठें झाली नाहीं. बाईसाहेबांनीं दोन्ही घोडे ठरविलेल्या किंमतीस विकत घेतले व सौदागरास बक्षीस देऊन मार्गस्थ केलें.

बाईसाहेब स्वतः लोकांची काळजी फार वहात असत, व राजकारणाकरितां स्वतः मेहनत घेण्यास कधीं मागेंपुढें पाहात नसत. बलवासागर म्हणून एक लहान शहर झांशीचे अमलांत आहे. तेथें चोरट्यांचा उपद्रव फार होऊन प्रजेस पीडा होऊं लागली. तेव्हां स्वतः स्वारी तयार करून बलवासागरास जाऊन पंधरा दिवस मुक्काम करून चोरांचा ठिकाणा लाविला व कांहींस फांशीं देऊन कांहींना कैद केलें व प्रान्त निर्भय केला. अशा अनेक गुणांनीं भरलेल्या त्या स्त्रीरत्नाचें औदार्य व शौर्य हे गुण तर निरुपमच होते. कोणीहि दरिद्री भिक्षुक कधींहि विन्मुख गेला नाहीं. एके दिवशीं एक काशीकर विद्वान् ब्राह्मण उपाध्यांचे मार्फत किल्ल्यांत नित्य दानास गेला. तेथें लालूभाऊ ढेंकरे यांनीं त्याची विद्येविषयीं व शीलाविषयीं फार स्तुति केली व असेंहि सांगितलें कीं, प्रथम स्त्री मरण पावल्यामुळें व वय अल्प असल्यामुळें दुसरा विवाह करण्याची भटजीची इच्छा आहे; परंतु मुलीला पैसा फार पडतो सबब फार दुःखी आहेत. हें ऐकून बाईसाहेबांनीं प्रश्न केला कीं, रुपये देऊन मुलगी देणारा आहे कीं काय? त्याजवर भटजी नम्रतेनें बोलले कीं, आमचे जातीचा एक देशस्थ ब्राह्मण काशीस आहे, त्याची मुलगी सुमारें बारा वर्षांची असून रूपानें बरी आहे. रास, घटित वगैरे सर्व जमलें आहे; परंतु त्यास मुलीबद्दल रुपये चारशें दिले पाहिजेत. ते मीं गरीबानें कोठून आणावे? शिवाय लग्नाचे खर्चाकरितां सुमारें शंभर लागतील. हे शब्द ऐकतांच बाईसाहेबांनीं पांचशें रुपये

तांब्याचे ताम्हनांत आणवून उदक सोडून भटजीचे पदरांत ओतले व सांगितले कीं, लग्न होईल त्या वेळेस आम्हास कुंकुमपत्रिका पाठविण्यास विसरूं नये. याप्रमाणें त्या भटजीबोवाचें नशीब उदयास आल्यावर तो मोठ्या उत्कंठेनें काशीस परत गेला व लग्नसमारंभाची तयारी करून बाईसाहेबांस मूळ धाडिलें.

एके दिवशीं बाईसाहेबांबरोबर मी महालक्ष्मीचे दर्शनास गेलों होतों. स्वारी परत येतांनी दक्षिणदरवाजांतून आंत शिरली तों हजारों भिकारी रस्ता अडवून उभे आहेत व गलका करीत आहेत हें पाहून बाईसाहेबांनीं दिवाणजीस कारण पुसतां लक्ष्मणराव यांनीं विदित केलें कीं, महाराज, हे लोक गरीब भिकारी आहेत; हल्लीं थंडी फार पडते व यांस पांघरूण नसल्यामुळें त्यांचे फार हाल होत आहेत, याजबद्दल विचार होण्याविषयीं सरकारचे पायांपाशीं यांचा अर्ज आहे. हें ऐकून बाईसाहेबांस फार वाईट वाटलें व लागलीच हुकूम केला कीं, आजपासून चवथे दिवशीं भिकारी लोकांचा रमणा करावा व दर मनुष्यास एक रुदार टोपी, एक रुदार बंडी व एक काळी किंवा पांढरी घोंगडी द्यावी. असा हुकूम होतांच दुसरे दिवशीं शहरचे दर्जी जमा करून टोप्या व बंड्या शिवण्यास आरंभ केला. व नेमिलेल्या दिवशीं दवंडी पिटवून शहरचे वाड्यासमोर भिकारी लोक जमा केले. त्यांत सामान्य गरीब लोक शिरले होते. दरएकास टोपी, बंडी व घोंगडी वांटली. सुमारें चार हजार टोपी वांटली गेली असेल. असो. अशा अनेक गोष्टी आहेत. ग्रंथविस्ताराचे भयानें लिहितां येत नाहींत. बाईसाहेबांचें शौर्य कसें होतें त्याची सर्व जग साक्ष देतच आहे, व ह्या ग्रंथांतहि पुढें त्याचेंच वर्णन होणार आहे. असो.

अशा त्या उदार शूर राजकारस्थानी बायकोशीं इंग्रज सरकारचें वर्तन फार अन्यायाचें झालें होतें यांत संशय नाहीं. प्रथम जेव्हां तिनें आपले दत्तकपुत्रास राज्य देण्याविषयीं सरकारास अर्ज केला, आमचें घराणें पुष्कळ जुनें आहे व इंग्रज सरकारशीं मोठ्या नेकीनें व प्रेमानें वागत आलें आहे, आमच्या तहनाम्यावरून आम्हीं दत्तक घेऊं नये असा निषेध नाहीं, सबब आमच्या जुन्या राज्यावर व नेकीवर व तहनाम्यावर लक्ष देऊन सरकारनें मेहेरबानीनें राज्य खालसा न करितां माझा दत्तक घेतलेला मुलगा कबूल करावा, इत्यादि तिनें अनेक कारणें अर्जांत दाखविलीं; परंतु राज्य खालसा झालें. मात्र शहरांतील राजवाडा व त्यांतील द्रव्य तसेंच तिजकडे राहूं दिलें होतें. तिनें मोठ्या हिंमतीनें आपले

नवऱ्याचे वेळचे जुने नोकर कांहीं पगार कमी करून आपलेपाशीं ठेवून घेतले, त्यांच्या खर्चाकरितां व स्वतःच्या इनमामाकरितां तिजला इंग्रज सरकारांतून दरमहा चालू झाला होता तो मोठ्या काटकसरीनें पुरत असे. परंतु दुःखावर डाग याप्रमाणें तोहि तिचे नवऱ्याचे कर्जाकरितां कांहीं दिवस बंद केला. तिनें केशवपन करण्यासाठीं काशीस जाण्याविषयी परवानगी मागितली तीहि तिला मिळाली नाहीं. अशा प्रकारची हेळसांड झाल्यामुळें त्या मनस्विनीचे मनांत इंग्रजाविषयीं द्वेषबुद्धि उत्पन्न झाली. परंतु जेव्हां धर्माचे बाबतींतहि इग्रज सरकार अन्याय करूं लागले, तेव्हां तर तिचे पायाची आग मस्तकास गेली. हिंदुधर्मांत गोब्राह्मण फार पवित्र मानले आहेत व गाईचे वधाची फार निंदा केली आहे, झांशी शहरांत गाईचा वध करू नये अशाबद्दल लक्ष्मीबाईनें अर्ज केला, परंतु त्या अर्जाकडे कोणीं यत्किंचितहि लक्ष दिलें नाहीं. दुसरी एक गोष्ट अशी झाली कीं, महालक्ष्मीचे देवालयाचे पूजेकरितां दोन गांव तोडून दिले होते ते सरकारांत खालसा करावे असा सरकारचा हुकूम सुटला. तसें न होण्याविषयीं लक्ष्मीबाईनें पुष्कळ यत्न केला, परंतु यःकश्चित् बायकोचें ऐकतो कोण? पण लक्ष्मीबाई कांहीं साधारण बायको नव्हती. तिच्या अंतःकरणांत इंग्रजाविषयीं द्वेषाग्नि पेटून अगदीं कल्पान्त होऊन गेला. तिच्या बाळपणचा भाऊ व समदुःखी नानासाहेब त्याजपाशीं तिनें पत्रव्यवहार सुरू केला, व इंग्रजाचा सूड कसा घ्यावा या विचारास व उद्योगास ती लागली.

बंडाचे नेमिलेल्या तारखेच्या आदले दिवशीं छावणींतील गोरे लोक घाबरून गार्दन साहेबासहित बाईसाहेबांस भेटले व विनंति केली कीं, उदईक आम्हांवर वाईट प्रसंग येणार असें खचित दिसतें. यापेक्षां आपण आपले राज्याचा बंदोबस्त ठेवावा. झांशीखालीं दुसरा मुलूख आहे तो मिळून २५ लक्षांचे प्रान्ताचा बंदोबस्त पुन्हां इंग्रजी अंमल होईपर्यंत आपण संभाळला पाहिजे, व होईल तितकें करून आमचेंहि रक्षण केल्यास फार उपकार होतील. असें म्हणून दप्तर स्वाधीन केलें. तेव्हां बाईसाहेबांनीं उत्तर केलें कीं, पूर्वीं स्वस्थता होती त्या वेळेस मीं राज्य मागितलें तेव्हां मला मिळालें नाहीं, व आतां दंग्यांत तुमचे-जवळ राहाणार नाहीं म्हणून मला देतां काय? कलकत्त्यास सभा झाली त्यास मला बोलाविलें नाहीं. आमचे येथें मरतेवेळेस विनंति केली कीं, माझेमागें

माझ्या बायकोच्या मांडीवर दत्तक देऊन त्याच्या हस्तें राज्य चालवावें तीहि तुम्हीं जुमानली नाहीं व मला असें सांगितलें कीं, अलीकडे रुळी नवीन झाली आहे कीं, संस्थानिकांनीं दत्तक पुत्र घेऊं नये, घेतल्यास खासगी जिंदगीचा मालक ठरेल, राज्य मिळणार नाहीं. नंतर केशवपन करण्यास प्रयागास जाण्याविषयीं हुकूम मागूं लागलें तोहि मला मिळाला नाहीं. त्यापेक्षां आतां ज्याचा रस्ता त्यानें पहावा. शिवाय तुम्हांस आश्रय दिल्यास काळ्या पलटणी आम्हांस कुटून जाळून फस्त करितील. यास्तव होईल त्या रीतीनें आपला जीव तुम्हीच वांचवावा. असें म्हणून बाईसाहेब उठून गेल्यावर साहेबहि निघून गेले.*

दहा वाजायचे सुमारास ठरावाप्रमाणें काळे लोक बेदिल होऊन दंगा करूं लागले. बंदुकांचे आवाज होऊं लागून छावणीस आग लागली. त्या छावणींत गोरे लोक थोडे होते ते सर्व त्यांनीं मारून टाकून दारूगोळा मेखजीन खजिना तंबू वगैरे सामान आपले ताब्यांत घेतलें व छावणी जाळून टाकिली. सर्व काळ्या पलटणी तेथून निघून बाईसाहेबांचे वाड्यासमोर येऊन बाईसाहेबांस हांका मारूं लागल्या. तेव्हां त्यांनीं बाहेर येऊन ऑफिसर लोकांस भेटून त्यांस अभयवचन दिलें व त्यांनींहि सांगितलें कीं, तुम्ही आमचे यजमान, आम्ही तुमचा हुकूम ऐकूं व तुम्हांपासून दरमहा मुशाहिरा घेत जाऊं. याप्रमाणें राज्य हातीं आल्यावर आपले नांवाची शहरांत 'खुल्क खुदाका मुल्क बादशाहका अंमल लक्ष्मीबाईका' अशी द्वाही फिरवून सर्व कामें सुरू करविलीं. किल्ल्यांत साहेब लोक शिरले होते म्हणून तेथील भुया नवीन करवून व गोमूत्रानें सर्व किल्ला शुद्ध करवून बाईसाहेब

---

* झांशीस कानपुराप्रमाणेंच इंग्रेजी बायकापोरांची कत्तल शिपाई लोकांनीं केली. मात्र ती दंग्याचे प्रथम दिवशीं झाली. या कत्तलींत बाईसाहेबांचें कांहीं अंग नव्हतें असें 'के' साहेबाच्या उताऱ्यावरून दिसतें. I have been informed on good authority that none of the Ranee's servants were present. It seems to have been mainly the work of our own old followers. The irregular cavalry issued the bloody mandate and our jail Daroga was formost in the butchery. (केचा इति. व्हॉ. ३०, पान ३६९) मालिसननें आपल्या पुस्तकांत याच्या उलट अभिप्राय दिला आहे. पण तो केच्या अभिप्रायाइतका भरंवशाचा नाहीं हें दोन्ही इतिहास वाचणारास ताबडतोब समजेल.

सुमुहूर्तावर तेथें रहावयास गेल्या. नवीन बंदुका व तोफा व दारू करण्याचें काम मोठ्या झपाट्यानें चालू केलें. जुनीं माणसें कमी पगारावर बाईसाहेबांचे पदरीं होतींच. त्यांचा पगार पूर्ववत् करून राज्यसंबंधें सर्व कामाचा बंदोबस्त केला. शहरचे तटाची दुरुस्ती सुरू केली व राज्यरक्षणाकरितां अनुष्ठानें, ग्रहयज्ञ सुरू केले.

झांशी शहर हस्तगत झाल्यापासून सुमारें अकरा महिने उत्तर हिंदुस्थानांत इंग्रज बिलकुल नव्हता असें म्हटलें तरी चालेल. काल्पी खालचा छप्पन्न लक्षांचा मुलूख तात्या टोपी याचे ताब्यांत असून तहशीलदार वगैरे नेमून दिवाणी मुलकी सर्व कामें सुरळीत चाललीं होतीं. नंतर इंग्रज लोकांच्या विलायतेहून पलटणी आल्यावर मद्रासी काळ्या पलटणी बरोबर घेऊन हैद्राबादेचे निजामापासून पांच हजार स्वार घेऊन शिंदे, होळकर, गायकवाड, घोरपडे वगैरे सरदारांच्या मदती घेऊन कप्तान साहेब* मुंबईहून निघाला तो जरनेली झेंडा फडकावून खानदेश, सातपुडा वगैरे मुलुखाचा बंदोबस्त करीत चालला. महूचे छावणींत कांहीं दिवस राहून इंदूरचे राज्यांत कोठें कोठें बदमाश लोकांनीं बखेडे केले होते ते सर्व मोडून टाकले.

झांशीपासून पश्चिमेस वेत्रवती नदीजवळ बाणपुर म्हणून एक लहानसें संस्थान आहे. तेथील राजा लक्ष्मीबाईचा मानलेला थोरला भाऊ होता. तो दंगा करून पलटणी लोकांस आश्रय देऊन राहिला होता. त्यानें असा विचार केला कीं, या शहरावर इंग्रजाची व आपली लढाई होणार. त्यापेक्षां शहरचे लोकांस येथून जाण्याचा हुकूम देऊन आपलें कुटुंब अर्थासहित झांशी येथें रवाना करावें. त्याप्रमाणें कप्तान साहेब जवळ आला अशी बातमी लागतांच आपली रयत बोलावून आणून त्यांस कळविलें कीं, "येथें थोडके दिवसांत जंग होणार, सबब तुम्हीं येथून निघून कोठें तरी ग्रामान्तरीं जाऊन आपली व्यवस्था पहावी." नंतर राजानें आपलीं माणसें व अर्थ घेऊन झांशीस येऊन राणीचे स्वाधीन केलीं. तेथें त्यास स्वतंत्र वाडा देऊन माणसें तैनातीस ठेवून बाईसाहेबांनीं त्याचा योग्य बंदोबस्त केला. नंतर राजा बाणपुरास परत गेला तों लवकरच इंग्रजी फौज बाणपुरावर आली. शहरास वेढा देऊन सात दिवसपर्यंत लढाई झाली. अखेरीस इंग्रज बहादुरांनीं शहर हस्तगत करून घेऊन दोन प्रहर बीजन करून शहरांत आपले नांवाची

* सर ह्यू रोज.

द्वाही फिरविली व राज्य निर्भय केलें. बाणपुरचा राजा राहिलेली फौज घेऊन शहरांतून निघून जाऊन वेत्रवतीचे बेहेडयांत दवा धरून बसला. वेत्रवतीच्या कांठीं मोठमोठे बेहडे म्हणजे ज्यांचा हजारों फौज राहील अशा पडलेल्या आहेत. इंग्रजांनीं बाणपुर घेतलें व राजा जिवंत असून कोठें तरी पळून गेला आहे, ही बातमी झांशीस समजतांच गडबड होऊन गेली. झांशीवर लढाई करावयाची हा निश्चय बाईसाहेबांनीं करून तटबंदीच्या तयारीस लागल्या. फौजेंत लोक जास्ती ठेवून तटावर दाट सारखी फौज लाविली व बुरुजांवरून मोठाल्या तोफा लावून ठेविल्या. दारूगोळयाचें सामान जारीनें तयार करविण्याचे कामावर लालू बक्षी यास नेमिलें. गरीब लोकांस पुढें खाण्यास मिळणार नाहीं सबब खंडोगणती चुरमुरे व फुटाणे भाजून ठेविले. शहरांत सर्व सामुग्री भरून ठेविली. गणपतीचे देवालयांत प्रसंग पडल्यास भोजनाचें मुक्तद्वार ठेवण्याचा विचार ठरवून तूप, साखर, कणिक, तांदूळ वगैरे सामानाची तजवीज करून ठेविली. खजिन्यांत सर्व खर्चाला पुरे इतकें द्रव्य नव्हतें म्हणून राजवाडयांत जितकीं मोठमोठीं पातेलीं, हांडे, घागरी, डबे, घंगाळें वगैरे रुप्याचीं भांडीं होतीं तीं सर्व टांकसाळेंत पाठवून हजारों रुपये पाडविले. लढाईंत आपणास जय यावा म्हणून परमेश्वरप्रीत्यर्थ अनुष्ठानें देवालयांतून सुरू केलीं. काल्पीस रावसाहेब व तात्या टोपीस पत्रें लिहून मदत मागितली. याप्रमाणें ती शूर बायको यत्किंचितहि न डगमगतां मोठया शान्ततेनें व हुशारीनें शहरचा बंदोबस्त करून राहिली.

इकडे इंग्रज सरकारची फौज सर्व बुंदेलखंडाचा बंदोबस्त लावून झांशीवर पश्चिमेस दीड कोसावर येऊन थडकली. तेथें डेरे, राहुटया वगैरे देऊन कप्तानानें स्वाराबरोबर बाईसाहेबांस पत्र दिलें. तें दिवाणजी घेऊन किल्ल्यांत आल्यावर पांच चार मुत्सद्दी व बाईसाहेब एकत्र होऊन पत्राबद्दल विचार करूं लागले.

पत्रांत मजकूर असा होता कीं, "बाईसाहेबांनीं खुद्द बरोबर लक्ष्मणराव दिवाणजी, लालू बक्षी, मोरोपंत तांबे वगैरे आठ असामींचीं नांवें लिहिलीं होतीं त्यांस घेऊन मला येऊन भेटावें. याशिवाय दुसरें कोणीहि बरोबर आणूं नये व बरोबर हत्यार कोणतेंहि आणूं नये. आजपासून दोन दिवसांत भेटावें, पलीकडे भेटूं नये." झांशीस लढाई द्यावयाची हा निश्चय अगोदर झालाच होता. फक्त पत्रोत्तर कसें द्यावें याचाच विचार होऊन खालील जबाब पाठवून दिला.

"मेटीस कशास बोलाविलें आहे व दगा होईल कां नाहीं याचा पत्रांत खुलासा कांहींच नाहीं. संस्थानचे चालीप्रमाणें हत्यारबंद लोक बरोबर घ्यावयाचे ते लोक घेऊन दिवाणजी भेटीस येतील. मी बायकोमनुष्य, माझें येणें होणार नाहीं. याजवर आपली मर्जी." असा मजकूर लिहून बाईसाहेबांची सही होऊन लखोटा त्याच स्वाराबरोबर इंग्रजांचे गोटांत पाठवून दिला. पत्रोत्तर पाहून फौज परत दतियावर गेली व तेथें झांशीस वेढा देण्याची सर्व तयारी केली. डंघाईचे मुलुखाकडे म्हणजे काल्पीचे दक्षिणेस पंचवीस कोसांवर एक दोन ऑफिसरांबरोबर फौज रवाना केली. पेशवे व तात्या टोपी यांनीं झांशीवाली बाईचे मदतीस येऊं नये म्हणून त्याजबरोबर लढाई नेहमीं सुरू ठेवावी हें काम त्यांजकडे सोंपवून दिलें. इकडे बाईसाहेबांनीं चांगला मनुष्य पाहून त्यांजबरोबर पांच स्वार देऊन काल्पीस रावसाहेबांकडे रवाना केला. त्या लोकांनीं श्रीमंतांस झांशींतील सर्व मजकूर कळवून अशी विनंति केली कीं, बाईसाहेब आपले भरंवशावर लढाई करीत आहेत. आपण बाहेरून येऊन इंग्रजाबरोबर लढावें व आम्ही आंतून लढतों, म्हणजे आपणांस जय येऊन इंग्रजांचें कांहीं चालणार नाहीं. रावसाहेबांनीं त्यांस सर्व कबूल करून आश्वासन देऊन परत पाठवून दिलें. इंग्रज सरकारनें झांशीचे भोंवतालीं गांवोगांवीं जाहीरनामे लाविले कीं, झांशीवर जंग होणार आहे याजकरितां सर्व लोकांनीं सावध असावें. शहर घेतल्यावर तीन दिवस बिजन चालेल. त्याचा नियम असा कीं, पांच वर्षांवर व ऐंशीं वर्षांचे आंत सर्व पुरुष मारले जातील. याजकरितां जंगाचे दिवसांत तेथें कोणी जाऊं नये.

---

## ५ : : झांशी येथील उत्तरवृत्त

हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम् ।
तस्मादुत्तिष्ठ कौन्तेय युद्धाय कृतनिश्चयः ॥ १ ॥

चैत्र महिना अगदीं सरत आला, उन्हाळयाची झांक मारूं लागली, वसंत जाऊन ग्रीष्म ऋतूचा अंमल बसूं लागला. नंतर झांशी येथें थोडक्याच दिवसांत जंग होणार हें निश्चित झाल्यावर कांहीं कांहीं सावध ग्रामस्थांनीं आपला अर्थ व बायकामुलें ग्वाल्हेरीस रवाना केलीं. याजमुळें शहरांत हळदीकुंकवाची गर्दी व्हावी तशी झाली नाहीं. जिकडे तिकडे उदास वृत्तीनें लोक वावरत होते, बाईसाहेबांनीं मनांत आणिलें कीं, पुन्हा हळदकुंकू करण्याची वेळ येईल तो सुदिनच समजला पाहिजे याजकरितां महालक्ष्मीची सेवा वैभव आहे तों पूर्ण करून घ्यावी असें मनांत आणून राजवाड्यांत हळदकुंकवाची मोठी कडाक्याचा तयारी केली. चार खंडी हरभरे एका लहानशा हौदांत भिजत घातले. आणि शुक्रवारचा बेत धरून सकाळी तमाम शहरचे स्त्रियांस बोलावणें केलें. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, मराठे, सर्व जातींच्या स्त्रियांस पाचारणकरून सर्वांस हळदकुंकू, सुवासिक फुलें, चंदनलेप, खिरापत, रुप्याचे ताम्हनभर दाणे, गुलाब, अत्तर व पानसुपारी देऊन संतुष्ट केलें. असें समारंभाचें हळदकुंकू मी कोठेंच पाहिलें नाहीं व पुन्हां होणारहि नाहीं असें वाटतें. सर्व जातींच्या स्त्रिया उत्तम प्रकारचीं वस्त्रें नेसून व अलंकार घालून दुपारचे दोन वाजल्यापासून रात्रौ नऊ वाजेतोंपर्यंत किल्ल्यांत एकसारख्या येत होत्या. त्यांत सरदार लोकांच्या स्त्रिया मेण्यांत, पालखींत बसून भालदार, चोपदार शिबंदी लोकांसहित थाटानें येत असत. स्त्रियांस हळदीकुंकू वांटण्याकरितां सुमारें शंभर बायको उभी असेल. लाखों फुलें वेचलीं, खंडोगणति खिरापत लागली. दिवाणखान्यांत उंच एका मजल्याइतकी गौर मांडून उतरत उतरत जमिनीपर्यंत एकसारखें सामान ठेविलें होतें. सर्व प्रकारचे फराळाचे जिन्नस, फळफळावळ, रुप्याचें सामान, झांशी येथील प्रसिद्ध पितळी सामान व कागदाचीं कोरीव चित्रें, नानातऱ्हेचीं मातीचीं

चित्रें, लांकडी सामान, कुंड्यांतून वारीक झाडें शेंकडों जिन्नस गौरीपुढें ठेविले होते. जिकडे तिकडे किनखापाचे पडदे असून जरीचें छत लाविलें होतें, व हांड्याझुंबरांचा तर चकचकाट करून सोडिला होता.

चैत्र महिना सरून वैशाख लागला, तों एके दिवशीं शहरचे दक्षिण अंगास मैदानांत तंबू दिसूं लागले व जिकडे तिकडे वारीक आगट्या पेटल्या. तेव्हां आम्ही सायंकाळीं किल्ल्याचे उंच बुरुजावरून पाहूं लागलों तों शहरचे चारी अंगांस ठिकठिकाणीं तंबू मारून पलटणी उतरल्या आहेत, आगटी पेटल्या आहेत व जिकडे तिकडे चळवळ सुरू आहे असें दृष्टीस पडलें. परंतु देखाव्या-प्रमाणें मनुष्य कमी आहे असा आम्ही तर्क बांधला. रात्रौ बातमीदार आला त्यानेंहि सांगितले कीं, मनुष्य सरंजाम दिसतो त्यापेक्षां कमी आहे. सुमारें लढवय्ये साठ हजार आहेत. बाकी बाजारबुणगे पुष्कळ आहेत. वेढा येऊन पडला असें समजतांच रात्रौ बाईसाहेबांनीं किल्ल्याचे तटावर व शहरचे तटावर फिरून बंदोबस्त केला. सर्व बुरुजांवर मोरचे बांधून तोफा रोखून ठेविल्या व गोलंदाज नेमून दिले. शहरचे तटावर जंग्या जंग्यांतून कडामिनी घेऊन शिपाई लोक उभे केले. ठिकठिकाणीं दरवाजाजवळ शिपाई लोकांच्या टोळ्या ठेवून वर विश्वासू व दक्ष सरदार नेमून दिले.

झांशी शहरचे बाहेर चोहींकडे मोठमोठीं मैदानें आहेत म्हणून सांगितलेंच आहे. दुसरे दिवशीं सकाळीं शहरचा तट आटोक्यांत येईल असा मोरचा बांधण्याकरितां इंग्रजाचे पांच पंचवीस स्वार दवडत दवडत जवळ आले. ते किल्ल्याचे पश्चिमेस येऊन माऱ्यांत आले असें पाहून गोलंदाजानें नेम धरून तोफेस बत्ती दिली. त्या योगानें पांच सहा स्वार मरून बाकीचे उधळून गेले. याप्रमाणें पहिले दिवशीं इंग्रजी फौज शहरास चोहों बाजूनें मोर्चे बांधण्याचा प्रयत्न करीत होती. परंतु तटावरून व बुरुजांवरून दक्ष व हुषार गोलंदाज असल्यामुळें माऱ्यांत माणसें पुढें आलीं कीं बत्ती देऊन फडशा उडवून टाकीत. याप्रमाणें दुसरे दिवशींहि मोरचा बांधण्याकरितां इंग्रज झटत होता; परंतु मोरचा लागू होईना. शहरांत जुने म्हातारे लोक होते त्यांस शहरास व किल्ल्यास कोठें मोरचा बांधून लागू होतो हें माहीत होतें. परंतु ही माहिती फार थोड्यांस होती: आंतील फितुरीचे योगानें म्हणा किंवा बाहेरील कोणी माहितगार इंग्रजास

मिळाला म्हणा, तिसरे दिवशीं ही माहिती त्यास मिळाली. मग रात्र पडल्यावर तीं तीं ठिकाणें साधून मोरचे वांधून अवशीं चार घटका रात्रीस किल्ल्याचे पश्चिम बाजूवर दक्षिणेकडील अंगानें गरनाळी तोफ चालू झाली. इकडून वायव्य बाजूनें ही तोफ गोळा टाकूं लागली. शहरावर चार तोफा लागू झाल्या. अशा तोफा चालू झालेल्या पाहून वाईसाहेवांस अति दुःख झालें व निराशेची पहिली पायरी त्यांस लागली. परंतु न डगमगतां लोक जास्ती ठिकठिकाणीं ठेवून आपण स्वता अन्नपाण्याची काळजी न करितां किल्ल्यावर व शहरचे तटावर खपूं लागल्या.

शहरावर तोफांचे गोळे सुरू झाल्यापासून रयतेस अति त्रास होऊं लागला. एखादा गोळा रस्त्यांत पडला म्हणजे तो फुटून पांच पंचवीस मनुष्यें जखमी होत व दहा पांच मरत. याशिवाय घरावर गोळा पडला म्हणजे लहान घरें धक्क्यानें कोसळून जात, कांहीं घरें जळून जात असत. मग त्यांत जिवाचा व वित्ताचा अनर्थ होण्याचा संभव असे. परंतु वाईसाहेवांनीं शहरांत बंब तयार करून ठेविले होते. आग लागली कीं, ती बंबांनीं विझवीत असत. शहरचे व्यापार अगदीं बंद झाले. मनुष्यास इकडे तिकडे फिरावयाची धास्ती वाटूं लागली. याप्रमाणें शहरांतील लोकांसच काय पण किल्ल्यावरहि अति त्रास होऊं लागला. किल्ल्यांत वाड्याचे गच्चीवर गोळा पडला म्हणजे तेथें तो फुटून मोठा आवाज होऊन त्याच्या सात आठ कपच्या उडत व त्या जवळच्या माणसांस जखमी करीत. नंतर तोच गोळा गच्ची फोडून खालचे मजल्यावर पुन्हा आवाज होऊन फुटे व पुन्हा कपच्या उडोन शेजारचे माणसांचा प्राणघात करी. नंतर पुन्हा तक्तपोशी फोडून त्याचे खालचे मजल्यावर फुटून नासाडी करीत असे. शेवटीं मोठा आवाज होऊन आंतून खिळे, कातरी वगैरे छरे लाल झालेले उडून फार मनुष्यें जाया होत. अशा प्रकारचे किल्ले तोडण्याचे गोळे इंग्रज सरकारनें बहुत खराब केले. ते गोळे फार खर्च करून तयार केलेले असत. एक दोन गोळे फुटल्यावांचून तसेच पडले होते, ते आम्हीं वजन करून पाहिले ते साठ पांसष्ट पक्के शेर भरले. याप्रमाणें इंग्रजाजवळ कसबी गोलंदाज व उत्तम दारूगोळ्याचें सामान असल्यामुळें किल्ल्यांत व शहरांत फार नासाडी झाली. परंतु वाईसाहेवांनीं गरीबगुरिवांचें दुःख होईल तितकें कमी करण्यास मागें पुढें पाहिलें नाहीं. दक्षिणी ब्राह्मणाकरितां गणपतीचे देवालयांत अन्नछत्र सुरू केलें. इतर लोकांकरितां

सदावर्त चालूं केलें. यांखेरीज गरीब लोकांस चणे, फुटाणे, चुरमुरे वाटूं लागले.

इकडे बाईसाहेबांनींहि आपलेकडून शिकस्त केली. इंग्रजाकडील लोक पुष्कळ मारले. चवथे दिवशीं दोनप्रहरीं किल्ल्यावरच्या दक्षिण बुरुजाची तोफ इंग्रजानें बंद केली. त्या तोफेवर माणूस ठरेनासें झालें. तेव्हां लोक फार हवालदील झाले. तेव्हां पश्चिमेकडील बुरुजावरचे गोलंदाजानें मोरच्यांतून तोफ काढून दक्षिणेकडे मोरचा बांधून व दुर्बिणीनें उत्तम संधान राखून तोफेस बत्ती दिली आणि तिसरे आवाजासरसा इंग्रजाकडील उत्तम गोलंदाज ठार केला व दक्षिणची तोफ चालू करून इंग्रजांची तोफ बंद केली. तेव्हां बाईसाहेबांनीं संतुष्ट होऊन गोलंदाजास ऐंशी तोळ्यांचा चांदीचा तोडा बक्षीस दिला.

रात्रीचे प्रहरीं शहरावर व किल्ल्यावर गोळे पडत त्याची फार भयंकर शोभा दिसे. पन्नास साठ शेर वजनाचा जरी गोळा असे तरी गरनाळी तोफेंतून उडाल्यावर लहान चेंडूसारखा व खदिरांगारासारखा लाल दिसे. दिवसास सूर्याचे तेजामुळें गोळे साफ दिसत नसत, परंतु रात्रीच्या काळोखांत ते लालभडक गोळे चेंडूफळीसारखे इकडून तिकडे उडतांना दिसत. मनुष्यांस असें वाटावें कीं, हा गोळा आतां मजवर येऊन पडेल, परंतु तो गोळा सात आठशें कदम पुढें जाऊन पडत असे. याप्रमाणें रात्रंदिवस युद्ध होऊन शहर जर्जर झालें. पांचवे सहावे दिवशीं याप्रमाणेंच युद्ध झालें. प्रहर दीड प्रहरपर्यंत बाईसाहेबांचा जय होऊन इंग्रजाचा फार नाश होत असे, व त्यांच्या तोफाहि कांहीं वेळ बंद पडत. नंतर कांहीं वेळानें इंग्रजांचा जय व्हावा. पलटणी लोक हवालदिल होऊन बाईसाहेबांच्या तोफा बंद पडाव्या. सातवे दिवशीं सूर्यास्तापासून पश्चिम बाजूची तोफ बंद झाली. तेथें मनुष्य ठरेना व शत्रूच्या तोफेनें मोरचाहि पाडून टाकला. नंतर रात्रीं हुशार गवंडी लोक आणून युक्तीनें घोंगडी पांघरून हळूहळू बुरुजावर चढविले, व विटा वगैरे सामान खालपासून मनुष्यांची माळ लावून त्यांस जमिनीवर निजवून त्यांकडून पोंचविलें. नंतर त्या गवंड्यांनीं निजून निजून मोरचा बांधला. याप्रमाणें इंग्रजांस कळूं न देतां मोरचा बांधल्यावर तोफ मोरच्यावर ठेवून चालू केली. तेव्हां इंग्रजांकडील लोक गाफील होते. त्यांचें फार नुकसान होऊन त्यांच्या दोन तोफा प्रहरपर्यंत बंद झाल्या.

उजाडते आठवे दिवशीं इंग्रज फौजेनें शंकर किल्ल्यावर मारा सुरू केला. इंग्रज सरकारपाशीं किल्ले दुर्ग याचे वेढ्यांत उपयोगी पडणाऱ्या अति मौल्यवान दुर्भिणी होत्या त्या इतक्या चांगल्या असत कीं, अति दूरचा देखावा अगदीं जवळ व स्पष्ट दिसत असे, व कोणचें मनुष्य कोठें काय काम करीत आहे हें दिसे. दुर्भिणी लावून किल्ल्यांत पाण्याची जागा होती ती रोखून त्याजवर तोफेचा भडिमार चालू केला. त्यांत प्रथम रांगडे ब्राह्मण सहासात कावडी घेऊन पाण्यास गेले होते त्यांपैकीं चार असामींस देहान्त प्रायश्चित्त मिळून बाकीचे कावडी टाकून पळून गेले. याप्रमाणें प्रहरभर पाणी न मिळाल्यामुळें स्नानादि कर्में अडकून राहिलीं. किल्ल्यांत पाण्याचा मोठा हाकांटा झाला. तेव्हां पश्चिम व दक्षिण बुरुजां-वरचे गोलंदाजांनीं ज्या तोफा शंकर किल्ल्यावर चालू होत्या त्यांजवर एकदम भडिमार करून त्या बंद पाडल्या. मग हौदावर पाणी भरण्याची मोकळीक होऊन स्नान-भोजनाची व्यवस्था लागली. नंतर जेवण होऊन कांहीं वेळ गेला नाहीं तोंच एकदम मोठा आवाज होऊन जिकडे तिकडे धूर व धूळ उसळली. त्यामुळें दशदिशा गुंग होऊन कोणास दिसेनासें झालें. सर्वांचे पोटांत धस्स होऊन काय झालें याची धास्ती पडून गेली. मग दोन घटकेनें धूर नाहींसा होऊन चौकशी करूं लागलों तों वाड्यासमोरचे मैदानांत दारूचे कारखान्यांत तीस असामी पुरुष व आठ बायका मरण पावलेल्या दृष्टीस पडल्या, व चाळीस पंचेचाळीस माणसें भाजून जखमी पडलीं होतीं. चिंचेचे मैदानांत दारूचा कारखाना सुरू होता. दोन मण दारू झाली म्हणजे बुरुजाखालीं तळघरांत नेऊन ठेवावी. त्या कारखान्यांत गोळा पडतांच तेथें दारू होती ती पेटली व तसेच दारूचे बारीक बारीक कण सर्व धूळभर पसरले होते ते पेटून त्याजबरोबर धूळ उधळली. अष्टम दिवशीं फार कहर झाला व युद्ध फार तुंबळ झालें. वीर मोठमोठ्यानें आरोळ्या देत होते. बंदुका कडामिनीचे व तोफांचे आवाज अगणित होत होते. शिंगें, कर्णे, बिगुल जिकडे तिकडे वाजत होते. धुळीनें, धुरानें व नाना प्रकारच्या ध्वनीनें सर्व दिशा भरून राहिल्या होत्या. इंग्रज फौजेनें फार शिकस्त केली. रात्रौ आकाशांतून तोफेचे लाल गोळ्यांची शहरावर एकसारखी वृष्टि चालली होती. शहरांत हजारों माणसें मरण पावलीं. बाकींचीं जिवाचे आशेनें कोठें वळचणीला, कोठें घराच्या पिछाडीस दडून राहिलीं तटावरचे शिपाई गोलंदाज पुष्कळ मेले व त्यांचे जाग्यावर दुसरे उभे केले. बाईसाहेबांस फार मेहनत पडत

होती. चोहींकडे नजर ठेवून जी जी उणीव पडेल ती स्वतः पुरविण्याचा हुकूम करीत होत्या. परंतु त्यांस अति दुःख होऊन घोर काळजीहि लागली होती. पेशव्यांकडून मदत कां येत नाहीं या विचारांत गुंग पडल्या. शेवटीं लालूभाऊ ढेंकरे व भय्या उपासने यांचे विचारें रावसाहेब पेशवे यांजकडून मदत लवकर यावी म्हणून शंभर ब्राह्मण गणपतीचे मंदिरांत अनुष्ठानास बसविले. नंतर बाईसाहेबांस कांहीं आराम वाटून सर्व दिवसभर थकल्या होत्या म्हणून दिवाणखान्यांत किंचित् अंग टाकिलें तों एक भयंकर स्वप्न दृष्टीस पडलें तें असें: कोणी सुवासिनी मध्यम वयाची, गौरवर्णाची, नाक सरळ, कपाळ मोठें, डोळे काळे व विशाळ अशी रूपवान् स्त्री अंगावर सर्व मोत्याचे दागिने घालून तांबडें मोठें कांठाचे लुगडें नेसून अंगांत पांढरी रेशिमकाठी चोळी घालून पदर बांधून ओच्याची कांच मारुन किल्ल्याचे बुरुजावर उभी आहे व मोठ्या कठोर मुद्रेनें तोफेचे लाल गोळे झेलीत आहे. व गोळे झेलतां झेलतां काळे ठिक्कर पडलेले हात, बाईसाहेबांस दाखवून म्हणत आहे कीं, मीच म्हणून हे गोळे झेलीत आहे. असें स्वप्न पाहून बाईसाहेब दचकून जाग्या झाल्या व आश्रित मंडळीस स्वप्न सांगितलें, तें ऐकून सर्वांस आश्चर्य वाटलें.

इकडे तात्या टोपी काल्पीहून पंधरा हजार फौज घेऊन निघाला तो मजल दरमजल डबल कूच करून झांशीजवळ येऊन पोंचला. व रातोरात मोरचे बांधून तोफेस बत्ती दिली. इकडून कप्तान साहेबहि इंग्रजी फौज घेऊन त्याजपाशीं लढावयास वेढ्याचा बंदोबस्त करून आला. तो दिवस दहावा होता. झांशींतील सर्व लोक त्या लढाईवर झांशीचा परिणाम अवलंबून असल्यामुळें मोठ्या भीतीनें लढाईचा परिणाम काय होतो हें पाहण्यास तटावर जमले होते. दोन्ही पक्षांचे शिपाई जिवापाड मेहनत करीत होते. कोणास भान राहिलें नव्हतें. समोरासमोर लढाईचे प्रसंगांत पायदळाबरोबर पायदळ, स्वाराबरोबर स्वार लढत होते व सर्व रणांत बिगूल, शिंगें, बंदुका, तोफा इत्यादिकांचा आवाज धुंद भरून राहिला होता. झाशीवाली बाई व तिचे सरदार तटावरून दुर्बिणी लावून पहात होते. परंतु झांशीच्या दुर्दैवानें म्हणा अगर तात्या टोपीच्या कमी कसबानें म्हणा किंवा हिंदु शिपाई लोक नादान व नाशूर असल्यामुळें म्हणा, तात्या टोपीची फौज फुटूं लागून शिपाई पळ काढूं लागले. इंग्रज फौजेनें तोफा मोरच्यांतून काढून

पाठलाग करण्यास आरंभ केला. रिसाल्याच्या स्वारांनीं एकदम हल्ला केला. तात्या टोपी स्वतां चोवीस पन्ही छत्तीस पन्ही तोफा टाकून रण सोडून पळून गेला. इंग्रजी फौजेचा जयजयकार होऊन त्यांची हिंमत दुप्पट झाली व लढाईचें सामान मिळालें. पेशव्यांचे फौजेचा मोड होऊन तिनें पळ, अपयश व दुःख यांचा स्वीकार केला. व झांशीवाल्याच्या फौजेंत हाहाःकार होऊन सर्वांचीं मनें होरपळून जाऊन दुःख, भीति, निराशा यांचा एकामागून एक अंमल बसला.

परंतु निराशेची शक्ति कांहीं विलक्षण आहे. आतां बहुतकरून झांशी इंग्रजाचे हातीं पडेल व ते आमची दया करणार नाहींत, ही कल्पना मनांत येऊन शिपाई लोकांस उलट अधिक वीरश्री चढली. बाईसाहेबांनीं सरदार लोक जमवून ठरविलें कीं, आजपर्यंत झांशी लढली ती पेशव्यांचे बलावर लढली नाहीं व आतां पुढेंहि तिला त्यांच्या मदतीची जरूर नाहीं. असा निश्चय करून सरदार लोक व बाईसाहेब स्वतां तटाच्या बंदोबस्ताकरितां पुन्हां तटावर मेहनत करूं लागल्या. त्या रात्रीं इंग्रज गोलंदाजांनीं शिकस्त केली. शहरावर व किल्ल्यावर तांबडे लाल गोळ्यांचा वर्षाऋतूंतील पर्जन्याप्रमाणें वर्षाव केला. किल्ल्यांतील सर्व लोक रात्रभर जागरण करीत बसले होते.

उजाडता दिवस अकरावा युद्धास येऊन पोंचला. बाईसाहेबांनीं स्वतः तरवार बांधून गोलंदाज लोकांस बक्षिसें देऊन ज्या तोफा बंद झाल्या होत्या त्या सर्व सुरू केल्या. इंग्रज फौजेनें सर्व गरनाळी तोफा किल्ल्यावर सुरू केल्या तेव्हां वाड्यांत आकान्त होऊन गेला. इतक्यांत एक मोठा व सुस्वर ध्वनि ऐकूं आला. पाहतात तों दुसरे मजल्यावर गणपतीचें मखर भाद्रपद मासीं व नवरात्रांत उत्साहांत कथा कीर्तन वगैरे करण्याकरितां पूर्वापार केलेलें होतें तेथें सर्व ऐनें महालच होता. सर्व जागयास आरसे लखनौचे लाविले होते व छतासहि आरसे होते त कांचेचीं झाडें व हांड्या ग्लास बालछतें लावून जागा भरली होती. त्या जागयावर तीन मजले होते तेथें गरनाळी तोफेचा गोळा पडून आवाज फार मोठा झाला आणि तोच गोळा खालील मजल्यावर पडतांच मोठा आवाज होऊन त्यांतील खिळे, छरे वगैरे उडाले तेणेंकरून तेथें चार माणसें मरण पावलीं व नऊ मनुष्यें जखमी झालीं आणि आवाजाबरोबर खालील कांचांचा सुस्वर

आवाजानें खळखळ चूर होऊन राशी पडल्या; हांडी, ग्लास किंवा ऐना एकहि राहिला नाहीं.

त्या दिवशीं शेंकडों तोफेचे गोळे वाड्यावर पडत होते, परंतु वाड्यास इजा झाली नाहीं. गोळा गच्चीवर हापटून तो गोळा तीन छतें तोडून खालीं येऊन पडून शान्त होत असे, परंतु जुना बादशाई चुना कमाविलेला असल्यानें गोळ्यापुरतें मात्र भोंक पडून गोळा खालील मजल्यावर पडे; परंतु भोंकापेक्षां जास्त काम तडावलें नाहीं व फुटलेंहि नाहीं, व मजल्यास गोळ्यामुळें चाळणीस जशीं भोंकें असतात अशीं भोंकें दरोबस्त ठिकठिकाणीं पडलीं. वाड्याचे दरएक दालनास गोळे अति पडूं लागले तेव्हां सर्व मनुष्यें घाबरून मध्येंच एक खोली होती त्या खोलीस निर्भय मानून त्या खोलींत शिरलीं. कारण कीं त्या खोलीवर पांच मजले होते. त्या खोलींत मनुष्यें जमतां जमतां चौसष्ट माणसें जमलीं आणि खोलींत गर्दी झाली. त्यांत आम्हीहि शिरलों होतों. दासी बायकाहि त्यांतच होत्या. सर्व माणसें उभींच होतीं. उन्हाळ्याचे उष्णतेमुळें व गर्दीमुळें व जीवाचे भीतीमुळें अंगास घाम फार सुटला होता. श्वास सोडण्यासदेखील जागा नव्हती. आम्ही अगदीं घाबरून गेलों होतों. त्या खोलींत एकंदर चार घटका होतों. मृत्यु भयाहून दुसरें भय नाहीं. सर्वांचे जीव कासावीस झाले. इतक्यांत बाईसाहेबांकडील गोलंदाजांनीं गर्दी उडवून इंग्रजांच्या तोफेवर गोलंदाज वगैरे मनुष्यें ठरूं दिलीं नाहींत. तेणें-करून वाड्यावर गोळे पडण्याचें नाहींसें झालें. मग त्या खोलींतून सर्व लोक बाहेर निघाले.

याप्रमाणें प्रहर दोन प्रहर अति संकट येऊन पडे. त्याच दिवशीं रात्रीं एकान्तांत अंथरुणावर पडलों असतां माझे मनांत अनेक विचार येऊं लागले. मी येथून जिवंत सुटतों कसा व मला घरचीं माणसें भेटतात कशीं ? इतक्यांत हरिपंताची व त्यांच्या शपथेची आठवण झाली. असे अनेक विचार येऊं लागले तेव्हां या संकटांतून वैजनाथेश्वराशिवाय दुसरा कोणीहि पार पाडणारा समर्थ नाहीं असा पक्का भरंवसा ठेवून त्याचा मनोमय धांवा करीत स्वस्थ पडलों.

याप्रमाणें अकरा दिवस लढाई एकसारखी चालली होती. तरी बाईसाहेबांचे मेहनतींत व हिंमतींत यत्किंचितहि फरक पडला नाहीं. शाबास त्या बायकोची.

त्या रात्रीं नेहमींप्रमाणें बाईसाहेब स्वतां शहरचे तटावर व किल्ल्यावर फिरून बंदोबस्त ठेवीत होत्या. इतक्यांत बातमीदारानें असें कळविलें कीं, इंग्रज सरकारनें झांशीवर दोन अडीच लक्ष रुपयांची दारू खर्च केली. तरी परिणामीं जय येईल असें दिसत नाहीं. व दारुगोळाहि संपला आहे. सबब उदईक प्रहर दिवस लढाई करून लष्कर उठून जाईल. ही बातमी ऐकून बाईसाहेबांस किती आनंद झाला असेल याची कल्पना एक त्यांचे मनास ठाऊक. त्यांचे तोंडावर जास्त टवटवी येऊन त्यांची शक्ति व हिंमत दुणावली. त्या रात्रीं दोहोंच्या सुमारास त्यांस गाढ झोंप आली. पण बाईसाहेबांचें दैवघटित चांगलें नव्हतें. पहांटेच्या सुमारास एकाएकीं शहरच्या दक्षिण बाजूच्या तटावरील तोफ बंद पडली होती. तेथून एक बातमीदार येऊन त्यानें बाईसाहेबांस जागें केलें. त्याची हकीकत ऐकून सर्वांच्या पोटांत धस्स झालें; व आमचे प्राण आंतले आंत विरघळून गेले. हरहर ! अठ्यायशीं प्रहर मोठ्या शूरत्वानें लढून सरशेवटीं शहर इंग्रजानें सर केलें. आम्हीं सहावे मजल्यावर जाऊन पाहूं लागलों; त्या वेळेस सकाळचें अंधुक अंधुक दिसूं लागलें होतें. हजारों मजूर लोक डोक्यावर गवताचे भारे घेऊन शहरच्या तटाकडे येत आहेत, व त्या भाऱ्यांच्या आश्रयानें मागें बाजूनें गोरे शिपाई चालत आहेत, असें दृष्टीस पडलें. पाहतां पाहतां गवताचे भारेवाले तटापर्यंत येऊन पोंचलें. भारेवाल्यांनीं तटापाशीं येऊन भराभर डोकीवरचे भारे एकावर एक टाकून तटाशीं जिन्यासारखी वाट रचली. त्याजवरून झराझर गोरे शिपाई तटावर चढले. तटावर बाईसाहेबांनीं जे शिपाई ठेविले होते त्यांपैकीं कांहींनीं पळ काढला, कांहीं शूर होते त्यांनीं गोरे शिपायांस हरकत केली; परंतु ते थोडे असल्यामुळें कापले गेले. आणि दहा बारा मिनिटांच्या आंत हजारों गोरे लोक शहरच्या दक्षिण तटावर दिसूं लागले.

प्रथम बाईसाहेबांस हकीकत समजली त्या वेळेस त्यांस सहस्र विंचू चावल्याप्रमाणें एकदम दुःख झालें. त्यांच्या तोंडावरचें पाणी पळालें. अक्कल गुंग झाली, आतां झोंप घेण्यापूर्वीं बातमी ऐकली काय, आणि ह्या बातमीचा अर्थ काय, अशा भीति, दुःख व आश्चर्य यांच्या घोटाळ्यांत पडून पुढें काय करावें याचा विचार न सुचतां शून्य दृष्टीनें बाहेर येऊन दक्षिण बाजूकडे पाहतात तों हजारों गोरे शिपाई तटावर दृष्टीस पडले. बाईसाहेब आम्हा भटाभिक्षुकांसारख्या नादान

नव्हत्या. अक्कल गुंग व भीति यांचा क्षणभर पगडा पडला होता तो दूर होऊन बाईसाहेबांस शूरत्वाचा आवेश चढला व विलायती–म्हणजे मुसलमान अरबां-सारखे–बहुत दिवसांचे नोकर सुमारें दीड हजार तरवारबंद होते ते बरोबर घेऊन स्वतः तावडतोब हत्यारबंद होऊन किल्ल्याचे खालीं उतरल्या व मोठ्या दरवाजांतून बाहेर पडून दक्षिण बाजूकडे वळल्या. शहरचे दक्षिण तटावरून आंत उतरून हजारों गोरे आले. त्यांच्याहि तरवारी म्यानांतून बाहेर पडल्या होत्या. बाईसाहेब सर्वांचे मागें चालत असतां आवेशानें हातांत नागवी तरवार घेऊन सर्वांचे मध्य-भागीं गेल्या. गोरे लोकांची व विलायती लोकांची गांठ पडतांच एकदम तरवारीचा चकचकाट होऊन लोक एकमेकांत मिसळून गेले. त्या वेळेचे युद्धास भारती युद्धा-चीच उपमा साजेल. उभयतांचीं पांच पन्नास अंक मोजण्यासहि उशीर लागेल इतके अवकाशांत तरवार चालली व शेंकडों गोरा कापून काढला गेला. बाकी राहिले ते शहराकडे पळून जाऊन झाडांच्या व घरांच्या आडून बंदुकीचे बार काढूं लागले. मागूनहि दुसरे गोरे लोक येतच होते तेहि तरवार न चालवितां दुरून बंदुकीच्या गोळया घालूं लागले. त्या वेळेस बाईसाहेबांचे पदरचा पाऊणशें वर्षांचा जुना सरदार होता तो पुढें होऊन बाईसाहेबांचे हात धरून बोलूं लागला, "महाराज, या समयीं आपण पुढें जाऊन बंदुकीचे गोळीनें मरणें आणि रांड मरणें बरोबर आहे. गोरे लोक इमारतींचे आड होऊन गोळी घालीत आहेत. शिवाय शेंकडों गोरा शहरांत शिरला असेल. शहराचे सर्व दरवाजे खुले झाले असतील; तरी येथें लढण्यांत कांहीं अर्थ नाहीं. त्यापेक्षां आपण किल्ल्यांत जाऊन दरवाजा बंद करून पुढें ईश्वर युक्ति सुचवील तसें करूं, ही वेळ परतण्याची आहे." असें म्हणून त्यानें बाईसाहेबांस धरून परतविली. व आरोळी देऊन विलयती लोकांसह मागें फिरविलें. बाईसाहेब विलायती लोकासह किल्ल्यांत येऊन दरवाजा बंद करून अडसर ओढून स्वस्थ राहिल्या.

इकडे गोरे लोक चोहों दरवाजांतून आंत शिरले ते विजन करीत चालले. जितका ५ वर्षांवर व ८० वर्षांचे आंत पुरुष दिसत चालला तितका गोळीनें अगर तरवारीनें मारीत चालले व एकीकडून शहरास आग लावून दिली. ती प्रथम हलवाईपुऱ्यास लावली. त्या वेळेस शहरांत दुःखाचा जो कल्लोळ उसळून गेला त्यास पारावार नाहीं मेंढरांच्या कळपांत लांडग्यांनीं उडी घालतांच जशी

त्या प्राण्यांची स्थिति होते त्याप्रमाणें लोक भयानें आतुर होऊन जिकडे तिकडे सैरावैरा पळूं लागले. कांहीं पळतां पळतां मुडदे होऊन खालीं गळूं लागले. कोणी या गल्लींत शीर, कोणी घरांत अडचणींत लप, कोणी दाढी मिशा उतरून स्त्रीचा वेष धारण करून बस, कोणी शेतखान्यांत लप, याप्रमाणें जशी ज्यांस जीव बचाविण्याची युक्ती सुचली तसें तो करूं लागला. गोरे लोक शहरांत शिरून विजन करूं लागले असें समजतांच शहराचे मध्यभागीं भिज्याचा बाग होता त्यांत हजारों लोक चोहींकडून शिरले. तेथें गोरे येतांच सर्व लोक दीन होऊन जमिनीवर साष्टांग नमस्कार घालून करुण स्वरानें बोलूं लागले कीं, साहेब, आम्ही निरपराधी रयत आहों. आम्ही लढवय्ये नाहीं. आम्हांस दयाळू होऊन प्राणदान द्यावें, आम्हांस मारूं नये. अशी त्यांची करुण हांक ऐकतांच त्या सर्वांचे नशिबानें गोऱ्यांवरील मुख्य ऑफिसरास दया आली. त्यानें त्या प्रणतांस अभयवचन देऊन व लागलींच बागेभोंवतीं पहारा ठेवून दरवाजास कुलुपें मारिलीं व हुकूम केला कीं, बाहेरील लोक आंत येऊं देऊं नये, व आंतले बाहेर सोडूं नयेत. याप्रमाणें तीं माणसें बायका पोरें मिळून वीस हजार त्या बागेंत वांचलीं गेलीं.

दुसरीकडे गोरे लोक घरांत शिरून मनुष्यांस ठार मारून सोनें व रुपें यांची लूट करूं लागले. घरांत शिरल्याबरोबर पुरुष सांपडला व त्यानें तावडतोब आपला अर्थ गोरे लोकांच्या स्वाधीन केला तर तो जिवानिशीं सुटे. अर्थ लवकर निघाला नाहीं तर त्याचे हाल हाल करीत. कित्येक लोकांचे गळ्यांस त्यांचे धोतराचा गळफांस करून रस्त्यावर नेऊन मारझोड करीत. त्यांचे घरांत खणून पहात, भिंती फोडीत व अर्थ प्राप्त झाला म्हणजे त्यास गोळी घालून मारून टाकीत. जो पुरुष अर्थ देऊन सुटला तोच पुन्हा दुसरे गोरे लोकांचे हातीं सांपडला म्हणजे गोळीनें मारला जावा. गोरे लोकांनीं स्त्रियांस बुद्धिपुरःसर मारलें नाहीं. परंतु कांहीं कुलीन तरुण स्त्रिया गोरे लोक पुढील दारीं आले म्हणजे ते आपल्यास बाटवितील या भीतीनें मागील दारीं विहिरींत जीव देत असत. कोठें असेंहि झालें कीं, गोरा घरांत शिरून नवऱ्यास गोळी घालतो आहे तों त्याचे बायकोनें येऊन त्याच्या अंगास वेष्टन करावें. मग गोळी सुटून त्या पतिव्रता स्त्रियेस लागून तिच्या देहाचें जन्मजन्मान्तरीचें सार्थक होत असे. गोळी बायकोस लागली असें पाहून गोऱ्यानें

पुन्हां गोळी घालून नवऱ्यास ठार मारावें. याप्रमाणें कित्येक दृढव्रताच्या स्त्रिया मरण पावल्या, परंतु मुद्दाम स्त्रियांचा प्राणनाश किंवा विटंबना गोरे लोकांनीं केली नाहीं. इतका चांगुलपणा त्या पशुतुल्य सोजीर लोकांस कोठून येणार हें खरें, परंतु इंग्रज सरकारनें त्यांस दाबांत ठेवण्यासाठीं प्रत्येक सोल्जर-बरोबर दोन दोन काळे शिपाई दिले होते. त्यांस कप्तानसाहेबांचा असा हुकूम होता कीं, कोणी गोरा स्त्रियांचा अपमान किंवा घात करील तर त्यास तेथेंच गोळी घालून ठार मारून टाकावा. या इंग्रज सरकारच्या दूरदर्शी व न्यायी तजविजीमुळें वहुतकरून स्त्रियांस इजा झाली नाहीं. घरांत शिरल्यावर स्त्री दृष्टीस पडल्यास गोरे लोकांनीं तिजपासून दूर उभें राहून तिचे अंगावरील सर्व वस्तवानी उतरून घ्यावी व तिच्यापासून सामोपचारानें जी माहिती निघेल त्या-प्रमाणें घर शोधून सांपडेल तें वित्त घेऊन जावें. याप्रमाणें सायंकाळपर्यंत बिजन व लूट करून ते यमरूपी गोरे शिपाई रात्रीबद्दल शहरचा बंदोबस्त करून आपले गोटांत परत गेले.

इकडे बाईसाहेब किल्ल्यांत आल्यावर अति शोकविव्हल होऊन निश्चलपणें दिवाणखान्यांत बसल्या. त्या तेजस्वी स्त्रियेची त्या वेळची स्थिति पाहून व तिच्या अमानुष पराक्रमाचा हा अत्यंत दुःखकारक परिणाम मनांत आणून आश्रित मंडळींस अति दुःख झालें, व मंडळी जिकडे तिकडे चिंताक्रान्त होऊन आतां पुढें बाईसाहेबांनीं काय करावें याजविषयीं आपसांत हळुहळू विचार करूं लागली. परंतु बाईसाहेबांजवळ कोणी जाईना. एक प्रहरानंतर बाईसाहेब शहरची काय हवालदील आहे हें पाहण्याकरितां गच्चीवर आल्या. तेव्हां त्या दीन शहराचें जें दुःख त्यांचे दृष्टीस पडलें त्यानें त्यांच्या अंतःकरणास कळवळा येऊन खळखळा डोळ्यांत पाणी आलें. हलवाईपुरा मोठा संपन्न असा शहराचा भाग होता. तो पेटून मोठा आक्रान्त झाला होता. भर उन्हाळ्याचे दिवसांत मध्यान्हसमय असल्यामुळें त्या गगनापर्यंत जाणाऱ्या ज्वालांची उष्णतेची आग अति दुःसह झाली होती. जिकडे तिकडे रडारड, ओरडाओरड, पळापळ चालली होती. बंदुकांचे शतावधि आवाज एकामागून एक पटापट होत होते व तितके निरपराधी लोकांचे जीव पटापट जात होते. हजारों श्वापदें मरणसमयींचा दुःखकारक शब्द काढून ओरडत होतीं. कांहीं सुटलीं होतीं तीं अन्नपाण्याकरितां सैरावैरा पळत होतीं. क

कुत्रे, बैल, घोडे, खेंचरें, उंट, गाढवें, यांच्या करुण स्वरांचा एकच कल्लोळ होऊन गेला होता. त्या भयंकर स्थितीची आठवण झाली म्हणजे अंगावर कांटा उभा राहतो. आपल्याकरितां या निरपराध प्राण्यांचे असे भयंकर हाल होत आहेत असें वाटून बाईसाहेबांस 'दे माय धरणी ठाय' झालें. स्त्रियांचें हृदय फार कोमल असतें. त्यांस दुसऱ्यांची दया फार लवकर येते. पुरुषासारखीं त्यांचीं मनें कठोर नसतात. बाईसाहेबांच्या हृदयांत दुःख व करुणा इतकी ओतप्रोत भरली होती कीं, त्यांस आपण महापातकी आहों असें वाटूं लागलें, व त्यांचे मनाचा निश्चय कायम झाला. पदरचे सर्व लोकांस बोलावून आणून असें कळविलें कीं, मी वाड्यांत दारूगोळा घालून पेटवून मरून जाणार! ज्यास येथें मरणें असेल त्यानें रहावें. बाकीच्यांनीं रात्र होतांच किल्ला सोडून शहरांत जाऊन जीव बचावण्याची सोय पहावी. ते वेळेस ज्या वृद्ध सरदारानें बाईसाहेबांस मागें फिरविलें होतें त्यानें पुढें येऊन बाईसाहेबांचा हात धरून त्यांस दिवाणखान्यांत नेऊन बसविलें व बोलूं लागला कीं, "महाराज, आपण किंचित् शान्त व्हा. ईश्वरानेंच हें दुःख या शहरावर आणलें आहे, त्यास आपला कांहीं इलाज नाहीं. कारण सर्व गोष्टी पूर्वसंचित कर्माप्रमाणें होतात. आत्महत्या करणें हें मोठें पातक आहे. पूर्वपातकाची या जन्मीं आपण फळें भोगतों, त्यांत आणखी महान् पातकांची भर या जन्मांत घालूं नये. जीं दुःखें येतील तीं आपण निमूटपणें सोसलीं पाहिजेत, म्हणजे पुढें आपल्यास त्यांचा उपसर्ग लागणार नाहीं. शिवाय आपण शूर आहांत, आपण आत्महत्येचा विचार मनांत बिलकुल आणूं नये. रात्रीं तयारी करून शहराबाहेर निघून जाऊन शत्रूशीं प्रसंग पडल्यास युद्ध करून शत्रूचा घेर फोडून पेशव्यास जाऊन मिळूं. मध्यंतरीं मृत्यु आला तर फारच चांगलें होईल. येथें आत्महत्या करून पातकाचा संचय करण्यापेक्षां धारातीर्थीं स्नान करून स्वर्ग जिंकणें हें फारच चांगलें आहे. त्यापेक्षां आपण आतां किमपिहि दुःख करूं नये, स्वस्थपणें स्नान भोजन करून रात्रीं शत्रूचा परिघ फोडून जाण्याचे तयारीस लागावें." हे शब्द ऐकतांच बाईसाहेबांस किंचित् समाधान वाटून त्यांस पुनः शूरत्वाचा आवेश चढला, व त्यांनीं दोन वेळ पित्याप्रमाणें सुमार्ग दाखविल्याबद्दल त्या वृद्धाचें पादवंदन केलें. नंतर सर्वांनीं त्या वृद्धाचे बोलण्यास मान देऊन समाधान वृत्तीनें स्नानभोजनादि नित्य कर्मे आटोपलीं. दिवे लागण्याच्या सुमारास आम्हासारखी भिक्षुक मंडळी होती त्यांस योग्य बक्षिसें देऊन मोठ्या प्रेमानें बाईसाहेबांनीं निरोप दिला, व

शहरांत जाऊन आपला जीव जसा रस्ता सुचेल तसा वांचवावा म्हणून किल्ल्याचा दरवाजा उघडून बाहेर काढून दिलें. नंतर जे लढवय्ये लोक नव्हते त्यांस व दास, दासी वगैरे सर्व नोकरांस तमाम जाण्याची परवानगी दिली. याप्रमाणें सर्व लोक किल्ल्यांतून निघून शहरांत आले. त्यांत आम्हीहि मांडवगणे यांजकडे आलों.

इकडे बाईसाहेब अवशींचे बारा घटकांचे सुमारास सर्व तयारी करून किल्ल्याचे बाहेर निघाल्या. मोरोपंत तांबे वगैरे जी आप्त मंडळी होती ती सर्व हत्यारबंद होऊन घोड्यावर बसून तयार झाली, व प्रत्येकाजवळ कमरेशीं बांधण्यास मोहोरा, पुतळ्या दिल्या. संस्थानांत जो अर्थ होता तो सर्व हत्तीवर खलित्यांत भरून घेतला व तो हत्ती मध्यभागीं घेतला. बरोबर सुमारें दोनशें निवडक स्वारांनिशीं जुने जिवास जीव देणारे सरदार होते तेहि घेतले. शिवाय सकाळीं इंग्रजांबरोबर जी चकमक झाली त्यांतून सुमारें १२०० विलायती लोक जिवंत राहिले होते ते घेतले व स्वतः बाईसाहेब अडीच हजार रुपये किंमतीचा पांढरा खंदा राजरत्नासारखा घोडा होता त्याजवर आरूढ झाल्या. पायजमा, स्टॉकीन, बूट वगैरे सर्व पुरुषवेष धारण केला. अंगांत तारेचें चिलखत घातलें. कंवरेस जंब्या वगैरे हत्यारें बांधून खाकेंत तरवारहि घेतली. व जवळ कांहींएक अर्थ घेतला नाहीं. फक्त एक रुप्याचा जांब म्हणजे पेला पदराशीं बांधून घेतला. नंतर रेशिमकांठी धोतरानें पाठीशीं बारा वर्षांचे वयाचा दत्तक मुलगा बांधून घेतला. शाबास त्या बायकोची!

याप्रमाणें सर्व तयारी झाल्यावर " जय शंकर " असा शब्द करून सर्व मंडळी किल्ल्याखालीं उतरली, व भर शहरांतून उत्तर दरवाजांतून बाहेर पडली. शेंकडों लोक बाईसाहेबांचा शेवटचा निरोप घेण्याकरितां रस्त्याचे बाजूनें उभे होते. त्या वेळेस त्या शूर लोकांचें अवसान पाहून मृत्यूचे दाढेंत हात घालणारे हे वीर पुरुष शत्रूची फळी फोडून जातील असा पाहणारास पूर्ण भरंवसा आला. बाईसाहेब शहराबाहेर पडल्या नाहींत तोंच शहरांत इंग्रजांचे लोक बंदोबस्ताकरितां होते त्यांनीं हांक ठोकून गलबला केला, व बाईसाहेबांच्या लोकांचे अंगावर धांवले. बाहेर शत्रूचे लोकहि सावध होऊन त्यांनींहि हल्ला केला, व तोफा सुरू केल्या. बाईसाहेबांजवळ बंदूक होती, तिचा उपयोग करीत करीत त्यांनीं

भरधांव घोडा फेंकला. त्या हल्ल्यांत पुष्कळ लोक मरण पावले व बाकीचे लोक राहिले ते अंधारांत वाट चुकून ज्यास जिकडे वाट फुटली तिकडे ते पळूं लागले. चोहोंकडे स्वार पळूं लागले. त्यांत बाईसाहेबांचा घोडा कोणता हें इंग्रज शिपायांस उमगलें नाहीं. त्यांचा घोडा जो निघाला तो एका क्षणांत इंग्रज फौजेचा गराडा फोडून त्यास मागें टाकून पुढें चालला. बरोबर एक घोड्यावर पुरी बसणारी दासी होती ती व एक बारगीर असे दोघांचे घोडे पळत होते. गोट फोडून बाहेर जे निघाले ते तिघे काल्पीच्या रस्त्यानें चालले. त्या समयीं त्यांचा पाठलाग एक कोसपर्यंत कांहीं इंग्रजांचे स्वार करीत होते; परंतु बाईसाहेबांचे घोडे फार चपळ असल्याकारणानें त्या स्वारांस ते थोडक्या अवकाशांत दिसेनासे झाले, व रात्रीचा विषय असल्यामुळें घोडे कोठें गेले याचा पत्ता लागेना, सबब ते निराश होऊन मागें फिरले. बाई-साहेब कोठें गेल्या व त्यांचे सरदार कोठें गेले किंवा ते आपल्याच गोटांत गर्क होऊन गेले आहेत, याचा पत्ता इंग्रज शिपायांस लागेना. याजमुळें पुष्कळ वेळपर्यंत तोफा व बंदुका सुरू ठेविल्या होत्या. उजाडल्यावर शोध करितां बाईसाहेबांचे पदरचे लोकांचीं अनेक प्रेतें सांपडलीं, पण मुख्य मंडळी कोठेंहि सांपडली नाहीं.

इकडे बाईसाहेब उजाडतां उजाडतां झांशीचे मुलुखाचे हद्दीवर एक गांव आहे तेथें जाऊन पोंचल्या. तेथें दत्तक पुत्रास पाठीचा सोडून महालकरी यांचे घरीं त्यास फराळास घातलें. व महालकरी यास झालेलें सर्व वृत्त निवेदन केलें. नंतर आपण कांहींएक आहार न करतां पुन्हां मुलास पाठीशीं बांधून काल्पीचा रस्ता धरला. एकसारखा सर्व दिवसभर भरधांव घोडा टाकीत रात्रीं बारा घटकांचे सुमारास बाई काल्पीस जाऊन पोंचली. अन्नपाण्याशिवाय चोवीस तास, पाठीशीं ओझें बांधून भरधांव घोड्यावर काढले; तेव्हां त्या बाईचे शक्तीची, हिमतीची व बार-गिरपणाची कमाल समजली पाहिजे! असो. गुदामांत पोंचल्यावर रात्र फार झाल्या-मुळें बाईसाहेबांनीं श्रीमंतांस कळविलें नाहीं. उजाडतांच शौचमुखमार्जनादि विधि आटोपून पेशव्यांस कसें भेटावें याचे विचारांत आहेत तों स्त्रीधर्माप्रमाणें अस्पर्श-दशा प्राप्त झाली. त्या वेळेस बाईसाहेबांचे अंतःकरणांत पूर्वीपेक्षां दसपट दुःख झालें तें काय वर्णन करावें! स्त्रियांनीं अति शौर्य केलें तरी काय उपयोग!

प्रसंगांत घात करणारा असा त्यांचा शारीरिक धर्म त्यांजवळ भरलेलाच आहे. परंतु अग्नींत तेल घातल्याप्रमाणें बाईसाहेबांजवळ स्त्रियांचें एकहि वस्त्र नव्हतें. एक लहानसें नेसलेलें पातळ होतें व अंगांत पांढरी चोळी होती, याशिवाय सर्व पायजमा, बंडी वगैरे पुरुषवेषाचे कपडे होते. नवीन विकत आणावयास जवळ एक पैसासुद्धां नव्हता. एक रुप्याचा जांब व बोटांत एक हिरकणीची आंगठी येवढी काय ती संपत्ति जवळ होती. बरोबर दासी आली होती तिजजवळहि वस्त्र किंवा पैसा यांतून कांहींच नव्हतें. आतां कोणाचे तोंडाकडे पाहावें. पेशव्यांचे येथें स्त्री नाहीं. सर्व पुरुष आहेत. त्यांचे येथें जाऊन लुगडयाबद्दल मजकूर कळविण्याचे बाईसाहेबांचे जिवावर आलें. हरहर! त्या विपरीत प्रसंगीं त्यांस अबलांच्या मनोधर्माप्रमाणें एकसारखे अश्रु येऊं लागले, बरोबरची दासीहि रडूं लागली. याप्रमाणें घोळ चालू होतांच साहजिकच हें वर्तमान रावसाहेबांस कळलें, तेव्हां तात्या टोपीस बाईसाहेबांचा योग्य बंदोबस्त करण्यास पाठविलें. नंतर तात्यांनीं बाजारांतून किंमतवान लुगडीं व मुकटा आणवून पंधरा पात्रांचीं स्वयंपाकाचीं भांडीं, रुप्याचीं भांडीं, आचारी, पाणक्या, तंबू, कनाती, बिछाईत, शिबंदीचे शिपाई वगैरे सर्व व्यवस्था लावून दिली. नंतर तात्यां टोपी व रावसाहेब प्रत्यक्ष बाईसाहेबांस येऊन भेटल्यावर परस्परें सर्व हकीकती समजल्या. बाईसाहेबांचे घोडयानें फार उत्तम नोकरी बजावली खरी, परंतु तो अगदीं थकून जाऊन गुदामांत पोंचतांच खालीं पडला. त्याजवर बाईसाहेबांचें अत्यंत प्रेम होतें. मग दुसरे दिवशीं सातआठ मजूरदार घोडयाच्या शिरा मळण्याकरितां दोन प्रहरपर्यंत लाविले होते. त्याजमुळें त्या घोडयास पूर्ववत् हुशारी आली.

असो. याप्रमाणें बाईसाहेब मृत्युमुखांतून सुटून आपल्या मित्रमंडळींत जाऊन पोंचल्या, परंतु त्यांच्या झांशीची दैना सरली नाहीं. दुसरा दिवस उजाडणार तो बिजनचाच होता. याजमुळें झांशींत प्रत्येक मनुष्यास आपण स्मशानभूमीचे कांठावर आहों असें वाटत होतें. जो तो आपण या संकटांतून कसें वांचतों यांचा विचार करीत होता. आम्हीहि मांडवगणें यांचे घरीं आल्यावर मोठ्या उत्कंठेनें प्रथम उद्यांची तजवीज काय करतां असा केशवभटजीस प्रश्न केला, त्या वेळेस मांडवगणे यांनीं सांगितलें कीं, तुम्हीं किमपीहि धास्ती बाळगूं नका. आपले समोर वाडा आहे, त्याच्या मागें मोठ्या चौसोपी वाडयाची बखळ पडली आहे.

वाडा मोडून भिंताडें अर्धी पडीं पडलीं आहेत. सर्व ओसाडीभर आघाडा, गवत वगैरे पर्जन्यकाळाचें उत्पन्न तसेंच आहे. तेथें गुरूं किंवा मनुष्य जाण्यास वाट नाहीं. पूर्वी वाड्यांत जाण्यास बोळांतून रस्ता होता. वाडा ओसाड पडल्यावर दहापंधरा वर्षांनीं एका रंगाऱ्यानें बोळाचे तोंडावर लहानसें घर बांधलें आहे. त्याजमुळें तीं जागा कोणास सांपडावयाची नाहीं. तेथें जाऊन भिंतींतील बंड्यांत लपून बसूं. तेव्हां केशवरावास मीं विचारलें कीं, बंडा म्हणजे काय? त्यांनीं सांगितलें कीं, बुंदेलखंडांत पूर्वी चोरांचें भय फार असें, सबब मोठाल्या घराच्या भिंती फार रुंद बांधलेल्या असून त्यांत मोठमोठालें चोरकोनाडे राखलेले असतात. ते कधीं कधीं येवढें मोठाले असतात कीं, त्यांत सर्व मनुष्यें वसून भांडींकुंडीं, कपड्याचें गठ्ठे वगैरे सामान राहूं शकतें, चोराचे भय फार झालें म्हणजे अशी व्यवस्था लावून घर मोकळें टाकण्याची वहिवाट या प्रान्तांत असे. त्या वाड्यांत अशा बंड्यांत आपणास लपून राहण्यास जागा आहे. तेथें काळोख फार आहे. व वारा बिलकूल मिळावयाचा नाहीं. बाहेर जीव जाईल म्हणून तेथें राहणें आहे. असें ऐकून किंचित् जिवांत जीव आला, व ही आमची सुदैवानें सुटका हा हरिपंताच्या उपासनेचाच प्रभाव होय, असें मला आतां खचित वाटतें. असो. रात्रौ कांहीं स्वस्थपणानें संध्या, जेवणखाण आटपलें. नंतर माडीवर जाऊन शहरची हवाल पाहूं लागलो. सर्व शहर प्रेतभूमीसारखें दिसूं लागलें. रात्र होती तरी शहरास भयंकर आग लागली असल्याकारणानें चोहोंकडे साफ दिसत होतें. आप्तजन दुःखानें वेडे होऊन आपल्या स्वजनाच्या प्रेतापाशीं गल्लोगल्ली मोठ्या करुणस्वरानें रडून आकांत करीत होते. गरीब लोक अन्नाकरितां ओरडत रडत फिरत होते. जनावरेंहि दाणा-वैरणीकरितां व पाण्याकरितां ओरडत इकडे तिकडे फिरत होतीं. हलवाईपुऱ्यांत मोठमोठी श्रीमान लोकांचीं घरें असल्यामुळें आग लागली होती तिचा तर अनिवार अनर्थ चालला होता. ज्वाळा गगन चुंबीत जात होत्या. ती आग विझवण्यास कोणीहि प्रयत्न करींत नव्हता. त्या विशाळ भयंकर ज्वाळा जिकडे जातील तिकडे जाऊन दुसरींहि घरें पेटत होतीं. परंतु त्यांस कोणीहि अडथळा केला नाहीं; असा दुर्धर प्रसंग झांशीवर गुदरलेला पाहून माझें सर्वांगास कंप सुटला, अति भीति उत्पन्न झाली, व पोटांत आग भडकून गेली. तिला उपमा नाहीं. जिवाची भीति फार भयंकर आहे. मला झोंप

येईना. ती रात्र तशीच जागून घालविली. पहाट होतांच सर्व मंडळींनीं उठून स्नानसंध्यादि करून भोजनें आटपलीं व नेमलेल्या वाड्यांत जाण्याकरितां आम्ही चुलतेपुतणे, केशवभट्ट व त्यांचे चिरंजीव दामोदरभट्ट असें चौघे सिद्ध झालों तों घराशींच बंदुकीचा आवाज ऐकूं येऊन जीवच जाण्याचा प्रसंग आला. अजून प्रातःकाळ झाला नाहीं. सबब तुम्हास मारण्याचा अधिकार नाहीं असें त्या यमकिंकरांस कोण सांगेल ? त्यांची स्वारी दरवाज्यापाशीं दृष्टीस पडतांच आतां आपण जगत नाहीं अशी दुर्धर भीति व्यापून गेली. माझ्या सर्व शरीरास कंप व घाम सुटला तोंड शुष्क होऊन जिव्हा आंत ओढून गेली. कंबरेखालीं पाय आहेत कीं नाहींत असें वाटूं लागलें. दोघे बापलेक घरांत पळून कोठें एकीकडे काळोखांत जाऊन लपले. आम्ही चुलतेपुतणे मात्र गर्भगळित होऊन ठिकाणच्या ठिकाणीं खिळून गेलों. दोन गोरे धांवून बंदुक पुढें करून आले. त्या समयीं परमेश्वरानेंच आम्हांस बुद्धि दिली यांत संशय नाहीं. आम्ही लागलीच पृथ्वीवर साष्टांग नमस्कार घालून हिंदुस्थानी भाषेंनें बोलूं लागलों, "साहेब, आम्ही मुंबईजवळील ठाणें जिल्ह्यांत राहणारे आहों, आम्ही इकडे यात्रेकरितां आलों आहों, आम्हास आपण मारूं नये, आम्ही इंग्रज सरकारचे रयत आहों, आम्ही पितापुत्र आहों, व गरीब भिक्षुक असून या घराचे यजमानाची ओळख पडून येथें कांहीं रुपये मिळतील म्हणून आलों आहों. साहेबांनीं आम्हांस मारूं नये" असें आम्ही बोलतांना त्यांनीं आमचे भाषेवरून आम्ही या देशांतील राहणारे नव्हत अशी परीक्षा केली, व आम्हापाशीं रुपये मागूं लागले व चोहोंकडे शोधूं लागले. आम्ही किल्ल्यांतून येतांना बरोबर अडीचशें रुपये आणले होते त्यांची पुरचुंडी करून बिछान्याचे वळकुटींत ठेविली होती. ती वळकुटी गोरे लोकांनीं पाडतांच आंतून रुपयांची पुरचुंडी खळकन् बाहेर पडली. तेवढे रुपये घेऊन ते यमदूत आमच्या पूर्वसुकृतामुळें व आयुष्याची दोरी बळकट असल्याकारणानें दुसरीकडे चालते झाले. या मृत्युसंकटांतून तारल्याबद्दल वैजनाथेश्वराची स्तुति करून आम्ही व मांडवगणे लागलीच ठरलेल्या वाड्यांत लपण्याकरितां गेलों, तों ती जागा चोहों बाजूंच्या पुरुषांनीं व बायकांनीं भरली होती. कांहीं बंडयांत म्हणजे भिंतीतील चोरकोनाडयांत तीन तीन माणसें बसण्यासारखी जागा असून त्यांत चार चार माणसें बसली होती. आम्ही बंडयांत जाऊन बसल्यावर एका घटकेनें साफ उजाडून चोहोंकडून बंदुकींचे शतावधि आवाज होऊं लागले. दर आवाजास एकेक मनुष्य मेला

असेल असें मनांत आलें म्हणजे अंगावर रोमांच उभे राहत. हरहर! काय इंग्रजी शिपायांचा दुष्टपणा! निरपराध दीन लोकांस दुसऱ्यांच्या पापाबद्दल किती शासन हें! मारणारे शिपाई लोकांपैकीं एकासही त्या गरीब लोकांची दया आली नसेल काय? याप्रमाणें विचार करीत वंडयांत अडचणींत बसलों असतां, बारा वाजायच्या सुमारास मजला अतिशय तहान लागली. अगोदरच वैशाखाचे दिवस; त्यांत जेथें वारा नाहीं, अशा कोंदट जागेंत दाटींत बसलेलों, शिवाय ऐनदोनप्रहरचा वेळ झाला होता; अशा अनेक उष्णतेच्या कारणांनीं अगोदरच भीतीनें शुष्क झालेल्या कंठास अत्यंत कोरड पडली. ती इतकी पडली कीं, अंगांतील सर्व रक्त शोषून गेलें. आतां प्राण जातो कीं काय असें वाटूं लागले. आपणास तहान लागेल हें मंडळींस वाटल्यावरून त्यांनीं त्याची तजवीज करून ठेवली होती. आपल्या मोहल्यांत आवाज होत नाहीं असें पाहून, बाहेर येऊन पाणी पिण्याकरितां विहिरीच्या रहाटास दोर लावून ठेवला होता, व जवळच एक मडकें ठेवलें होतें. परंतु मला बाहेर जाण्याचा धीर होईना. शेवटीं येथें बसून तरी प्राण जाणार; मग तृषा भागवून कां जाईना, असें वाटून जवळ आसपास कोठें आवाज होत नाहीं अशी संधि पाहून वंडयांतून बाहेर पडलों. धांवत धांवत विहिरीवर येऊन मडकें फांसास लावून झराझर पाणी काढलें व मडकें तोंडास लावलें. घोट दोन घोट पाणी घशाखालीं उतरतें न उतरतें इतक्यांत जवळच्या वाडयांत बंदुकीचा आवाज झालेला कानीं पडला. जिवाची आशा मनुष्यास कधींही सुटत नाहीं. मडकें हातांतून टाकून धांव ठोकली तों घोटाळून जाऊन आमच्या वंडयाचा रस्ता चुकलों. तेव्हां माझे हातपाय कापूं लागले, व सैरावैरा इकडे तिकडे घाबरून धांवत सुटलों. इतक्यांत एका वंडयांचें तोंड दृष्टीस पडलें. त्यांत डोकें घालून शिरण्यास लागलों तों आंत दोघी तरुण बायका दृष्टीस पडल्या. त्यांनींही मोठ्या घाईनें आंत लवकर या असें सांगितलें. तो वंडा फार लहान असल्यामुळें आंत दोघां बायकांसही पुरेशी जागा नव्हती परंतु त्या कोमल अंतःकरणांच्या स्त्रियांनीं अडचण सोसून मला आंत घेतले. त्यांची तोंडें पश्चिमेस होतीं व मी आंत शिरून फिरावयास जागा नव्हती. म्हणून माझे तोंड पूर्वेस होतें. याप्रमाणें तोंडास तोंड लावून उराशीं ऊर लावून आम्ही बसलों. पुढेंच जी स्त्री होती तिचें सर्व अंग घामानें भिजलेलें होतें. त्या वेळेस माझे वय सुमारें ३० वर्षांचें असावें व त्या स्त्रीचें वय १८ वर्षांचें असावें. अशीं तरुण स्त्रीपुरुषें एकमेकांशीं घट्ट मिठी

मारून बसलीं असतांही कामवासना बिलकुल उत्पन्न झाली नाहीं, हा भयंकर मृत्युभीतीचा प्रवाह म्हटला पाहिजे. सहासात घटका झाल्यावर जवळ आसपास कोठें आवाज होत नाहींत असें पाहून मी त्या बंब्यांतून बाहेर पडलों, आणि आपल्या बंब्यांत जाऊन बसलों. मला परत आलेला पाहून काकांस परमावधि आनंद झाला. त्यांस मी मारला गेलों असें पक्के वाटून अति शोक उत्पन्न झाला होता. असो. याप्रमाणें परमेश्वराच्या दयेनें व हरिपंताच्या पुण्याईनें तो दिवस फार पडला. रात्र होतांच आम्ही आपल्या गुहेंतून बाहेर पडलों व घरीं येऊन बसलों, तों शेजारचे करकरे यांची बायको व सून आमचे येथें येऊन सर्व वृत्त आम्हास सांगूं लागल्या. तो ब्राह्मण बिचारा ६०–६५ वर्षांचा व त्याचा पूर्ण वयस्कर मुलगा असे दोघे मारले गेले होते. तेव्हांपासून सासू व सुन आपल्या पतींच्या प्रेतांशीं मोठा आकांत करीत बसल्या होत्या; परंतु रात्र पडतांच त्यांस भीति वाटूं लागली. तेव्हां आम्हाकडे येऊन आम्हास प्रेतशुद्धि करण्याविषयीं विनवूं लागल्या. त्या वेळेस जरी सर्वांस भुका लागल्या होत्या तरी लागलीच शेजारपाजारचे सातआठ लोक जमा करून करकरे यांचे घरीं गेलों. नंतर तुळशीच्या अंगणांत चिता रचून प्रेतें दहन केलीं. लांकडें भरतीचीं नव्हतीं, सबब घरांतील फळया, पाट, पाळणे, बाज वगैरे भरतीस घातलीं. प्रेतशुद्धि झाल्यावर त्या बायकांस आम्ही आपले घरीं घेऊन आलों. झांशीच्या त्या भयंकर प्रसंगांत कोणाचें कोणास अशौच नाहीं. दुसरे दिवशीं आदले दिवशींच्या प्रसंगाची आठवण होऊन अपरात्रींच उठून रात्र सरली नाहीं तों बंब्यांत जाऊन बसलों. त्या दिवशीं फार माणसें मेलीं. गोरे दुरून दृष्टीस पडले म्हणजे जीव बचावण्याकरितां कित्येक लोक गवताचे गंजींत जाऊन लपले, तेथें गोरे येऊन त्यांनीं गवताच्या गंजी पेटवून दिल्या म्हणजे ते अग्नींत जळून जात. कित्येकांनीं गोरा आला असें पाहून विहिरींत उड्या घातल्या; परंतु गोरे लोकांनीं विहिरीवर बसून पाण्यावर डोकें दिसूं लागतांच गोळ्यांचा भडिमार करून त्यांस तेथेंच मारलें. कित्येक लोक शेतखान्यांत लपून बसले होते, त्यांसही शोधून ठार मारलें. आमचे शेजारीं अग्निहोत्रीबुवाचें घर होतें. अग्निहोत्रीबुवा होम देऊन बाहेर येतात तों घरांत दोन गोरे व गोरे लोकांचे बंदोबस्ताकरितां चार काळे शिपाई शिरले. गोरे जे गेले ते होम शाळेंत समोर गेले. तेथें अग्नीचे कुंडावर टोपल्या–पाट्या उपड्या घातलेल्या होत्या. यामुळें गोरे लोकांस असें वाटलें कीं, यांत अर्थ आहे. म्हणून

लाथेनें पाट्या उडवून पाहतात तों राखाडी दृष्टीस पडली. यांत पुरलेला अर्थ असेल हें मनांत आणून आंत हात घातला, तों अग्नीच्या योगानें हात भाजले; मग ते गोरे अति क्रोधायमान होऊन अग्निहोत्री यास व त्याचे भावास व मुलास बंदुकीच्या गोळ्यांनीं ठार मारून कांहीं सोनें, रुपें होते तें घेऊन दुसऱ्या घरीं गेले. एकंदर अग्निहोत्रीबुवासुद्धां त्याचे घरचीं अकरा मनुष्यें मारलीं गेलीं. सर्व कुटंबघातच झाला. कित्येक लोक गोरा पाहून पळण्यास लागले. त्यांस रस्त्यांतच कडामिनीच्या गोळ्यांनीं मारीत असत. भिडे याचे बागेंतील सर्व मनुष्यें दोन दिवस उपाशीं होतीं. तिसरे दिवशीं पहाटेस दरवाज्यावर पहारेकरी गोरे लोक होते त्यांनीं बागांत येऊन सर्वांस असें सांगितलें कीं आपापले घरीं जाऊन भोजनाचा सरंजाम आणून येथें जेवणें करा. असें सांगतांच सर्व मनुष्यांस अत्यानंद झाला, व घरीं धांवत धांवत जाऊन ज्याचा त्यानें सरंजाम आणला, व माणसें पुनः बागांत शिरलीं. त्यांत दुसरे लोकही जीव वचावण्यांकरितां शिरले व तिसऱ्या दिवसाचे विजनांतून वांचलें गेले.

याप्रमाणें तीन दिवस विजन करून शहरांत जितकें सोनें, रुपें, हिरे, पाच, मोतीं, पोंवळें सांपडलें तितकें गोरे लोक घेऊन गेले. त्यावेळेस शहरांत कोट्यावधि रुपयांचा अर्थ गोरे शिपायांस सांपडला असेल. पुरुषाचें भाग्य फार चमत्कारिक आहे. तिसरे दिवशीं इंग्रजांचे लोक शहरचे वाड्यांत शिरले आणि तेथें सर्व प्रकारची लूट मांडली. सोनें, रुपें, पितळ, तांबें वगैरे सर्व जिन्नस इंग्रज सरकारनें लुटून आपले गोटांत नेला त्यांत त्यांनीं कांहीं एक अर्थ किंवा वस्त्र किंवा पात्र ठेवलें नाहीं. पोथ्यांचीं वेष्टणें यांवर सुद्धां त्यांची धाड येऊन पडली. झांशीची पुस्तकशाळा फार मोठी व उत्तम व्यवस्थेची होती. कारण झांशीचा सुभा पेशव्यापासून ज्या पुरुषांनीं मिळविला, त्या पुरुषापासून गंगाधरबावा उर्फ बाबसाहेब या शेवटच्या पुरुषापर्यंत झांशीवाले पुस्तकांविषयीं फार उद्योगी झाले. चारहि वेदांचीं भाष्यें व सर्व शास्त्रांचीं सूत्रें भाष्यांसहित व परिशिष्टें भाष्यें सुद्धां व स्मृति टीकांसह दरोबस्त पुराणें यांखेरीज ज्योतिषशास्त्राचे ग्रंथ, असे बहुदा पृथ्वीवरचे सर्व तऱ्हेचे उपयुक्त ग्रंथ तेथें होते. झांशीपासून चारपांचशें कोसांवर ग्रंथ नवा असल्याचें कळताच त्या शहरांत झांशीहून लेखक पाठवून ग्रंथ, लिहून आणले होते. कारणपरत्वें ग्रंथ लागल्यास काशीक्षेत्रीं

झांशीहून ग्रंथ पाहाण्यास नेत असत. सर्व ग्रंथांस वेष्टणें फार मजबुतीचीं व फळ्या शिसव्याच्या होत्या. त्या प्रसंगांत इंग्रज सरकारनें पुस्तकांच्या फळ्या व वेष्टणें सोडून घेऊन पुस्तकें धडाधड तिसरे मजल्यावरून रस्त्यांत टाकून दिलीं. त्या पोथ्यांचीं पानें वाऱ्याच्या योगानें रस्तोरस्तीं उडून जात होतीं. तसेंच फरासखान्यांतील जाजमें, लोड, तके, तंबू, पाले वगैरे सर्व गोटांत घेऊन गेले. नगारखान्यांत जाऊन सर्व नौबदी नगारे वगैरे फोडून तांब्यांचीं भांडीं घेऊन गेले. याप्रमाणें वाड्याची अगदीं दुर्दशा करून टाकली. लक्ष्मीचें देवालयहि लुटण्यास सोडलें नाहीं; देवीचे अलंकार, वस्त्र वगैरे सर्व सरंजाम लुटून नेला. मला वाटतें कीं, महालक्ष्मीस आपलाच राग येऊन तिचा सर्व सरंजाम तिला नकोसा झाला होता. उद्यांपासून विजन बंद होणार म्हणून या विजनाचें काम त्या दिवशीं फार जारीनें व शिताफीनें चाललें होतें; घरांत शिरून कोनाकोपऱ्यांत अंधारांत लपलेलीं माणसें शोधून मारीत होते; धर्मशाळाहि शोधल्या, देवळांचे गाभारेहि शोधून प्रेतांनीं भरून काढले. कोष्टीपुऱ्यांत अति प्राणनाश झाला, त्यांत बिचाऱ्या कांहीं बायकाहि मारल्या गेल्या होत्या.

तिसरा दिवस विजनाचा संपल्यावर जिवाच्या भितीचें डोंगराएवढें ओझें डोक्यावरून कमी होऊन आम्हास फार आनंद झाला व बंद्यांतून निघून घरीं येऊन मोकळ्या मनानें बसलों. नंतर स्वस्थपणें स्नान-भोजनें केलीं. तीन दिवसपर्यंत रात्रौ घरांत जें धान्य होतें तें शिजवून भोजनें करीत असूं. शहरची वस्ती असल्यामुळें आठा दिवसांपलीकडे महिन्याचा धान्यसंग्रह केलेला असा गृहस्थ थोडा होता. तिसरे दिवशीं लोकांनीं सावधपणानें खाण्याकरितां धान्य व मीठ वाड्याचे चौकाचे गटारांत न दृष्टीस पडेल असें ठेवलें होतें. कोणी भूमींत पुरून ठेवले होते. ज्यांच्यापाशीं मुळींच धान्य नव्हतें ते उपोषणें करून राहत होते. आम्ही मांडवगणे यांजकडे गटारांत जोंधळे व बाजरी थोडी ठेवली होती. मांडवगणे गरीब भिक्षुक असल्यामुळें तांदुळ वगैरे धान्यें जुजबी होतीं तीं मुळींच संपलीं होतीं, यामुळें जेवणाचे हाल होत असत तरी त्याविषयीं आम्हास विशेष दुःख वाटलें नाहीं परंतु जेव्हां आम्हाजवळची तंबाखू संपली तेव्हां आम्हास उपोषण पडल्याभारखें होऊन गेलें. विजनाच्या दिवसांत तंबाखूची आठवण सुद्धां आली नाहीं. कधीं रात्रीं घरीं येऊन

जेवण झाल्यावर थोडीशी खात असूं. परंतु जिवावरची भिति संपतांच तंबाखू-शिवाय करमेनासें झालें. गांवांत तंबाखू कोठें विकत मिळण्याचें तर नांव नको. याप्रमाणें मोठ्या संकटानें ती रात्र घालविल्यावर सकाळचे प्रहरीं एक पंचा नेसून स्वस्थपणें काय होतें याची मौज पाहण्याकरितां ओटीवर वसलों, तों काळे मंद्राजी लोक शहरांत तांबें, पितळ वगैरे धातूंची लूट करण्याकरितां आलेले दृष्टीस पडले त्या लोकांनीं बरोबर मोठमोठाले गळ विहिरींतून भांडीं काढण्याकरितां आणले होते. बिचाऱ्या मुर्ख लोकांनीं आपलीं भांडींकुडीं वांचवावीं म्हणून विहिरींतून टाकून ठेवलीं होतीं. परंतु विहिरी उथळ असल्यामुळें मंद्राजी शिपायांनीं सर्व भांडीं काढून नेलीं. लोकांचे घरांत शिरून जें पात्र सांपडेल तें लुटून नेत असत. आमचे घरीं लोक येतांच आम्ही त्यांस नम्रतेनें सर्व हकीकती विचारल्या. तेव्हां ते सांगूं लागले कीं, तीन दिवस विजन होऊन गोरे लोकांस सोनें-रुपें सांपडलें तें बक्षीस दिलें आहे, आतां पुढें चार दिवस लूट होईल. या दिवशीं कोणाचाही प्राणघात होणार नाहीं. लुटीचे दिवस जेवढ्या काळ्या पलटणी व हिंदुस्थानचे राजेरजवाड्यांकडून मदतीस पलटणी आल्या आहेत त्यांस हिशेवानें वांटून दिले आहेत. आजचा दिवस आमचे वांटणीस आला आहे. उद्यां सकाळीं बारा वाजे-पर्यंत हैदराबादवाल्यांची वांटणी आहे. असें सांगितल्यावर आम्ही त्यांजजवळ तंबाखू खावयास मागूं लागलों. तेव्हां ती त्यांनीं आम्हास खुषीनें पुष्कळ दिली नंतर घरांत सांपडलीं तीं भांडीं घेऊन ते दुसरीकडे चालते झाले. आम्ही जेवण करण्यास भांडीं रात्रौ बाहेर भूमींत पुरून पांचचार ठेवलीं होतीं. बाकी सर्व त्या लोकांनीं नेलीं. घटके घटकेनें दुसरे काळे मंद्राजी येत असत, सबब सायंकाळपर्यंत उपोपणें घडलीं. रात्रौ सर्व लोक शहराबाहेर गेल्यावर आम्ही स्नानें करून शाळी-ग्राम, बाण व नर्मदी गणपति घरांत राहिले होते,—बाकी उपकर्णी व धातुमूर्ति, देवांचीं कमळें वगैरे नेलीं होतीं, त्या देवांची पूजा केली. माझी मुळींच पार्थिवलिंग-पूजा असल्यानें कांहींच अडचण आली नाहीं. बेल मात्र पाहिजे होता तो दारचा काढून पूजा केली. नंतर जोंधळे व कांहीं बाजरी ठेवलेली गटारांतून काढून दळून अग्नि पेटवून तवा, पितळी नसल्यामुळें गागरासारखे पानगे अग्नीवर भाजले व मीठ मुळींच नव्हतें, सबब मिठाशिवाय तशींच भोजनें केलीं. सायंकाळीं दिवे लावण्यास समया नव्हत्या, तेव्हां, दिवल्या मातीच्या लावल्या होत्या कांहीं वेळानें जवळच्या घरची उमेदवार मंडळी पांचसात असामी आमचे बिऱ्हाडीं येऊन मला बरोबर घेऊन

शहर पाहण्यास गेली; आम्हास रस्त्यांतून ठिकठिकाणीं प्रेतें आढळूं लागलीं. शहर जळतच होते. जे जिवंत राहिले होते ते बहुदा उपाशीं असल्यामुळें क्षुधार्त होऊन करूण स्वरानें ओरडत होते. हजारों जनावरें श्वासमात्र–शेष होऊन रस्तोरस्तीं पडलीं होतीं. गल्लोगल्लीं प्रेतांशीं बसून लोक रडत होते, आम्ही सुमारें पाव घटका इकडे तिकडे फिरल्यावर आम्हास अति भीति व किळस उत्पन्न झाला, व तावडतोव परतलों व घरीं येऊन स्वस्त निद्रा केली. दुसरे दिवशीं उजडताच हैद्राबादवाल्यांचें शिपाई शहरांत लूट करण्यास शिरले, ते वस्त्रांची लूट करीत चालले घरांत शिरून जेवढें वस्त्र म्हणजे फाटकें धोतर किंवा उंची पीतांबर असो, तेवढें घेत चालले. दोन तीन वाड्यांचे संधींत हत्ती उभा करून त्याजवर मोठा सलिश म्हणजे कंठाळी सारखा असतो तो टाकून त्यांत चिरगुटें, पांघुरणें, सत्रंज्या, गाद्या, बैठकी, जाजमें वगैरे सर्व भरून नेऊं लागले. याप्रमाणें त्यांनीं मोठमोठ्या व्यापाऱ्यांच्या घरीं लाखों रुपयांची लूट मिळविली. आम्ही ओटीवर वसून जे लोक भेटतील त्यांजपाशीं गोड बोलून तंबाखू खाण्यास मिळवीत असूं. तिसरें दिवशीं शहरांत पलटणीचे लोक शिरले, त्यांनीं धान्य लुटण्यास आरंभ केला. त्यांनीं बरोबर मोठमोठे बैल आणिले होते. बैल दरवाजापाशीं उभा करून लोकांचें घरीं जोंधळें, बाजरी, तांदूळ, डाळी वगैरे जीं धान्यें सांपडलीं तीं भरून नेलीं. धान्यादिकांनीं भरलेली मडकी ओतून घेऊन तेथेंच फोडून टाकीत असत. चवथे दिवशीं सर्व प्रकारची लूट करण्यास आरंभ केला. ज्यास जें नेण्यासारखें वाटेल, तें तो घेऊन जाई. लोकांचे घरीं उपयोगी वस्तु एकहि ठेविली नाहीं; विहिरीचे रहाटही काढून नेले. रहाटांचे दोरखंड नेले. दारच्या केळीवरची कळवंडें, आंब्यावरचे आंबे, झाडांवरील फळें, लांकडी खुर्च्या वगैरे सामान याप्रमाणें सर्व जिनसांची लूट मांडली. त्यादिवशीं आम्हापाशीं कांहीं एक खाण्यास नव्हतें. जुजबी धान्य होतें ते सर्व सरून गेले होते. बाजारांत कोठें विकत घेऊं म्हटलें तर कोठेंच मिळण्यासारखें नव्हतें. सायंकाळपर्यंत उपोषण पडल्यामुळें व वैशाखमास असल्यामुळें जीव अगदीं हलका होऊन गेला. सायंकाळानंतर थंड पाण्यानें स्नान करून अतिशय भूक व तहान लागल्यामुळें निरुपायास्तव थंडा फराळ केला. हरहर! काय हा दुःखाचा प्रसंग! सर्व शहरांत हजारों लोक उपाशीं होते. लाखों मेले होते. शहर जळत होतें. लोक तर अगदीं नागवून गेले होते. कोणाच्या घरांत भांडें मडकें अगर वस्त्र कांहीं उरलें नव्हतें. परमेश्वराच्या

घरचा न्याय मोठा चमत्कारिक आहे. ज्या गरीब लोकांनीं इंग्रज सरकारचा कोणत्याही प्रकारें अपराध केला नव्हता, त्यांस निरर्थक किती भयंकर शिक्षा ही! परंतु इंग्रज सरकारास अगर परमेश्वरास तरी बोल काय म्हणून लावावा? शुक्रनीतीमध्यें शत्रूचें पारिपत्य असेंच करावें म्हणून सांगितलें आहे. परमेश्वरानें तरी काय अन्याय केला आहे? झांशीच्या लोकांचे पदरी पूर्वदुष्कृत्यच फार मोठें असले पाहिजे. बुंदेलखंडांत व्यभिचाराचें पातक पूर्वीपासून सांचत आलें होतें. भंगिणीचा इतिहास मागचे भागांत वर्णन केलाच आहे. या पातकपर्वताबद्दल लक्ष्मीबाईच्या निमित्तानें सर्व शहरांस देहांत प्रायश्चित्त देऊन ईश्वरानें ही भूमि शुद्ध केली असें आम्हास वाटूं लागलें. याप्रमाणें मनाचें समाधान करून उदयीक काय करावें असा विचार करू लागलों. घरून निघाल्यापासून सुमारें चारपाचशें रूपये ग्वाल्हेर व झांशी येथें मिळविलें; परंतु जवळ कांहीं उरलें नव्हतें. घरीं वृद्ध तीर्थरूप व मातोश्रीस टाकून द्रव्य मिळविण्याकरितां देशांतरी आलों. अनेक संकटें भोगून पैसा मिळविला, परंतु दैव विपरीत असल्यामुळें सर्व द्रव्य नाहींसें होऊन जीव जाण्याचाही प्रसंग आला. त्यावेळेस राजनीतीतील एका आर्येचें आम्हास स्मरण झालें. " अबला यत्र प्रबला बालो राजा निरक्षरो मंत्री ॥ नहि नहि तत्र धनाशा जीविताशापि दुर्लभा भवति " अशी स्थिति झांशीस अक्षरशः होती. अशा राज्य व्यवस्थेंत द्रव्य मिळण्याची आशा तर फार लांबच राहिली, परंतु जीविताची आशा सुद्धा धरावयास नको. तेव्हां या दुस्तर संकटांतून वाचलों हे आमचे महत्वपूर्व-सुकृतच समजले पाहिजे.

असो अष्टम दिवस उजडतांच शहरांत इंग्रज सरकारनें ' खुलक खुदाका, मुल्क बादशहाका, अंमल इंग्रज सरकारका ' अशी दवंडी पिटवून सर्व लोकांस निर्भय केले. ज्याचे त्यानें प्रेत नेऊन मूठमाती द्यावी असा हुकूम फर्माविला, व शहरांत हजारों भंगी लावून रस्ते शुद्ध करण्यास आरंभ केला. हलवाईपुऱ्यापासून कोष्टीपुऱ्यापर्यंत भयंकर आग लागून शहर जळत होतें. ती आग विझविण्याकरितां पाण्याचा बंब सुरू करून बहुतेक आग विझवून टाकली. इंग्रज सरकारच्या लोकांनीं दोनचार रस्ते मिळतात अशा चवाट्यावर जीं प्रेतें तशींच पडलीं होतीं, त्या प्रेतांची खाई म्हणजे ढीग रचले व लोकांचे घरांत शिरून जितकी जळाऊ लांकडे सांपडलीं तितकी त्यांजवर आणून टाकली घरांत

जितकें सुटें लांकूड होतें तितकें भरतीस घातले. दाराच्या फळया, खिडक्यांच्या फळ्या, तक्तपोशीचे सुटे तक्ते, पाळणे, झोपाळे, माच, लांकडी सुटे कठडे वगैरे जितके लांकूड मिळाले तितके काढून चितेंत टाकून अग्नि पेटवून दिला. त्या समयीं तें शहर स्मशानासारखें दिसूं लागलें. दर चवाठ्यावर प्रेतांची खाई जळूं लागली. ज्यास प्रेतसंस्कार देण्याची इच्छा व ऐपत होती, ते लोक आपल्या आप्तजनांची प्रेतें उचलून नेत होते. बाकीची प्रेतें खाईंत टाकीत होते. याशिवाय हजारों बैल, उंट, हत्ती, कुत्रीं, घोडे, म्हशी मेलेलीं पडलीं होतीं. तीं सर्व उचलून शहराबाहेर एक जबरदस्त खंदक खणला होता, त्यांत नेऊन टाकिलीं व वरतीं माती लोटली. याप्रमाणें त्या दिवशीं सर्व शहर शुद्ध झाल्यावर इंग्रज सरकारनें सरकारवाड्यापुढें सर्व प्रकारच्या जिनसांची दुकानें मांडलीं, तेव्हां हजारों लोकांची गर्दी होऊन जो तो आपल्या प्रपंचाचे जिन्नस विकत घेऊं लागला. लोकांजवळ कांहीं कांहीं कोठें अर्थ उरला होता. आमच्यापाशी हातांत दोन तोळ्यांचीं जोडवी व वटव्यांत पांच रुपये इतके होते, याशिवाय कांहीं नव्हते. आम्ही बाजारांतून पान, तंबाखू, तांदूळ वगैरे जिन्नस आणून यथेच्छ भोजनें केलीं. त्या वेळेस सर्व प्रकारें मनास हुशारी येऊन आनंद झाला होता, परंतु शहरांत प्रेतें जळत होतीं त्यांची मात्र दुर्गंधी वाऱ्याचे योगानें अतिशय सुटली होती, त्यामुळें मनास फार किळस येत असे. नंतर जितक्या मौल्यवान् वस्तु इंग्रज सरकारनें लुटल्या होत्या, त्यांचा लिलांव शहराबाहेर सुरू केला. हत्ती, उंट, घोडे वगैरे लढाईच्या उपयोगी सरंजाम शिंदेसरकारांनीं विकत घेतला. दुसरें मोठमोठे सामान राजेरजवाडे लोकांनीं विकत घेतलें, एक अति उत्तम पितळी पाळणा गुणी कारागिरानें केलेला वडिलोपार्जित झांशीवाल्यांचा होता तो शिंदेसरकारनें विकत घेतला.

या विक्रींत इंग्रज सरकारनें अनंत द्रव्य उत्पन्न केलें, व शहरांतील पैसा अगदीं धुवून काढला असें म्हणण्यास हरकत नाहीं. जितकें द्रव्य सांपडलें तितकें गोऱ्या शिपायांनीं लुटून नेले, बाकी कोठें कोठें चुकून राहिलें तें–लोकांचेंच धान्य, भांडीं वगैरे—त्यांस विकून काढून घेतलें. याप्रमाणें नववे दिवसापासून सर्व लोक निर्द्रव्य होऊन गतकर्माबद्दल प्रायश्चित घेऊन नवीन संसार पुनः मांडण्याच्या उद्योगास लागले.

नगरवासी लोक निष्काळजी झाले खरे, परंतु ज्या लोकांचें राज्यकारस्थानांत विशेष अंग होते, त्या लोकांवरचे अरिष्ट संपले नाहीं. इंग्रज सरकारांनीं बाई-साहेबांच्या पदरचे सरदार, मुत्सद्दी वगैरे लोकांचा शोध करण्याचा उद्योग सुरू ठेविला होता. जे जे सरदार या बंडांत होते, ते ते सांपडलें असतां शहरांत वाड्यापुढें फांशीं देत असत. अकराव्या रात्रीं बाईसाहेब इंग्रज सरकारच्या लष्करांतून फळी फोडून गेल्या त्या समयीं त्यांजबरोबरचे स्वार, सरदार व पायदळ विलायती लोक बहुधा मरण पावले. कांहीं कांहीं लोक बाहेर पडून जीव बचावून पळून गेले. कांहीं सांपडले ते परत झांशीस आणून फांशी दिले. बाईंचा बाप मोरोपंत तांबे ह्यास त्या रात्रींच्या प्रसंगांत पळतां पळतां तरवारीचा वार पायाच्या मांडीस लागला होता. मांडी पायजम्यांतून फार कापली गेली होती, तरी तसाच घोड्याच्या रिकीबीवर भार देऊन घोडा पळवीत पळवीत उजाडतां दतिया शहरानजीक गेला. तों शहर शत्रूचें आहे असें दिसलें. परंतु सर्व अंग रक्तानें भरलें आहे, कपडे लाल झालेले आहेत, असें पाहून फार घाबरून निरुपायास्तव शहराच्या दरवाजाजवळ गेला. तेथें एक तांबोळी दरवाजांत पानें विकण्याकरितां बसला होता. त्यास पाहून घोड्यावरून हळूच उतरून घोडा सोडून दिला आणि तांबोळ्यास शरण जाऊन त्यांस कांहीं मोहरा देऊन वश केला. मग तांबोळ्यानें मोरोपंतास हळहळू आपल्या घरीं नेऊन ठेविला. नंतर त्यानें राजास सर्व मजकूर सांगून राजाकडील लोक घेऊन येऊन त्यांच्या स्वाधीन मोरोपंतास केला. पुढें दतियावाले राजांनीं त्यास कैदखान्यांत ठेवून इंग्रज सरकारास कळवून त्यांच्या स्वाधीन केलें. इंग्रज सरकारनें त्यास डोलींत घालून झांशींत आणून वाड्यापुढें फांशी दिला. याप्रमाणें जिकडे तिकडे शोध लागला तिकडून गुन्हेगारांस धरून आणून झांशींत फांशी देत होते. किल्ल्याखालीं काळा जरनेली झेंडा लाविला होता. शहरांतहि शोध करून गुन्हेगार पकडून लागलीच फांशी देत होते.

विजन व लूट सरल्यावर आम्ही झांशींत पंधरा दिवस काढले. नंतर एके दिवशीं रात्रौ आम्हीं उभयतां दोघांजणांनीं बसून विचार केला, त्यांत असें ठरलें कीं, या देशांत आलों त्यापेक्षां आतां श्रीगंगेचीं स्नानें करून व काशी क्षेत्र पाहून ब्रह्मावर्त क्षेत्रीं चार महिने राहून देशी जावें हें बरें. घरून निघाल्यापासून अर्थ प्राप्त न होतां महासंकट मात्र प्राप्त झालें. हा आपल्या दैवाचा योग

आहे. आतां काशीयात्रा घडण्याकरितां कांहीं पैसा मिळविलाच पाहिजे. घरीं पैसा नेण्यापुरता न मिळाला तरी हरकत नाहीं; परंतु यात्रेकरितां पैसा मिळविणें प्राप्त आहे. सबब येथून निघून श्रीक्षेत्र चित्रकूट येथें, आपले यजमान वसईकर हरिपंततात्या भावे, सरकारचे आश्रित बहुत दिवसांचे आहेत तेथें जाऊं म्हणजे तेथील यात्राही होऊन कांहीं पैसाही मिळेल. येथून डाक चालते असें म्हणतात, तर प्रथम एक खुशालीचें पत्र घरीं उदयीक रवाना करावें, व दिवस पाहून येथून प्रयाण करावें, असा विचार करून दुसऱ्या दिवशीं वसईस तीर्थरूपांच्या नांवें पत्र लिहिलें. त्यांत झांशीचा थोडा मजकूर लिहून आम्ही पुढें सराईस मार्गशीर्ष—पौषअखेर वसईस परत येतों, हल्ली ब्रह्मावर्त क्षेत्रीं निघून गेलों, खुशाल आहों, काळजी करूं नये वगैरे मजकूर लिहून पत्र डाकमार्गें रवाना केलें. व पुढें मुहूर्त पाहून ब्रह्मावर्तास जावयास निघालों. त्या समयीं तेथील शेजारी लोकांस आमची स्थिति पाहून वाईट वाटलें. ब्राह्मण येथें येऊन महासंकटांत पडून अर्थ, पात्र, वस्त्राशिवाय जाणार असें वाटून, मांडवगणे यांजकडील मनुष्यें डोळयांस पाणी आणून फार गहिंवर येऊन स्तब्ध राहिलीं. आम्ही उभयतां काका व मी कंबरेस करगोटे बांधून लंगोट्या नेसून लंगोट्यांचे आंत करगोट्यास सोन्याचें जोडवें बांधून ठेविलें, आणि दोघांत मिळून तंबाखूचा बटवा एकच राहिला होता, तो बाहेरून फाटून चिंध्या लोंबत होत्या. तोच फाटका बटवा बरोबर घेतला. त्यांत साधारण लोखंडी अडकित्ता व एक जस्ती डबी होती. आणि रुपये तीन व एक रुपयाचा खुर्दा इंग्रजी, याप्रमाणें बरोबर अर्थ होता. कंबरेस एक पंचा फाटका नेसण्यासारखा गुंडाळून घेतला, एक पंचा डोकीस बांधला, व एक उपरणें अंगावर घेऊन अंगांत फाटकें बन्यान घातलें. अंबाडीची दोरी सुमारें पाऊणशें हात पाणरसी घेऊन, त्यास तांब्याभर पाणी राहील असें मातीचें मडकें लाविलें व तो रसीलोटा बरोबर घेतला. अशा अवधूत-वैभवानिशीं सर्वांस नमस्कार करून घराबाहेर पडलों. मांडवगणे हे शहरचे दरवाजापर्यंत पोंचविण्यास आले होते. तेथें त्यांनीं असा करार करून घेतला कीं, तुम्ही यात्रा करून देशी परत जाल तेव्हां या वाटेनें येऊन पुनः भेट दिल्याशिवाय जाऊं नये, तें आम्हीही कबूल केलें. नंतर मांडवगणे परत गेले व आम्ही दोघांनीं काल्पीचा रस्ता धरला.

---

## ६ : : : काल्पी—प्रकरण

मा धाव मा धाव विनैव दैवं । श्वा धावमानो लभते न लक्ष्मीम् ॥

काल्पीचा रस्ता धरल्यानंतर मजल दरमजल जातां जातां एके दिवशीं सायंकाळीं एका खेडे वस्तीस येऊन पोंचलों. तेथून काल्पी सुमारें सहा कोस राहिली होती. गांवाबाहेर चिंचेची झाडी आहे, तेथें स्वयंपाक तयार करून भोजनें झाल्यावर स्वस्थ निद्रा केली. पहाटेच्या प्रहर रात्रींच्या सुमारास, एकाएकीं मोठा गलका झाला. त्यासरसें उठून पाहतों तो शेंकडों स्वार रस्त्यानें उधळत चालले आहेत, असें दृष्टीस पडलें. हें काय अरिष्ट झालें आहे याची कल्पना होईना. आम्हीही तसेंच घाइघाईनें आपलें सामान गुंडाळून, खाकोटीस मारून शिपाई लोकांच्या बरोबर पळ काढूं लागलों. कांहीं वेळानें असें समजलें कीं, पेशव्यांची व इंग्रजांची चरखारीवर लढाई होऊन, त्यांत पेशव्यांचा मोड झाला. त्यांत झांशीवाली राणी ही होती. ती फौज परत काल्पीवर चालली आहे. मग आम्ही किंचित् स्वस्थ होऊन झुंजुमुंजूचे सुमारास एका विहिरीवर पाणी काढून शौचमुखमार्जन करण्यास बसलों, तों पांचचार स्वार विहिरीवरून जात होते. त्यांत झांशीवाली दृष्टीस पडली. तिनें सर्व पठाणी पोषाक केला होता, व सर्व अंग धुळीनें भरलें होतें, तोंड किंचित् आरक्त असून म्लान व उदास दिसत होतें. तिला तृषा फार लागली असल्यामुळें घोड्यावरूनच आम्हास तिनें तुम्ही कोण आहां, असा प्रश्न केला. तेव्हां आम्ही पुढें होऊन हात जोडून विनंति केली कीं, आम्ही ब्राह्मण आहों. आपणास तृषा लागली असल्यास पाणी काढून देतों. बाईसाहेबांस ओळख पटली व खालीं उतरल्या. मी रसी व मडकें घेऊन लागलीच विहिरींत सोडणार, तों बाईसाहेब म्हणाल्या कीं, तुम्ही विद्वान् ब्राह्मण, तुम्ही मजकरितां पाणी काढूं नका. मीच काढून घेतें. हे तिचे उदारपणाचे शब्द ऐकून मला फार वाईट वाटलें परंतु निरुपायास्तव रसी व मडकें खालीं ठेवलें. बाईसाहेबांनीं पाणी काढून, त्या मृण्मय पात्रांतून ओंजळीनें पाणी पिऊन तृषा हरण केली. दैवगति मोठी विचित्र आहे. नंतर मोठया निराश मुद्रेनें बोलल्या कीं, मी अर्धा शेर तांदुळाची धनीन,

मजला रांडमुंडेस विधवाधर्म सोडून हा उद्योग करण्याची कांहीं जरूर नव्हती. परंतु हिंदुधर्माचा अभिमान धरून या कर्मास प्रवृत्त झालें, व याजकरितां वित्ताची, जीविताची सर्वांची आशा सोडली. आमच्या पदरीं पातकच फार म्हणून आम्हास ईश्वर यश देत नाहीं. चरखारीवर मोठी लढाई झाली. परंतु आम्हास यश आलें नाहीं. काल्पीवरहि इंग्रज चालून येत आहे, तेथें थोडक्यांतच जंग होईल; जें अदृष्टांत लिहिलें असेल तें होईल. असें म्हणून बाईसाहेब उठल्या. आम्हीहि उभे राहिलों. बाईसाहेब घोड्यावर बसल्या. इतक्यांत आठवण होऊन आम्हास विचारलें कीं, तुम्ही गरीब भिक्षुक ब्राह्मण, तुम्हास घोड्यावरहि बसतां येत नाहीं. काल्पीस काय हेतु धरून जात आहां ? असा प्रश्न करितांच आम्ही सांगितलें कीं, काल्पीस दक्षिणी ब्राह्मण पुष्कळ आहेत, त्यांजपासून दक्षिणा मिळेल ती मिळवून, यमुना उतरून गंगास्नानार्थ ब्रह्मावर्त क्षेत्रीं जाणार आहों. 'बरे आहे, तुम्ही काल्पीस गुदामांत यावें,' असें म्हणून बाईसाहेब चालत्या झाल्या.

आम्हीहि हळूहळू निघून नऊ वाजण्याच्या सुमारास काल्पीस जाऊन पोंचलों. आतां कोठें जावें, याचा विचार करीत एका झाडाखालीं बसलों. इतक्यांत काकांच्या परिचयाचा एक ब्रह्मावर्ताकडील ब्राह्मण सहज बाजारांत जाण्याकरितां निघाला होता, तो दृष्टीस पडला. त्याची आमची भेट होतांच त्यानें आम्हास दक्षिणी लोकांसाठीं एक मोठा विस्तीर्ण मंडप स्नान, संध्या, भोजनाकरितां यमुनाकांठीं घातला होता, तेथें नेऊन पोंचविलें. नंतर आम्ही स्नानसंध्या करून भोजन आटपून शहर पाहण्यास निघालों.

काल्पी हें लहानसें टुमदार शहर यमुनाकांठीं आहे. यमुना उत्तरदक्षिण वहात असून पश्चिमकिनाऱ्यावर काल्पीचा किल्ला बांधलेला आहे. त्यास तीनहि अंगांनीं मोठा मजबूत कोट आहे व चवथ्या बाजूस यमुना फार खोल आहे, याजमुळें हा किल्ला फार शोभिवंत असून तसाच बळकट आहे. किल्ल्याच्या पश्चिमेस मैदान टाकून पलीकडे शहर वसलें आहे. तेथें साखरेचा व्यापार फार मोठा चालत असल्यामुळें, मोठमोठ्या धनिक व्यापाऱ्यांच्या हवेल्या शहरांत लागून गेल्या आहेत. व रस्तेहि चांगले रुंद आहेत. यमुना फार खोल असल्यामुळें शहरांत विहिरीहि फार खोल आहेत. शहराच्या पश्चिमेस मोठें विस्तीर्ण लढाईस योग्य असें एक दुसरे मैदान आहे. त्यास चौऱ्याऐशी घुमटांचें मैदान म्हणतात. तेथें

पूर्वी बादशाहींत एक मोठी लढाई झाली होती. बादशहाचा जय झाल्यावर मोठमोठे चौऱ्यायशी सरदार रणांत पडले होते, त्यांस तेथें तेथें पुरून त्यांजवर चुनेगची मजबूत व सुंदर कबरी बांधल्या आहेत. त्या कबरस्थानांच्या उंच घुमटांनीं तें मैदान फार शोभिवंत दिसतें.

याप्रमाणें सायंकाळपर्यंत काल्पी शहर पाहिल्यावर दुसऱ्या दिवशीं तेथें पुष्कळ दक्षिणी ब्राह्मण होते, त्यांजपासून दक्षिणा मिळवून काल्पींतून निघून यमुना पार जाण्याच्या विचारास लागलों. तेव्हां लोक सांगूं लागले कीं, इंग्रज सरकारचे लोक फार नजीक आले आहेत व एकदोन दिवसांत काल्पीवर लढाई होईल. काळे लोक शहर आंत घेऊन बाहेरून सारखे मोरचे बांधून लढाईस तयार होऊन राहिले आहेत. यमुना उतरून पलीकडे जाण्यास रस्ता नाहीं. पलीकडे इंग्रजांचा पक्का बंदोबस्त आहे. या हकीकती ऐकून आम्हास भीति पडली. एका मृत्यूमुखांतून निघून पैशाच्या लोभानें दुसऱ्यांत येऊन पडलों असें वाटूं लागलें. शेवटीं झांशीवाली बाईसाहेबांस भेटून कांहीं तरणोपाय शोधावा, असा निश्चय करून बाईसाहेबांची भेट घेतली. त्यांनींहि असें सांगितलें कीं, बहुधा आजच रात्रीं लढाई येथें सुरू होईल. तुम्ही येथें रहाल तर व्यर्थ प्राणसंकटांत पडाल. यमुनापार इंग्रजांचा पक्का बंदोबस्त आहे खरा; परंतु येथून उत्तरेस चार कोसांवर आपले लोक यमुनेचा घाट धरून राहिले आहेत. तेथें आतांच्या आतां निघून जावें; व आमची खूण सांगून नदी उतरून मोठा रस्ता न धरितां आडरस्त्यानें ब्रह्मावर्तास जावें. असें म्हणून आम्हास वाटखर्चास कांहीं रुपये दिले. बाईसाहेबांचा आम्हावर फार लोभ होता. त्यांचे अति उपकार मानून, दिलेले रुपये घेऊन बिऱ्हाडीं आलों व निघण्याच्या तयारीस लागलों. पहाटेच्या सुमारास निघणार तों अगोदर मध्यरात्रीच्या सुमारास तोफा, बंदुका, कारमिनी वगैरे मृत्युयंत्रांचे शतावधि आवाज होऊं लागले. तेव्हां आम्ही ठिकच्याठिकाणीं जागे होऊन भीतीनें विरघळून गेलों, व निरुपाय झाल्यामुळें काल्पींसच राहिलों.

काल्पीवर तीन दिवस लढाई चालली होती. पेशव्यांकडील फौज पुष्कळ प्रकारें लढाईच्या कामास निरुपयोगी झाली होती. इंग्रजांच्या दिल्ली, लखनौ, झांशी वगैरे ठिकठिकाणीं जय होऊन बंडांतील लोक बहुतेक निराश झाले होते. यामुळें पुष्कळ जुने माहितगार पलटणीं लोक, जिवाच्या भीतीनें पलटणी सोडून आपले घरीं

ठिकठिकाणीं प्रसिद्ध झालेल्या जाहीरनाम्यास भुलून, वेषांतर करून जाऊन राहिले, व दुसरे उद्योग करूं लागले. नवीन लोक ठेविले ते नवशिके असल्यामुळें त्यांस कवाईत चांगली येत नसून, टिकाऊ नव्हते. इतकेंच नव्हे, परंतु चांगले व दमदार लोक बंडांत मिळण्यास नाखूष असल्यामुळें, नवीन लोकांत बहुतकरून चोरटे, लुच्चे, लुटारू लोकच भरले असत. त्यांचें लक्ष लढाईवर फारसें नसून लुटीवरच असे. तिसरे दिवशीं इंग्रजांचा जय होऊन पेशव्यांचा मोड होणार असा रंग दिसतांच शेंकडों शिपाई लढाईचा उद्योग सोडून शहरांत शिरलें, व त्यांनीं लूट, दंगा, अनीति यांचा रस्ता पकडला, व चांगल्या संभावित श्रीमान् लोकांची घरें फोडून लुटीस आरंभ केला. साखरेच्या गोण्या, पोतीं रस्त्यावर ओढून टाकल्या, व अनाथ स्त्रियांची दुर्दशा केली. याप्रमाणें कांहींसे शहर लुटलें गेलें नाहीं तों इंग्रजांनीं मोरचे जिंकून शहरांत शिरकाव केला. काळे शिपाई ज्यांस जिकडे वाट फुटेल तिकडे पळून गेलें, शेंकडों मरण पावलें. तात्या टोपी, रावसाहेब व झांशीवालीबाई यांनीं रंग फिरलेला पाहतांच पळ काढून पूर्वींच अरण्याचा रस्ता धरिला होता.

आम्हींही लढाईंत पराभव झाला असें समजतांच जिवाच्या भीतीनें व्याकूळ होऊन कांहीं दक्षिणी ब्राह्मण पळत सुटले होते त्यांचे बरोबर पळ काढूं लागलों. परंतु त्या वेळेची त्या शहराची दीनावस्था पाहून आम्हांस आमचे दुःखाचा व भीतीचा क्षणभर विसर पडला सर्व रस्त्यावर काल्पीची साखर पसरली होती. ठिकठिकाणीं सावकार लोकांस शिपाई लोक मारहाण करून द्रव्य उपटीत होते. बहुतेक रहिवाशीं आतां इंग्रज आमचें काय करितो या धास्तीनें होरपळून जाऊन दीन दिसत होते. कोठें कोठें गांवचेच लुच्चे, अन्यायी व दांडगे लोकही लुटींत मिसळून आपला कार्यभाग साधीत होते. कोठे स्त्रियांची विटंबना होतांना नजरेस पडली. या प्रमाणें शहराची हवालदिल स्थिति पाहून आमचें दुःख दुणावलें व आम्हीं आडवाटेनें होईल तितकें जलदीनें शहराच्या बाहेर पडलों व बाईसाहेबांनीं सांगितलेल्या घाटाचा रस्ता धरिला. तेथें येऊन पोचलों तों नावाडी लोकांस अगोदरच बातमी समजून ते पळून गेले होते. तेव्हां निरुपाय होऊन भीतीनें अगदीं वेडावून गेलों. इतक्यांत एक सरदार तेथें आला, त्याचे फार फार आर्जव करून नावाडी बोलावून आम्हीं यमुना उतरून अंतर्वेदीत शिरलों.

यमुनेच्या पलीकडच्या तटावर पाय ठेवतांच जिवांत जीव येऊन अत्यानंद झाला, व कुळस्वामिणीचा व परमेश्वराचा स्तव करून आडरस्त्यानें मार्ग आक्रमिण्यास आरंभ केला. ते दिवस उन्हाळ्याचे असल्यामुळें वाटेनें फार हाल होत. एके दिवशीं प्रखर तापानें तप्त होऊन आराम करण्यासाठीं एका वृक्षाखालीं बसलों आहों तों पांचचार रांगडे चोर आम्हापुढें उभे राहिले. व आम्हास धमकी देऊन आमच्या जवळचा ऐवज मागूं लागले तेव्हां आम्हीं मोठ्या काकुळतीनें त्यास सांगितलें कीं, आम्ही गरीब यात्रेकरी ब्राह्मण आहों, आमचे जवळ अर्थ नाहीं. परंतु आह्मांस फत्तेपुरास पोंचविल्यास आह्मांवर फार उपकार होतील, असें म्हणतांच त्यांनीं आह्मास धरून आमचे जवळील सर्व काढून घेऊन उलटे खर्चाकरितां पांच रुपये आह्मास दिले. ही चोरी झाल्यावर आमचें मन फारच निराश झालें, झांशीहून तापल्या तेलांतून बाहेर पडलों, परंतु पुन्हा द्रव्यार्चनाकरितां जीव धोक्यांत घालून काल्पीस गेलों. कांहीं द्रव्य मिळवून तेथून केवळ मृत्युमुखांतून सुटलों, तोंच येथें या दुष्टांनीं एका क्षणांत आम्हास पुन्हां निर्द्रव्य करून सोडावें ना! असा भत्यंत ताप झाला. परंतु शेवटीं, सरोम्भश्चातकेनात्तं गलरंध्रेण गच्छति ॥ इत्यादि सुभाषितांची आठवण होऊन मनाचें समाधान केलें.

असो. दैवावर भरंवसा ठेवून पुढें चालूं लागलों. आडरस्त्यांनी जातां जातां कांहीं दिवसांनीं ब्रह्मावर्ता गसून तीन कोसांवर खिरागडेश्वर [ क्षीरगर्तेश्वर ] म्हणून सांबशिवलिंग आहे, तेथें येऊन पोंचलों. देवाचें दर्शन घेऊन तसेंच पुढें जाऊं लागलों. त्या दिवशीं सकाळपासून मनास कांहीं विलक्षण प्रकारचा आनंद व उत्साह वाटत होता. ज्या स्वर्गंगेला भगीरथानें भगीरथ प्रयत्न करून अनंत तपांचे प्रभावानें पृथ्वीवर आणलें, जिच्या पावनोदकाचा स्पर्श झाल्यानें सर्व पातकांचा नाश तात्काल होतो, जिच्या सुरम्य पात्रांचीं मनोहर वर्णनें वाल्मिक, व्यास, जगन्नाथ इत्यादिकांच्या काव्यांत भरली आहेत, अशा त्या श्रीभगीरथी देवीचें दर्शन होऊन उदकाचें स्नानपान होणार हें मनांत येऊन मनाची फार चंचळ स्थिती होऊन गेली होती व त्या पर्वकाळाचा महिमा मनांत आणून, सकाळपासून उपोषण केलें होतें. सायंकाळीं चार वाजावयाचे सुमारास ब्रह्मावर्ताजवळ जाऊन पोंचलों. क्षेत्राकडे न जातां प्रथम गंगेवर गेलों; श्रीगंगेचें दर्शन होतांच अत्यानंद होऊन नमस्कार घातला नंतर यथेच्छ निर्मळपणें स्नान करून, आजपर्यंतच्या

भोगलेल्या सर्व दुःखांचें व क्लेशाचें सार्थक्य होऊन, आम्हीं जन्मजन्मांतरीच्या यातकापासून मुक्त झालों असें वाटलें.

ब्रह्मावर्त क्षेत्रीं भागीरथीचें पात्र फारच मनोहर आहे. तें सुमारें दीड मैल रुंद असून, मूळ नदीच्या धारेचा प्रवाह मधल्या अर्ध्या मैलांतून वाहत आहे. अयोध्येकडील तटाक सखल असल्यामुळें पाणी लांबवर पसरलें आहे. परंतु अंतरवेदीचा कांठ ऊंच असून, त्यास ठिकठिकाणीं मोठे चंद्रकार धस आहेत. त्यातून गंगेचे स्वच्छ शुभ्र उदक इतकें शांत व गंभीर वाहत असतें कीं, ब्रह्मवर्ताकडील कांठ शेंकडों लहान लहान रम्य सरोवरांचा बनला आहे कीं, काय असा भास होतो. याजमुळें नदीचे सर्व गुण, व सुंदर देखावा, व सरोवरांत असणाऱ्या सर्व रमणीय पदार्थांची शोभा, एके ठिकाणीं मिश्र झाली आहे. ठिकठिकाणीं पांढरीं, निळीं, तांबडीं, कमळें प्रफुलित होऊन पाण्याच्या बाहेर आलेलीं फार मनोहर दिसतात. किनाऱ्यावर कूश, काश, दर्भ, वेतस वगैरे ब्रह्मकर्मोपयोगी तृणांची समृद्धि आहे. सरोवराच्या पाण्यांतून असणाऱ्या निरनिराळ्या प्रकारच्या वेलींची पानें बाहेर पडलेलीं दिसतात. पाणी नेहमीं वाहत असल्यामुळें नदीच्या पाण्यासारखें फार स्वच्छ आहे, व शांत असल्यामुळें त्यांत सरोवराप्रमाणें मासे मोठ्या आनंदानें नेहमीं खेळत असतात. याचमुळें जागोजागीं बगळयाच्या शुभ्र पंक्ति, मोगऱ्याच्या कळीच्या गजऱ्याप्रमाणें शोभिवंत दृष्टीस पडतात. कांठावर मोठमोठाले जुने वृक्ष हजारों लागून गेले आहेत, ठिकठिकाणीं सुरम्य उंच देवालयांचीं शृंगें, त्यांतून बाहेर पडलेलीं दृष्टीस पडतात. कलियुगाच्या प्रारंभापासून, अनेक राजांनीं नाना प्रकारचे घाट बांधलेले आहेत. ते फार मजबूत व गुळगुळीत आहेत. त्याजवरुन शेंकडों स्त्रीपुरुषें ऋषिकर्मांत निमग्न झालेली दृष्टीस पडतात. सारांश भागीरथीच्या पात्राचा सुंदर देखावा पाहतांच व तिच्या पावन, स्वच्छ, शुभ्र उदकांत स्नान करितांच व तिच्या ठिकाणीं ओतप्रत भरून राहिलेल्या ऋषिधर्मानुकूल वस्तूंचा उत्कर्ष मनांत येतांच, कांहीं विलक्षण आनंद होऊन विस्मय वाटला. फार काय वर्णन करावें, "त्वत्तीरे वसतः त्वदंबु पिबतः त्वद्वीचिषु प्रेंखतः। त्वन्नाम स्मरतः त्वदर्पितदृशः स्यान्मे शरीरव्ययः।" अशी मनाची स्थिति होते, यांत कांहीं अतिशयोक्ति नाहीं.

असो. स्नान झाल्यावर किंचित् फलहार केला व रात्रभर गंगातीरीच राहण्याचा

निश्चय करून, तेथें एका देवालयांत निद्रा केली. पहाटेस उठून चालूं लागलों, ते सकाळीं आठ वाजावयाचे सुमारास श्रीक्षेत्र ब्रह्मावर्त येथें येऊन पोंचलों. व शोध करून वेदशास्त्रसंपन्न रा. बावा कर्वे यांचे वाड्यांत मामासाहेब बाकनीस यांचे घरीं उतरलों. नंतर तीर्थविधि करून क्षेत्रसंबंधीं श्राद्धादि कृत्यें आटोपलीं. तेथें झालेला सर्व वृत्तांत लोकांनीं सांगितला. तो पूर्वींचे भागांत लिहिला आहे. सर्व क्षेत्र भूतेश्वरापासून ध्रुवघाटापर्यंत पाहिलें. इतक्यात चित्रकूट येथें श्रीमंत नारायणराव पेशवे व माधवराव पेशवे, यांनीं कांहीं अनुष्ठानें सुरू केली आहेत. त्यांत दक्षिणा मिळविण्याकरितां कांहीं ब्रह्मावर्ताकडील ब्राह्मण निघणार आहेत अशी बातमी लागली. या अनुष्ठानांत आपणही कांहीं प्राप्त करून घ्यावें, म्हणजे आपल्याजवळ काशीयात्रेच्या खर्चापुरता पैसा होईल, व आपले यजमान राजेश्री हरीपंत तात्या भाव्ये वर्सईकर, बहुत दिवसांचे श्रीमंताचे नोकर आहेत त्यांचीही भेट होईल असें मनांत आणून चित्रकूटास जाण्याचा निश्चय केला; व जाणारे मंडळींचा शोध लावून त्यांजबरोबर निघालों. वाटेनें मजल दर मजल जात असतां एका मुक्कामावर मजला सरदगर्मीचा विकार होऊन अतिज्वर आला तेणेंकरून वमन व रेचहि बरेच झाले. ब्रह्मावर्ताकडील मंडळी तीं. काकांच्या पक्कीं परिचयाची असल्यामुळें, त्यांनीं तेथेंच दोन दिवस मुक्काम केला. नंतर मला बरें वाटून आम्ही पुन्हां चालूं लागलों. चित्रकूटास येऊन हरीपंत भाव्ये याचे घरीं उतरलो. राजेश्री हरीपंत हे तीर्थस्वरूप काकांचे परिचयाचे होते, त्यांचे वय सुमारें पंच्याऐशी वर्षांचें होतें, परंतु सर्व शरीर स्वाधीन होतें. त्यांची स्त्री मरण पावली होती. पुत्र, कन्या मुळींच झालीं नव्हतीं, सबब एक दत्तक पुत्र घेतल्यावर त्याचें लग्न केलें. तोही पांच चार वर्षांनीं मरण पावल्यावर त्याची बायको व ते अशी दोघेंच होतीं. पुढें हरीपंत यांनीं वरसईस पत्र पाठवून, आपले सख्खे बंधूचा पुत्र काशीनाथराव हा दत्तक घेण्याकरितां चित्रकूटास आणिला होता, त्यास येऊन तीन वर्षें झालीं होतीं. दत्तविधान झालें नव्हतें. तो त्यांजपाशीं वरसईहून आल्यावर मागें त्यांचे तीर्थरूप मोरोपंत भावे यास देवाज्ञा झाली. ही बातमी त्यास दंग्याचे दिवस असल्यामुळें व डाका वगैरे सुरळीत चालत नव्हत्या, याजमुळें समजली नव्हती. मोरोपंतास अश्विन वद्य ९ स देवाज्ञा झाली ही खबर आम्हांस शिंद्यांचें लष्करांत समजली होती. पुढें सर्वांच्या भेटी होऊन आम्हांस व त्यांस आनंद झाला. परस्पर कुशल वृत्तें कळवितां हेंहि वर्तमान आम्हीं सांगितलें. मग पयोष्णी

गंगेवर काशीनाथ यास नेऊन क्षौरादि कृत्य करविलें. और्ध्वदैहिक कृत्य आटोपल्यावर आम्हीं चित्रकूटाजवळील कांहीं यात्रा केल्या. रामायणांतील प्रसिद्ध चित्रकूट पर्वतावर कामथनाथाचे यात्रेस गेलों. पयोष्णी गंगा शहराचे निकट भागीं पश्चिमेस वहात आहे, ती उतरून राघोप्रयागीं स्नानें करून कामथानाथाचें दर्शन घेऊन पर्वतप्रदक्षिणेस गेलों, तेथें त्या पर्वतावर वानरें व माकडे हजारों आहेत. यामुळें भाजलेले चणे बरोबर घ्यावे लागतात. त्यांच्या हद्दीं वांटलेल्या आहेत. हद्दीपर्यंत माकडें व वानरें यात्रेकरू लोकांबरोबर येतात, व त्यांस चणे, फुटाणे द्यावे लागतात. या पर्वतावर कोणी चढूं नये, असा शाप दिला आहे, व त्या पर्वतावर श्रीराम व सीता एकान्तांत असतात, यामुळें तेथें कोणी जात नाहीं. लक्ष्मणही त्या पर्वतावर गेले नाहींत. जवळच एक दुसरा पर्वत आहे, त्याजवर फक्त लक्ष्मण राहतात, तेथेंही आम्ही जाऊन यात्रा करून आलों. त्या पर्वतावर पारिजातकाचे वृक्ष फार आहेत. तिकडील लोक पारिजातकाच्या काठ्यांनीं घराचीं ओमणें करून वर कवलें लावितात. पयोष्णी गंगेंत रोज स्नान केलें असतां, तीरीं वचनागाचे वृक्ष फार असून त्याचे मुळांतून पाणी येत असल्यामुळें, अंगास कंडू उत्पन्न होतो.

असो. यात्रा करून परत चित्रकूट शहरांत आलों. राजश्री हरीपंत तात्यांनीं आम्हास असें सांगितलें कीं, वेदमूर्ति राजश्री चिमणभट्ट यास तुमचेबद्दल सांगितलें आहे, तर तुम्हीं त्यांना जाऊन भेटावें म्हणजे तूर्त नित्य दानें देतील, व पुढें अनुष्ठानेंही लावितील. असें हरीपंतांनीं सांगितल्यावरून त्याच दिवशीं सायंकाळीं आम्ही चिमणभट्टजीस जाऊन भेटलों. तेव्हां त्यांनीं तुमची अनुष्ठानाकडे एक महिन्याची योजना केली आहे, तर तुम्ही उदईक सकाळीं आठ वाजतां यावें असें आम्हांस सांगितलें. परंतु घराहून निघाल्यापासून आमचें दैव फिरलेंच होतें. आम्हास पैसे मिळणार कोणीकडून? अनुष्ठान सुरूं होण्यापूर्वींच शहरांत बखेडा उत्पन्न होऊन सर्व गोष्टी जागच्याजागीं राहिल्या.

श्रीमंत नारायणराव व माधवराव पेशवे हे इंग्रजांशीं बिघडले नव्हते; परंतु त्यांचा दिवाण राधाकिसन म्हणून परदेशी होता तो बिघडला होता. प्रथम जेव्हां इंग्रजसरकारावर गहजब गुदरला तेव्हां तेथील कलेक्टर वगैरे साहेबलोकांनीं चित्रकुटाखालचा २५ लक्षाचा मुलूख व डंघाईचा मुलूख श्रीमंत नारायणराव

पेशवे यांचे स्वाधीन करून दप्तर स्वाधीन केलें, व आपण जीवभयास्तव पळून गेले. मुलूख स्वाधीन झाल्यावर दिवाणजीनें बंदोवस्ताकरितां म्हणून नवीन शिपाई ठेविले. बिघडलेल्या पलटणांस आश्रय दिला व दारूगोळा, तोफा वगैरे सामान तयार करण्याचा कारखाना सुरू केला. परंतु नारायणराव पेशवे यांचे मनांत कोणतेही प्रकारचा किंतू आला नव्हता. इत्यादि हकीगती आम्हास चित्रकूटास आल्यावर समजल्या होत्या. आम्ही अनुष्ठानाचें आमंत्रण घेऊन घरीं आलों तों अशी बातमी समजली कीं, कपतानसाहेब *बरोबर दोन पलटणी घेऊन पयोष्णी गंगेपलीकडे दोन कोसांवर येऊन उतरला आहे. साहेबानें स्वाराबरोबर एक पत्र पाठवून श्रीमंतास कळविलें कीं, आम्हास तुमचे भेटीचें प्रयोजन असल्यामुळें तुम्हीं उदईक सायंकाळपर्यंत उभयतां बंधु दिवाणजीस बरोबर घेऊन आमचे गोटांत येऊन भेटावें. बरोबर हत्यार किंवा शिपाई आणूं नये. श्रीमंतांचे मनांत स्वतांविषयीं कोणत्याही प्रकारचा संशय नसल्यामुळें आपण निर्दोषी आहों असें पूर्ण जाणून व इंग्रजांचे न्यायावर भरंवसा ठेवून श्रीमंतांनींही लागलीच त्याच पत्रावर उदईक येऊन भेटतों असा शेरा लिहून पत्र परत पाठवून दिलें. तत्रापि या भेटीपासून काय होतें याची काळजी लागल्यामुळें उभयतां बंधूंस सर्व रात्र झोंप आली नाहीं. ही बातमी शहरांत पसरतांच शहरचे लोक अगदीं तजा-वजा होऊन गेले. जिकडे तिकडे याच गोष्टीं चालूं होऊन हालचाल होऊन राहिली. कित्येक लोकांचे अभिप्रायांत श्रीमंतांनीं जऊं नये, गेल्यास व्यर्थ कैदेंत पडून कदाचित् प्राणासही मुकतील व सर्व शहर लुटलें जाईल असें होतें. कित्येक श्रीमंत निर्दोषी आहेत व खरे रीतीनें वागल्यास त्यास भय नाहीं, असेंही म्हणत होतें. रात्रौ बारा घटकाचे सुमारास परदेशी दिवाणजी श्रीमंतांस भेटून न जाण्याबद्दल अनेक प्रकारचा उपदेश करूं लागला. "उदईक तुम्हीं जाऊं नये हेंच फार चांगलें आहे. गेल्यास मूठभर दारू खर्च न होतां इंग्रजांचा मनोदय साध्य होऊन तुम्ही कदाचित् प्राणास मुकाल; तुमची जिंदगी सर्व लुटली जाईल. याजपेक्षां आपल्यापाशीं दारूगोळा आहे, लढवय्यी लोक आहेत; आपण येथेंच राहून जंग करूं, यांत लौकिक आहे. मनुष्यास कधींतरी मरणें आहेच, परंतु रांडमरणानें मरून जाणें हें तुमच्या शूर कुलास उचित नाहीं, अशीं अनेक प्रकारचीं शूरत्वाचीं भाषणें करून

* जनरल व्हिटलॉक ६ जून १८५८ रोजीं चित्रकूटास आला. मालीसन.

पेशव्यांचें मन वळविण्याचा यत्न केला. परंतु त्यांजवर त्यांचा कांहीं ठसा पडला नाहीं. शेवटीं राधाकिसन परदेशानें कळविलें कीं, आम्ही तर तुमच्याबरोबर येत नाहीं. आतांच आम्ही येथून दारुगोळा, तोफा, फौज वगैरे घेऊन जिकडे वाट फुटेल तिकडे निघून जाणार. परंतु तुम्हीं आम्हास खर्चाकरितां दोन लक्ष रुपये दिले पाहिजेत. न दिल्यास आम्ही जबरदस्तीनें घेऊन जाऊं. हें ऐकतांच श्रीमंतांनीं विचार केला कीं, हा मनुष्य जिवावर उदार झाला आहे, त्यांजला आपण खुशीनें रुपये न दिले तर वाड्याबाहेर फौज आणली आहे, ती सर्व लुटून फस्त करून टाकील. याजकरितां सामोपचारानें रुपये द्यावे हें बरें. असा विचार करून रुपये तेव्हांच दिले. ते रुपये घेऊन दिवाणवाड्यांतून बाहेर पडून सर्व फौज बरोबर घेऊन मध्यरात्रीस जंगलांत निघून गेला. दहा बारा कोसांवर पहाडी किल्ला बंदोबस्ताचा होता त्याचा आश्रय करून राहिला. इकडे श्रीमंतांनीं ज्योतिषी बुवास बोलावून आणून त्यास असें विचारलें कीं, उदईक सायंकाळपर्यंत आम्हास साहेबाचे भेटीस जाण्यास मुहूर्त केव्हां आहे तो सांगावा. तेव्हां जोशीबुवानें मुहूर्त उजाडतां साडेपांच वाजतां लग्नशुद्धी बरी आहे, बाकी दिवस उद्यांचा चांगला नाहीं, मर्जीस येईल तसें करावें. असें सांगितल्यावरून नारायणराव व माधवराव साहेबांनीं साडेपांच वाजतां जावें असा निश्चय केला.

आम्ही हरीपंत भावे यांचे माडीवर निजलों होतों. तेथें पाहटेच्या सुमारास जागे होऊन गोष्टी बोलत बसलों आहों, इतक्यांत स्वारांच्या घोड्यांच्या टापांचा टप-टप आवाज कानीं पडतांच धामधूम काय आहे हें पाहण्याकरितां रस्त्याकडील खिडक्या उघडून पाहतों तों श्रीमंतांची स्वारी साहेबांकडे जाण्यास निघाली आहे, असें दृष्टीस पडलें. बरोबर शिबंदीचे लोक सुमारे दोनशें बिनहत्यार होते. खुद्द श्रीमंत माधवराव व नारायणराव मेण्यांत बसले असून पुढें भालदार पुकारत होते. उजेडाकरितां शेंकडों मशाली पेटविल्या होत्या. त्या बिनहत्यार स्वारांचा थाट पाहतांच आम्हास झांशीवालीबाई किल्ल्याबाहेर पडून शत्रूचा घेर फोडण्याकरितां निघाली त्या वेळचें स्मरण होऊन फार वाईट वाटलें, व हे लोक केवळ अपमान व दुःख पदरीं घेण्याकरितां जात आहेत असें वाटूं लागलें. स्वारी झरझर चालून उजेडताचे सुमारास पयोष्णीचे पार गेली. स्वारी साहेबांचे तबूपाशीं येऊन पोंचली तों सहा घटका दिवस आला.

पुढें जाणार इतक्यांत साहेबांकडील स्वार येऊन त्यानें असें कळविलें कीं, सर्व लोकांनीं येथें राहून फक्त नारायणराव व माधवराव साहेबांनीं मेण्यांतून उतरून पायींच भेटीस यावें. बरोबर एकहि मनुष्य घेऊं नये. त्या समयीं श्रीमंतास अति दुःख झालें, परंतु येथवर आल्यावर दुसरे गत्यंतर नाहीं व आपण निर्दोषी आहोंत असें मनांत आणून निरुपायास्तव मेण्यांतून खालीं उतरले. व बरोबर एकहि मनुष्य न घेतां तंबूकडे निघाले. श्रीमंत लोकांबरोबर छत्री धरण्याकरितां एक मनुष्य असतो परंतु तोहि बरोबर घेऊं दिला नाहीं. दिवस ऐन ग्रीष्म ऋतूचे असल्यामुळें सूर्याचा प्रखर ताप सुरू झाला होता. श्रीमंतांस उन्हांत जाण्याचा कधींहि प्रसंग नसल्यामुळें व चित्तवृत्तीचा क्षोभ झाला असल्या कारणानें त्यांची मुखकमलें आरक्त होऊन गेलीं, डोळे लाल झाले श्रीमंत तंबू-समोर येऊन पोंचले तेव्हां साहेब खाना खात बसला होता. व पुढेंहि चार घटका श्रीमंतांची दाद घेतली नाहीं. त्याजमुळें भर दोनप्रहरच्या उन्हांत तंबू-समोर छत्रीशिवाय श्रीमंतांस उभे रहावें लागलें. त्यांस बसावयास कोणी खुर्चीहि आणून दिली नाहीं. त्यांची अशी दीनवस्था पाहून त्याचे लोक दूर उभे होते, त्यांस अति त्वेष येऊन त्वेषानें त्यांचे डोळयांस अश्रु येऊं लागले. परंतु त्यांचा कोणत्याहि प्रकारचा इलाज चालेना. या शरीराच्या व अपमानाच्या तापामुळें श्रीमंतांस दे माय धरणी ठाय झालें. जीव कासावीस होऊन सर्वांगास घाम सुटला अति क्षुधा व तृषा उत्पन्न झाली, परंतु स्वीकारलेला मार्ग सोडणें गैर आहे असें समजून त्या सत्त्वशील पुरुषांनीं होणारा ताप गट्ट करून तसेच धीर धरून उभे राहिले. शेवटीं साहेब बाहेर येऊन एकदम तुम्हास सरकारचे हुकुमावरून कैद केलें आहे असें सांगितलें, व लागलीच गोरे शिपायांस भोंव-ताली गराडा घालण्यास हुकूम केला. याप्रमाणें नागव्या तरवारीचे पाहऱ्यांत ठेवि-ल्यावर जवळच एका झाडाखालीं श्रीमंतांचे मनुष्याकडून स्नान भोजनाची तयारी करविली, व तेथें त्यांस नेऊन गोरे शिपायांचे पहाऱ्यांतच दिवसाचा नित्य विधि त्यांचेकडून करविला.

दुसरे दिवशीं सकाळीं चार घटका दिवसास चित्रकूट शहरांत पांचसहाशें गोरे व कांहीं काळे लोक येऊन श्रीमंतांचे वाड्यांत शिरले. समोर दिल्लीदरवाज्यावर नगारखाना होता त्यावर चढून नौबदी, नगारे, शिंगें वगैरे सर्व बाहेर रस्त्यांत

धडाधड लोटुन दिलें. वाड्यांत जाऊन सर्व कामगार मनुष्यें बोलावून टीप करून कैद केली. तितक्यांत नारायणराव साहेबांची वायको जवळचे बंगल्यांत जाऊन माडीवर बसली. गोरे लोकांनीं सर्व जिंदगी गाड्यांत भरून गोटांत नेण्याचें काम सुरू केलें. लहान मोठीं भांडींकुंडीं सर्व भरून घेऊन जात होते. वाड्यापासून एक कोसपर्यंत एकसारख्या गाड्या वहात होत्या. सोनें, रूपें, जडाव, हिरे, मोती, माणिक, मोहरा, पुतळ्या वगैरे सर्व घेऊन गेले, खजिन्यांत कांहीं एक ठेविलें नाहीं. कापडाचीं दिंडें, सुटें कापड, बिछाने, सत्रंज्या, जाजमें, लोड, तक्के वगैरे सर्व फरासखाना लुटून नेला. त्यांत कांहीं ठेविलें नाहीं. हत्यारें, तरवारी, बंदुका वगैरे वाड्यांत कांहीं टेविलें नाहीं. दहीं, दूध, तूप, साखर, गूळ, तांदूळ, गहूं वगैरे सर्व कोठी लुटून घेऊन गेले. फार काय लिहूं! सुपे, टोपल्या, रोळया, चांगल्या लांकडी फळ्या, घोंगडी, कांवळे, चिंध्या सुद्धां वस्तुमात्र नेली. द्रोण, पत्रावळी देखील ठेविल्या नाहींत. नंतर नारायणरावांचे बायकोजवळ जाऊन अंगावरील दागिने मागितले. तिनें नथीखेरीज सर्व दागिने काढून दिले. ते घेऊन आपले या गांवांत कोणी आप्त असल्यास तेथें राहण्यास जावें, हा मेणा भोईसुद्धां तयार आहे असें सांगितल्यावरून बाईसाहेब ईश्वरस्मरण करून मेण्यांत बसून आपले माहेरचे आप्ताकडे निघून गेल्या. नंतर शिपायांनीं देवघरांत जाऊन देवांसहित सर्व उपकरणीं नेलीं. शिवाय पाट, चौक्या, चौरंग वगैरे जिंदगी गाड्यांत भरून तमाम गाड्या नेल्या. चित्रकूटवाल्यांपाशीं अर्थ बहुत असून व्यवस्थित सर्व जिनसा होत्या. एकंदर सोनें, मोती जवाहीर मिळून चार कोटीची मुख्य दौलत होती. याखेरीज भांडीं वगैरे; यापैकीं कांहींएक ठेविलें नाहीं.* असो. त्यांचे मनुष्यांपैकीं आचारी, पाणके, शिष्ये, हुजरे वगैरे विनहत्यारी शंभर मनुष्यें ठेऊन बाकी माणसांस रजा दिली. वाडयांत कारकून होते त्यांचाहि

---

* या लुटीविषयीं मालिसननें असें लिहिलें आहे "In the palace itself was stored the where-withal to compensate soldiers for many a hard fight. In its vaults and strong rooms were specie jewels and diamonds of priceless value" पान २०१ व्हा. ३. या लुटीवर हक्क कोणाचा आहे याजबद्दल सर ह्यूरोज व जनरल व्हीटलॉक या उभयतांत तंटा लागून हायकोर्ट ऑफ ॲडमिरल्टीनें व्हिटलॉकचे लोकांचा ह्या लुटीवर हक्क आहे असा निकाल दिला.

तपास करून सर्व कागदपत्रांचा थोडक्यांत हिशेब घेऊन त्यांनाहि रजा दिली.

इंग्रज सरकारनें दुसरें दिवशीं श्रीमंतांचे वाड्याभोंवतीं पूर्व पश्चिम, दक्षिण उत्तर, जितके वाडे होते, तितक्यांचे मालकांस हुकूम केला कीं, आठ दिवसांत तुम्हीं आपले वाडे पाडून टाकूस जागा मोकळीं करून द्यावी. नाहीं तर आम्हीं वाडे मोडून टाकूं. त्याप्रमाणें आठ दिवसांचे अंत वाड्याभोंवतीं मैदान करून टाकिले. दुसरे दिवशीं चित्रकूटावर बंदोबस्ताकरितां कांहीं फौज ठेवून कप्तानसाहेब, श्रीमंत नारायणराव व माधवराव यांस बरोबर घेऊन धुळपुकारचे मुलुखांत बांद्यांचे बंदोबस्ताकरितां निघून गेला.

चित्रकूटांत कोडों रुपयांचा ऐवज इंग्रजानें लुटला, त्यांत हरिकर्ण रविकर्ण म्हणून एक अति श्रीमान् बांद्याचा सावकार होता, त्याचा ठेव ठेविलेला अर्थ लुटला गेला. पूर्वीं हिंदुस्थानांत पेशव्यांनीं स्वारी केली त्या वेळेस जवळ पैशाचे पुरवठ्याकरतां एक सावकार घेण्याचें इच्छेनें श्रीमान् सावकारांचा शोध करूं लागले. तेव्हां हरिकर्ण रविकर्ण यानें असें सांगितलें कीं, हिंदुस्थानांत माझी हुंडी चालत नाहीं असें एकहि शहर नाहीं. असें सांगितल्यावरून त्या सावकारास पेशव्यांनीं हिंदुस्थानांतील स्वाऱ्याचे सोईकरतां आपलेबरोबर घेतलें. सावकारांनीं बांदे हें शहर चांगलें मनास आणून तेथेंच वाडा बांधला. त्यांचे पुत्रपौत्रहि त्याच नांवानें प्रसिद्ध असून फार मोठे सावकार होते. बांद्याचा नवाब जेव्हां बिघडला तेव्हां सावकारांनीं कदाचित् बांदे शहर लुटले जाईल, अशा धास्तीनें चित्रकूटाचें यजमान बिघडलें नाहींत व तो किल्लाहि चांगला मजबूद आहे, असें मनांत आणून चित्रकूटास अर्थ सुमार एक कोटीच्या मोहोरापुतळ्या पोंचवून श्रीमंतांचे खजिन्यांत ठेविल्या होत्या, व त्याच खजिन्यांत पोहे कुटणाऱ्यां अनेक विधवा स्त्रियांनीं सर्व जन्मभर कष्ट करून मिळविलेले शेंदोनशें रुपये पुरचुंडी बांधून निर्भय पहारेबंदीचा वाडा समजून ठेविले होते. परंतु सर्वांचे नशीव फुटकें असल्यामुळें सर्व अर्थ इंग्रज सरकारनें लुटला. आपला अर्थ सर्व लुटला असें समजतांच हरिकर्ण रविकर्ण यांनीं इंग्रज सरकारास असें कळविलें कीं, चित्रकूट येथील लुटींत आमचा अर्थ, आम्हीं बंड फितूर वगैरे किंचितही अपराधी नसून, व्यर्थ लुटला गेला आहे, आम्ही अर्थ ठेविल्याबद्दल जमाखर्चाचे कागद पत्र आपल्यास सर्व सांपडले आहेत. व आमचे अर्थाचे वतेल्यावर आमचे नांवाची

चिटी आहे. तो अर्थ आमचा आम्हांस परत देण्याविषयीं दयाळू होऊन सरकारनें हुकूम द्यावा. आमचा अर्थ एकदम नाहींसा झाल्यामुळें आमचे पेढीचे वगैरे सर्व काम अगदीं बंद पडण्याचा सुमार आला आहे. सबब अर्थ आम्हांस परत देणे नसल्यास सरकारकडे आमचे रुपये व्याजीं आहेत ते आमचे व्यापाराचे सोईकरितां आम्हांस एक महिन्यांचे आंत सव्याज परत द्यावे. असा अर्ज होतांच इंग्रज सरकारनें हरिकर्ण रविकर्ण याचा लुटींत घेतलेला अर्थ परत केला. ही बातमी चित्रकूटास समजतांच तेथील पोहे कांडणाऱ्या विधवांनीं आपला पैका मिळण्याविषयीं भडाभड अर्ज इंग्रज सरकारास केले; परंतु त्या बिचाऱ्यांची दाद कोठून लागणार! हरीकर्ण रविकर्ण इंग्रज सरकारचा धनको असल्यामुळें त्यांचा ऐवज त्यांस परत मिळाला. गरीब बिचाऱ्या विधवांचे अर्ज कचऱ्याचे पेटींत गेले.

याप्रमाणें मौजा ऐकत कांहीं दिवस चित्रकूटांत आमचे यजमान हरिपंत भावे यांचे घरी राहिलों. नंतर पुढें आतां काय करावें याचे विचारास लागलों. आम्ही चित्रकूटांत कांहीं द्रव्य मिळविलें, परंतु त्याचे वस्त्रपात्र वगैरे कांहींएक न घेतां रोख रुपये बरोबर घेतले व कांहीं मंडळी बांद्यास जाण्यास निघालीं होती त्याचे बरोबर बांद्यास कांहीं द्रव्य मिळविण्याकरितां जाण्याचा निश्चय करून निघालों.

बांदे शहरचा नवाब इंग्रजांशीं बिघडला होता. प्रथम बंड झाले त्या वेळेस कांहीं पलटणी धुलपुकारचे नवाबास मिळून त्यांनीं दंगा करून इंग्रजांचें फार नुकसान केलें होतें. पुढें इंग्रजफौज बांद्यास येऊन शहरास वेढा देऊन पांच दिवस लढाई केली. व शहर हस्तगत करून घेतलें. नवाबाचा सर्व वाडा लुटून फस्त केला. शहरचे लोक आमचें आतां काय होतें म्हणून अगदीं घाबरून गेले होते. परंतु त्याचें पूर्वपुण्याईमुळें इंग्रजफौजेनें शहरास हात लाविला नाहीं. याप्रमाणें बांद्याकडील हकीकत समजल्यामुळें बांदे शहर निर्भय मानून द्रव्य मिळविण्याच्या इच्छेनें हरिपंत भावे यांचा निरोप घेऊन बांद्यास जाण्यास निघालों. ब्रह्मावर्ताकडील कांहीं ब्राह्मण व कांहीं चित्रकूटाकडील मिळून नऊ ब्राह्मण आम्हांशिवाय होते. बरोबर एक गाडी भाड्याची घेतली होती, त्यांत सर्वांनीं आपआपलीं गांठोडीं ठेविलीं होतीं, व सर्व आम्ही पायीं चालत होतों. मजल दरमजल जातां जातां एके दिवशीं सकाळीं उठून सर्व मंडळी चाली

लागली. आमची सामानाचीं गांठोडीं गाडींत असून अंगांत बन्यान, नेसलेला पंचा व अंगावर उपरणें व तंबाखूचा बटवा, त्यांत सातूची पिशवी, साखर, मेथीचा वाळलेला पाला व एक पितळेचा मोठा कटोरा एवढें ऐश्वर्य जवळ होतें. बाकीचीं चिरगुटें–पांघरुणें व भांडीं वगैरे सर्व चीजवस्त गांठोड्यांत होती. व गाठोड्यांची गाडी पहाटेस आमचे अगोदर रवाना केली होती. दहा वाजण्याचे सुमारास एका गांवाशीं छायेखालीं उतरून स्नानसंध्यादि कर्में आटोपून पुनः चालूं लागलों. दिवस उन्हाळयाचे असल्यामुळें सूर्याचें तेज अति प्रखर पडून जीव कासावीस होऊं लागले म्हणून पुनः एकवार झाडाचे छायेखालीं बसून बारांवर दोहोंचे सुमारास पुनः चालूं लागलों. मंडळी एकमेकांशीं बोलत चालत होती. आम्हीं चुलतेपुतणें मागाहून बोलत बोलत चालत होतों. बोलतां बोलतां काका कांहीं बोलत नाहींत असें पाहून मी त्यांजकडे पाहिलें तों काकांचें तोंड आरक्त झालें होतें, नेत्र लाल झाले होते व शरीराचे झोकाडे जाऊं लागले होते. ही दशा पाहतांच मी घाबरून जाऊन काकांस हातानें धरून चालूं लागलों. परंतु पांच दहा मिनिटांत त्यांस उन्हाची लूक पूर्ण लागून सर्व भार माझे आंगावर टाकिला व काका बेशुद्ध झाले. तेव्हां सर्व मंडळीस हाक मारून त्यांस काकांची स्थिति दाखविली. सर्वांनीं असें सांगितलें कीं, जवळच एक विहीर आहे, तेथें त्यांस घेऊन जावें नंतर सर्वांनीं मिळून काकांस त्या विहिरीवर नेऊन झाडाचे छायेखालीं माझें अंगावरील उपरणें जमिनीवर आंथरून त्याजवर ठेविलें. रसी व लोटयाऐवजीं एक पितळेची तपेली घेऊन मी विहिरीवर धांवत जाऊन पाणी काढून आणलें व काकांचें डोळ्यांस व मस्तकास लाविलें. बटव्यांतील मेथीचा पाला काढून पाण्यांत कुसकरला व काकांस बसले करून सर्वांगास चोळला. परंतु त्यांस कांहीं केल्यानें शुद्ध येईना. त्याळेस मी वेड्यासारखा होऊन मंडळीस विचारूं लागलों कीं, येथून गांव किती दूर आहे? मंडळी सांगूं लागली कीं, दोन कोस मागेंपुढे गांव नाहीं. येथें आमचा बराच खोळंबा झाला. आमची भाड्याची गाडी लांबवर गेली आहे, तिलां संध्याकाळीं मुक्कामावर गाठलें पाहिजे. येथें आम्ही सर्व बसलों तर गाडी मुक्कामावर चुकून जाईल. आम्हांस येथें बसतां येत नाहीं व आमचें नुकसान होईल. आम्हांस गेलें पाहिजे असें म्हणून ते सर्व नऊ असामी उभे राहिले हे शब्द ऐकतांच माझें पोटांत धस्स होऊन माझें अवसान गळून गेलें. आतां ह्या सर्व असामी मजला अरण्यांत

सोडून गेले तर माझी व काकांची काय अवस्था होईल, हें मनांत येऊन मजला रडूं कोसळलें. तेव्हां मी गयांवया होऊन मंडळीचे पायां पडून बोलूं लागलों की, तुम्हीं ब्राह्मण आहांत; तशांत काकांचे परिचयाचे आहांत; तुम्ही या दीन ब्राह्मणाला संकटांत सोडून जाऊं नका. मजला इकडील भाषा साफ येत नाहीं व काकांस शुद्ध नाहीं, श्वास मात्र राहिला आहे. मागेंपुढें दोन कोसांचे आंत गांव नाहीं, याजकरितां काकांस येथें सोडून गेलां तर कदाचित् मृत्युही येईल. मजवर कृपा करून मला या संकटांतून काढलें तर मी तुमचे उपकार जन्मभर विसरणार नाहीं. आपण काकांस उचलून या पुढील गांवांत घेऊन जाऊं; मग तुम्ही गेल्यास हरकत नाहीं. असें मीं पुष्कळ प्रकारें त्यांची विनवणी करून बोललों; परंतु त्या कठिणहृदयांस माझी दया आली नाहीं. आमची गाडी दूर गेली आहे, आम्हांस तिला मुक्कामावर गांठलेंच पाहिजे, असें म्हणून मंडळीं चालती झाली. तेव्हां मी रडत रडत त्यांचे मागें धांवत जाऊन त्यांस विनविलें कीं, आपली गाडी पुढें गेली आहे तर दोन जलदी चालणारे असामींनीं पुढें जाऊन गाडीस मुक्कामावर गांठून थांबवावें. बाकी सात असामीं येथें राहून मजला संकटांतून काढा. या अनाथाला अरण्यांत सोडून जाऊं नका. असें म्हणत शेंपन्नास कदम दीनासारखा रडत रडत त्यांचे मागें गेलों व मागें फिरण्याविषयीं त्यांची विनवणी केली, परंतु ते निर्दय ब्राह्मण थांबले नाहींत. शेवटीं त्यांस मीं सांगितलें कीं, तुम्ही आमचे जातभाई असून या देशांत राहिल्यामुळें अति निर्दय झाला आहांत. तुम्हांस तुमचे जातभाईची व स्नेह्यांची सुद्धां दया येत नाहीं. एकवार तरी तुम्ही मजवर दया करून तुमचे मित्राकरितां आपला निर्दयपणा टाका. गाडी पुढें जाऊन नुकसान झालें तरी हरकत नाहीं, मी यथाशक्ति तुमचें नुकसान भरून देईन. तुमच्या पापामुळें ब्रह्मावर्त क्षेत्रीं लुटींत तुमचें नुकसान काय कमी झालें आहे? तुम्ही आणखी मित्रत्यागाचें भयंकर पातक करूं नका. इत्यादि निर्भर्त्सना करूनही त्यांस मागें फिरण्याचा यत्न केला; परंतु ते पाषणहृदयीं ब्राह्मण उलटे झराझरा चालू लागले. तेव्हां मला क्रोध अतिशय येऊन माझे हात, पाय, ओंठ थरथरा कापूं लागले. व तोंडांतून शब्द निघेनासा झाला. मग मी निरुपयास्तव तेथेंच उभा राहून त्या ब्राह्मणाधमांस शाप दिला. "तुम्ही नराधम ब्राह्मणबीजाचे खचित नव्हत. तुम्हांस या घोर पापाबद्दल नरकवास यावत् चंद्रदिवाकर भोगावा लागेल. तुमच्या भरंवशावर आम्ही चित्रकूटाहून निघालों

असतां या अरण्यांत आम्हांस संकटांत सोडून जातां याजबद्दल परमेश्वर तुम्हांस खचित शासन केल्यावांचून राहणार नाहीं. असें म्हणतां म्हणतां ते ब्राह्मण दिसतनासे झाले. मग मी रडत रडत काकापाशीं येऊन बसलों.

त्या प्रसंगांत माझे हृदयांत जो दुःखोदधि उसळून गेला, त्यापुढें मोठ्या वादळांतील समुद्राचा क्षोभही अगदीं क्षान्त आहे, असें म्हटलें तरी साजेल. एक तर त्या क्रूर ब्राह्मणाच्या निर्दयतेमुळें माझें चित्त अगदीं खवळून गेलें होतें, परंतु माझा नाईलाज असल्यामुळें त्या क्रोधाचें पर्यवसान केवळ अश्रूंतच होई. इकडे काकांची दुर्धर चिंता येऊन पडली होती. आतां मी यांस शुद्धीवर आणण्यास काय यत्न करूं व येथेंच जर मला टाकून काका स्वर्गवासी झाले तर त्यांची मी व्यवस्था कशी लावूं. गांवांत जाऊन कांहीं मदत घेईन तर रात्र पडून माणसें येण्याचे पूर्वींच काका, कोल्हे, कुत्रे वगैरे दुष्ट श्वापदांच्या भक्ष्यस्थानीं पडतील. इत्यादि निरनिराळ्या तरंगांनीं माझें मन व्याकूळ होऊन गेलें. मजला मदत करण्यास या बंडाचे दिवसांत या रस्त्यानें कोण भेटणार, आणि भेटला तरी तो मला महापातक्याला मदत कां करील, असें मनांत येऊन डोळ्यांतून एकसारख्या अश्रुधारा चालल्या. पुन्हां एकवार मनांत उमेद येऊन रसी, लोटा घेऊन धांवत जाऊन विहिरीचें पाणी काढून आणलें, व काकांच्या डोक्यावर शिंपडलें, नेत्रांस लाविलें. बटव्यांतील साखर, मेथीचा पाला काढून कटोऱ्यांत कालवून अंगास लाविला, परंतु त्यांस शुद्ध येईना. मी दुःखानें वेडा होऊन काकांस मोठमोठ्यानें हांका मारिल्या, परंतु ते ओ कसचे देतात! याप्रमाणें एक तासभर खटपट केली तरी यश येईना. तेव्हां अत्यंत भांबावून जाऊन माझें अवसान अगदीं सुटलें व मी मोठमोठ्यानें रडूं लागलों. आतां मला हे खचित सोडून जाणार असें वाटूं लागून काकाचे मोठेपणाची मला आठवण येऊ लागली. त्यांचे ओळखीनें व विद्वत्तेनें उज्जयिनी, ग्वाल्हेर, झांशी ब्रह्मावर्त इत्यादि ठिकाणीं सुख कसें झालें, अशा अनेक तऱ्हेच्या आठवणी होऊन अधिकाधिक रडूं कोसळलें. अनेक वार, दुःखांतून केवळ प्राणसंकटांतून सुटून परमावधि आनंद झाला, त्या आनंदाचा कळस येथें झाला काय असें वाटून माझा शोक भडकून गेला. लहानपणापासून इत्थंभूत सर्व वृत्त डोळ्यांसमोर उभें राहिलें, 'मजला विष्णु दृष्टीस पडेल तो सुदिनच समजला पाहिजे' ह्या मातुश्रींचे शब्दाची आठवण येऊन कंठ दाटून गेला. तीर्थरूपांचें, हरीपंताचें,

त्याच्या शपथेचें स्मरण होऊन दुःखानें जीव कोंवून गेला. त्यांचा तर वृद्धापकाळ झाला आहे, पण घरचे संसाराचे ओझें माझे डोक्यावर आहे, त्या संसाराची आतां काय वाताहात होणार, या एका वन्यान्याचें ऐश्वर्यानें घरीं परत मी कसा जातों, त्या गुलामांनीं आमचा गाडींत असलेला सर्व अर्थ चोरला असेल, व त्याकरितांच त्या दुष्टांनीं हें काम केलें असेल, इत्यादि अनेक विचारांनीं मन उद्विग्न होऊन रडतां रडतां डोळ्यांतून पाणीहि पडेनासें झालें. संध्याकाळचा सुमार झाला. सूर्य तांबडा होंऊन वहुतेक क्षितिजावर जाऊन पोंचला. सर्व आकाश व पृथ्वी सूर्याचे तांबड्या किरणांनीं रक्तमय व उदास दिसू लागली. वृक्ष निश्चल दिसून मेल्यासारखें भासूं लागले. मीहि निश्चल प्रेतासारखा होऊन काष्ठवत् झालेल्या काकांचे डोक्याशीं बसलों होतों.

यापुढें रात्रीचा समय होऊन व रात्र पडल्यावर सर्पांनीं व श्वापदांनीं भरलेंल्या अरण्यांत मी आपला व काकांचा जीव कसा वांचवूं ही कल्पना मनांत येतांच दुःखानें व माझ्या अनाथ स्थितीनें अगदीं व्याकुळ होऊन एकदम उभा राहिलों व पश्चिमेकडे तोंड करून हात जोडून प्रार्थना केली. हें सूर्यनारायणा ! मजवर दया कर. तूं ब्राह्मणाचा कैवारी आहेस ? मला एकट्याला या अरण्यांत टाकून जाऊं नकोस. असें म्हणतांच त्यांचे कृपेनें, काकांचे पूर्वपुण्याईनें व आमच्या कुटूंबाचे नशीबानें, सर्वांत हरीपंताच्या विलक्षण ईश्वराराधनाप्रभावानें एक रांगडा गाडीवान दुरून येतांना दृष्टीस पडला. त्यास पाहतांच मजला परमावधि आनंद होऊन एकदम मी त्या गाडीकडे धांव ठोकली. गाडीजवळ जाऊन त्यास काकांची सर्व हकीकत सांगितली व काकुळतीनें विनवणी केली कीं, कसें तरी करून काकांस गाडींत घेऊन या जवळील गांवांत पोचव. मी तुजला दोन आणे मजूरी देईन. या दुःखांतून पार पाडल्यास मीं तुझे उपकार जन्मभर विसरणार नाहीं. असें सांगतांच त्यानें कबूल केले, व आम्हीं दोघांनीं काकास उचलून गाडींत ठेविलें, व मी गाडींत काकाजवळ बसून गाडी चालती केली. तेव्हां गाडीवान यानें या गांवांत माझे आप्त पुष्कळ आहेत. म्हणून मी गांवांत येणार नाहीं; गांवाबाहेर ठेवीन असें सांगितलें. गांवाजवळ येऊन पोंचतांच एका लिंबाचे झाडाखालीं आम्ही काकास उतरून ठेविलें व मीं पंच्या अंगावर टाकून मान सावरून नीट करण्याच्या नादास गुंदलो. तों इतक्यांत गाडीवान भाड्याचे

पैसे न घेतां बैल उधळींत चालता झाला. हें पाहतांच मीं त्याजमागें पैसे देण्याकरितां धांवत गेलों, परंतु गाडी दूर गेल्यामुळें नाईलाज होऊन परत आलों. नंतर मला वाटूं लागलें कीं हा कोणी तरी ईश्वररूपी गाडीवान मजला दुःखांतून काडण्याकरितां आला होता यांत संशय नाहीं. कारण त्यास दुसरीकडे जाण्याचें असून या गांवांत त्याचे मनांत येण्याचें नसतां मजला येथवर पोंचविलें व पैसे न घेतां निघून गेला. शिवाय परमेश्वराचा धांवा करितांच गाडीवान पुढें येऊन ठाकला, हा चमत्कारच झाला, मला प्रत्यक्ष परमेश्वर भेटला असतांना मीं मूर्खानें त्याचें चरण धरून आपलें जीविताचें सार्थक केलें नाहीं. याजबद्दल मला पुष्कळ वेळपर्यंत अति पश्चात्ताप झाला. अशा विचारांत गर्क आहे तों दोन रानडे ब्राह्मण येतांना दृष्टीस पडले. त्यांजपाशीं जाऊन त्यांस काकांचें सर्व वृत्त सांगून दोन पैसे देण्याचें कबूल करून काकांस गांवांत नेवविलें व पिंपळाचे पारावर आपलें उपरणें आंथरून वरती ठेविलें. त्या पाराभोंवतीं ब्राह्मण, कुळंबी वगैरे लोकांची वस्ती होती.

सर्व दिवसभर श्रम केल्यामुळें मजला भूक अत्यंत लागून जीव अगदीं गळून गेला. काकांस श्वास होता व त्यांचें अंगहि गार पडलें नव्हतें. हें चिन्ह मनांत आणून काका सावध होतील अशी मला आशा उत्पन्न झाली होती. काका सावध झाले तर त्यांस लागलीच खावयास लागेल असें मनांत आणून प्रथम कांहीं खावयास तयार करण्याच्या उद्योगास लागलों. गांवांत हिंडून कुंभाराचा शोध करून पाण्याकरितां एक मडकें व खिचडीकरितां एक मडकें अशीं दोन घेतलीं. नंतर वाण्याच्या दुकानीं जाऊन मुगाचीं डाळ, तांदूळ व मीठ इतके जिन्नस घेतले. आणि पारावर परत येऊन पाण्याची चौकशी करूं लागलों, तों पाराजवळची विहीर खारे पाण्याची आहे, व गोडें पाणी दूर आहे, असें समजलें. तेव्हां मोठ्या कष्टानें गोडें पाण्याचे विहिरीवर जाऊन पाणी आणलें. प्रवासांत काय काय प्रकारचें दुःख आहे. याचें पक्कें चित्र डोळ्यांसमोर उभें राहिलें. इतक्या खटाटोपीस घटकाभर रात्र झाली. नंतर गवऱ्यांची थाळ रचून मडक्यांत खिचडी शिजत ठेविली. तों एक वैरागी तेथें होता त्यानें माझें सर्व वृत्त पाहून सदय होऊन काकांची हकीकत विचारिली व असें सांगितलें कीं, तुम्ही या खाऱ्या विहिरींतील पाणी काढून त्यांचे मस्तकावर शिंपीत बसा

दोन चार घागरी पाणी शिंपलें म्हणजे तो ब्राह्मण सावध होईल. असें सांगतांच गोडे पाण्यानें घागर भरलेली होती म्हणोन आसपास मातीची दुसरी एक घागर मिळण्याविषयीं यत्न करितां एका सदय बाईनें एक मातीची घागर दिली. मग पाणी शिंपडण्याचा प्रकार सुरू केला. इकडे खिचडी शिजत होती. रात्र चांदण्याची होती. त्यामुळें साफ दिसत होतें. घागर भरून आणोन कांहीं वेळ शिंपडून अर्धी घागर झाली म्हणजे मस्तकावर पाण्याची धार धरीत असें, याप्रमाणें चार घागरी पाणी घातलें, तेव्हां काका शुद्धीत येऊन त्यांनीं असें भाषण केलें कीं, अरे विष्णू, मजला थंडी फार वाजते, पाणी पुरें कर. असें काकांच्या तोंडचे शब्द ऐकतांच मजला जो आनंद झाला त्यास उपमा नाहीं. मग काकांनीं प्रश्न केला कीं, नऊ असामी ब्राह्मण कोठें गेले ? ते समयीं मीं त्यांस सर्व हकीगत सांगितली. ती ऐकून काकांस गहिंवर आला तो सांवरत नाहींसा झाला व मलाहि गहिंवर येऊन बोललों कीं, काका, या देशांत तुम्हांशिवाय मी अनाथ झालों होतों, परंतु ईश्वराचे कृपेनें माझे मला तुम्ही परत मिळालांत, असो. आतां बोलणीं पुढें होतील, तुम्हांस भूक लागली असेल, मी खिचडी शिजविली आहे तीं थोडीशीं खा. असें म्हणून सोवळे नव्हतें सबब एक दोर कंबरेस लावून बटव्याचा फडका भिजवून लंगोटा नेसून, खिचडी थोडी ओले पंचावर घेऊन तोंडी लावण्यास साखर घेतली आणि काकांस गेली तितकी खावूं घालून त्यांस कोरडें वस्त्र नेसवून एका उपरण्यावर निजविलें व मीहि ते दिवशीं स्वस्थपणें खिचडीभोजन केलें. इतकें होईतों रात्र दहा घटका झाली. आतां तुम्हांस चालत जाण्याची शक्ति येईपर्यंत येथेंच राहिलें पाहिजे. गाडींत आपलें गांठोडें गेले व त्यांत आपले रुपये गेले, परंतु त्याचा आतां शोक करून उपयोग नाहीं. तूर्त बटव्यांत दहा रुपये आहेत तितक्यावर होईल तितका गुजारा करूं. गेल्या रुपययांचा शोक कशास पाहिजे ? आपण जिवंत राहिलों तर शेकडों रुपये मिळतील. परमेश्वरानें तुम्हांस वांचविलें हाच परम लाभ मानला पाहिजे. इत्यादि बोलणीं होऊन स्वस्थ मनानें पिंपळाचे पारावर निद्रा केली. सकाळीं उठून दूध, तूप, साखर आणून काकांकरितां लवकरच भोजन तयार केलें. याप्रमाणें सकाळ संध्याकाळ लवकर भोजनें आटोपीत होतो. आठ दिवस राहिल्यानंतर काकांस थोडी शक्ति आली व चार चार कोस रोज चालूं असें त्यांनीं सांगितल्यावरून तेथून निघालों.

परमेश्वराच्या कृपेनें एका संकटांतून निघालों तों दैव विपरीत असल्यामुळें नळ राजाप्रमाणें दुसऱ्यांत येऊन पडलों. जातां जातां आम्ही एका पुऱ्यांत म्हणजे सुमारें दहा पंधरा घराचे खेड्यांत लिंबाचे झाडाखालीं उतरलों. तेव्हां एक वृद्ध ग्रामस्थ येऊन आम्हांस सांगूं लागला कीं, येथून वीस कोसांवर जलालपुरास लढाई होऊन इंग्रज सरकारचा जय झाला आहे. व बंडवाले पळून गेले आहेत. यांजकरितां आम्हांस इंग्रज सरकारचा असा हुकूम आहे कीं, येथें कोणीहि मुशाफर अगर बैरागी आल्यास त्यास कैद करून जलालपूर येथें पाठवून द्यावें. जलालपुरास फांशी लावून ठेविली आहे. जो सांपडेल त्यांस फांशी देतात. हें ऐकतांच आमची पांचावर धारण बसली. आम्ही त्या वृद्धाचे हातापायां पडून सांगितले कीं, आम्ही बंडवाले नाहीं, यात्रेकरी पितापुत्र आहों. आम्हीं दक्षिण देशचे राहणारे असून इकडे यात्रेकरितां आलों ते या भयंकर तापत्रयांत सांपडलों. याजकरितां आम्हांवर दया करा. तें ऐकून तो वृद्ध सदय होऊन म्हणाला, बरें आहे. आम्ही मुद्दाम तुम्हांस त्रास देणार नाहीं. परंतु चौकशीकरितां येथें पलटणी लोक आले तर तुमचें नशीब. तुम्ही मग रस्ता सुचेल तसें करा. असें म्हणून तो निघून गेल्यावर आम्ही स्नानभोजनें केली. आम्ही घरून कोणत्या कुमुहूर्तावर निघालों होतों हें मला समजत नाहीं. त्या मुहूर्ताचा योग आम्ही एका संकटांतून निघावें तों दुसऱ्या संकटांत पडावें, दुसऱ्यांतून निघून तिसऱ्यांत पडावें याप्रमाणें संकटपरंपरेंत पडून अत्यंत दुःखी व्हावें असाच होता. आम्ही जेवण होऊन स्वस्त बसलों नाहीं तों अकस्मात कांहीं यमस्वरूपी गंगापारी काळे पलटणीचें लोक तेथें आले. त्यांनीं आम्हांस पाहतांच ठीक आहे. तुम्ही दक्षिणी बंडवाले आहां, तुमचें नांव काय ? तुम्हांस जलालपुरास घेऊन गेले पाहिजे, मग तुम्हांस साहेब मारो अथवा तारो, असें म्हणून त्यांनीं आम्हांस कैद केलें. आम्ही जिवाचे भीतीनें व्याकूळ होऊन त्यांची अनेक प्रकारें विनवणी केली, व आम्ही लढवई नसून मुंबईकडचे भट्टभिक्षुक आहों, आम्हांस तुम्ही जीवदान द्यावें, वगैरे सर्व हकीगत सांगितली; परंतु त्यांनीं—आम्हांस हुकूम आहे त्याप्रमाणें तुम्हांस जलालपुरास नेलेच पाहिजे. तुमची हकीगत तुम्हीं साहेबास सांगा. मग तो तुम्हांस पाहिजेल तर सोडील,—असें सांगून ते आपले जेवाखायचे उद्योगास लागले, आम्ही भयातुर होऊन ठिकाच्या ठिकाणीं वेड्यासारखें बसलों. उदईक पहाटेस आम्हांस

घेऊन जलालपुरास निघण्याचा त्यांचा बेत दिसला. परंतु संध्याकाळचीं जेवणें करण्याची आम्हांस इच्छा होईना. जिवाच्या भीतीनें भूक, तहान, निद्रा सर्व नाहींशी होऊत आमचे मनांत अनेक विचार येऊं लागले. जलालपुरास गेल्यावर साहेब आम्हांस सोडावयाचा नाहीं असें आम्हांस निर्विवाद वाटून आम्ही फाशीं जाणार अशी दुस्तर भीति येऊन पडली. शेंकडों ठिकाणी जिवावर प्रसंग आले, परंतु आपला मृत्यु जलालपुरासच ठरला असल्यामुळें त्या सर्वांतून वांचलों गेलों व ह्या पुऱ्यांत येऊन ह्या यमकिंकरांच्या हातांत सांपडलों. "विवाहश्चार्थ अन्नं च जननं मरणं तथा ॥ कंठे बध्वा दृढं सूत्र यत्रस्थं तत्र नीयते ॥ शेवटीं गुढग्यावर हात टेकून दीनवदनांनीं त्या यमस्वरूपी हांसत खिदळत असलेल्या शिपायांकडे संध्याकाळ होईपर्यंत पहात बसलों होतों. प्रत्येकाचे मनांत निरनिराळे विचार चालले होते. आम्ही फाशीं गेल्याची बातमी आपले घरीं कळेल कशी, याचेंच कांहीं वेळपर्यंत मला वाईट वाटत होतें. चार घटका रात्र झाल्यावर ते शिपाई लोक आम्हावर पहारा नेमून झोंपी गेले. मनुष्याचे मनांत विचार चालले म्हणजे ते कोणत्या थरास पोचतात याचा कांहीं नेम नाहीं. विचार करितां करितां मला असें सुचलें कीं, जर ध्रुव नक्षत्र पाहिलें तर सहा महिने मृत्यु नाहीं, असें शास्त्रांत सांगितलें आहे. तर आपण ध्रुव नक्षत्र पाहिले म्हणजे आपल्यास कांहीं एक भय नाहीं, असें वाटून मी काकांस ध्रुव नक्षत्र दाखविण्याकरितां बाहेर बोलविलें. मग आम्ही दोघांनीं ध्रुव पाहिला, व आपल्या ठिकाणीं स्वस्थ मनानें येऊन बसलों. त्या वेळेस दोन गौड ब्राह्मण आम्हावर पहारा करीत होते. त्यांनीं आम्हांस तुम्ही काय करितां असें विचारल्यावरून आम्ही त्यांस वाक्यासह ध्रुव नक्षत्र पाहिल्याचें फळ शास्त्रांत सांगितलेलें सांगितलें. आमचे सुदैवानें त्या ब्राह्मणांनीं लहानपणीं कांहीं शास्त्राभ्यास केला होता, त्याचे ठिकाणीं आम्हाविषयीं किंचित् पूज्यबुद्धि उत्पन्न होऊन त्यांनीं आम्हास अनेक धर्मसंबंधें प्रश्न केले, व आम्हीही आपला कार्यभाग साधेल या आशेनें बरेंच पांडित्य केलें. तेव्हां त्या शिपायांची आम्ही भिक्षुक आहों अशी खातरी होऊन त्यांनीं आम्हास सांगितलें कीं, आम्ही तुम्हांस गांवांचीं नांवें लिहून देतों, त्या त्या गांवावरून जालवणास जावें, नाहीं तर फुकट मारले जाल. कोणत्या मनुष्याची कोणत्या प्रकारें ओळख पडून त्याजपासून आपल्यावर कसे उपकार होतात हें दैवचरित्र मोठें अतर्क्य आहे. असो. त्यांनीं वचन दिल्यावर आम्ही

स्वस्थपणें निद्रा केली. सकाळीं उठून त्या शिपायांपासून गांवें टिपून घेतलीं व त्यांचे उपकार मानून त्यांस राम राम करून आम्ही चालते झालों. आणि याप्रमाणें मुक्काम दरमुक्काम करीत जालवणास जाऊन पोंचलों.

---

## ७ : : ग्वाल्हेर व मध्यहिंदुस्थान

इत्थं विचिन्तयति कोशगते द्विरेफे ।
हा हन्त हन्त नलिनीं गज उज्जहार ॥

यादिप्रमाणें मुक्काम दरमुक्काम करीत आम्ही जालवणास पोहोंचून तेथें विष्णुमंदिरांत उतरलों. तेथें एक प्रामाणिक उपनांवाचा ब्राह्मण, ग्वाल्हेरहून आलेला भेटला; त्यानें लष्करांत बंडवाले लोकांनीं केलेल्या दंग्याची समग्र हकीकत सांगितली ती येणेंप्रमाणें :– ग्वाल्हेरींत शिंद्यांच्या पदरीं लढवाई लोक होते, ते तात्या टोपी यांनीं फितूर केले असल्यामुळें, काल्पीवर मोड झाल्यावर बंडवाल्यांनीं ग्वाल्हेरीकडे रोंख फिरविला, व मुरारावर शिंद्याच्या फौजेची छावणी होती. तेथें पोहोंचून मोर्चा बांधला; व शिंदे यांस असें कळविलें कीं, आम्हांस खर्चाकरितां चार लक्ष रुपये द्यावे नाहीं तर लढाईस सिद्ध व्हावें. तेव्हां दिनकरराव राजवाडे दिवाण यांनीं जबाब दिला कीं, आम्हीं लढाईस तयार आहों. जयाजीमहाराज शिंदे व दिवाण व इतर सर्व मंडळी मुरारचे नदीवर पोंचून लढाईची सिद्धता केली. शिंद्याकडील कित्येक लोकांनीं तेव्हां शिंद्यास असें कळविलें कीं, आम्ही लढाईचा आव मात्र घालूं, परंतु पेशव्यावर गोळा टाकणार नाहीं; कारण ते आमचे व तुमचे सर्वांचे मालक आहेत. इतक्यांत बंडवाले लोकांकडील तोफेस बत्ती झाली, व वाद्यें वाजूं लागलीं. शिंदे व दिवाण यांनीं आपलेकडील गोलंदाजास तोफेस बत्ती देण्याविषयीं सांगण्याची शिकस्त केली, परंतु गोलंदाजांनीं - आम्ही निमकहरामी-

पणा करणार नाहीं—असा जबाब दिला. राजवाडे घोड्याखाली उतरले व राजाही खालीं उतरला व तोफेस वत्ती देऊं लागले, परंतु तोफांत बाजरीच्या थैल्या घातल्या असल्यामुळें तोफा पेटेनात; ते समयीं राजा व दिवाण घाबरून गेले, व घोड्यावर स्वार होऊन आग्र्यास जाण्याचा विचार करून घोडे पिटाळले. इकडे लढाईचें तोंड लागलें. इकडील तिकडील शें दोनशें माणसें जाया झाली नाहीं इतक्यांत समजलें कीं, राजा व दिवाण निघून गेले. तेंव्हां शिंद्याकडील लोक पळून गेले. लढाई बंद झाली. श्रीमंतांनीं शहाजाण्या वाजवून ते लष्कराकडे येण्यास निघाले. शिंदे सरकारचा फुलबाग म्हणून एक अति रमणीय बाग होता, त्यांत शिरून बंगल्यात श्रीमंत एक रात्र राहिले. बंडवाल्यांनीं बागेचा सर्व विध्वंस केला. हत्ती, उंट वगैरेनीं झाडें उपटून टाकिलीं. बंगल्यांतील आरसे-सुद्धां फोडले. इकडे शहरांत सराफा वगैरे ठिकाणीं मनुष्यें फिरतनाशीं झालीं, व दुकानें बंद पडलीं. मग श्रीमंतांनीं दवंडी पिटवून दुकानें उघडवून व्यवहार सुरू करविला. प्रथम शहरांत सरकारवाड्यांत कोणास पाठवावें असा रावसाहेब विचार करितात तों झांशीवाली बाई शहरांत जाण्यास तयार होऊन तिनें आज्ञा मागितली. श्रीमंतांनीं सांगितलें कीं, शत्रूचें शहर आहे, वाड्यांत अनेक धोके असतील, बंदोवस्तानें जावें. तेव्हां बाई दोनशें स्वार बरोबर घेऊन मोठ्या सावधपणानें शहरांत शिरल्या व सराफ्यांतून मोठ्या थाटानें बंदुकीचे आवाज काढीत, शिंद्यांचे वाड्यांत प्रवेश केला. वाड्याकडील पिछाडीकडे लोक मुळींच गेले नाहींत. कारण बायजाबाई शिंदीचे कारकून तेथें होते, त्यांनीं इकडे बाईसाहेबांचें राहणें आहे, इकडे आपला मनुष्य येऊं नये, असें सांगतांच झांशीवालीनें सर्व लोकांस ताकीद दिली की, जीं कुलपें बाईजाबाईचीं असतील तिकडे आपणांस जाणें नाहीं. बायजा बाईसाहेब चार पांच दिवसांपूर्वींच वाडा सोडून परेडीकडे निघून गेल्या होत्या. झांशीवालीनें वाड्यांत आघाडीकडे जाऊन सर्व जिंदगी आपल्या कबजांत घेतली, व तात्या टोपी आणि श्रीमंतांस निरोप पाठविला कीं, आपण आतां यावें, वाड्यांत कांहींएक कपट नाहीं. तेव्हां रावसाहेब मोठ्या थाटानें शहरांत येऊन, हलुहळू बाजारांतून वाड्यांत आले. शिंदे सरकारचे कारभारी, कारकून वगैरे भेटले, त्यांस श्रीमंतांनीं सांगितलें कीं, आम्हांस येथें ब्राह्मणभोजन करणें आहे; तेव्हां उद्यांपासून येथें मुक्तद्वार भोजनाचा बंदोवस्त करावा. बेसनाचे लाडू पक्वान्न करून पात्रीं एक रुपया दक्षिणा द्यावी; असें आम्ही आहों तोंपर्यंत चाललें पाहिजे.

तेव्हां वाकनीस वगैरेनीं "महाराज हुकूम करतात त्याप्रमाणें सर्व सिद्धता आहे; बंदोबस्त करतों" म्हणून सांगितलें. आणि दुसरे दिवसांपासून मुक्तद्वार सुरू केलें. दर पात्रास रुपया दक्षिणा मिळूं लागली. दोनचार दिवसांनंतर शिंदे सरकारची गंगाजळी म्हणून खजिना ठेवण्याची जागा, महादजी बावा होते तेव्हांपासून होतीं, ती गंगाजळी कोठें आहे म्हणून तपास करून, रावसाहेब व तात्या टोपी व झांशीवाली वगैरे सर्व सरदारांनीं जाऊन तो खजिना आपल्या ताब्यांत घेतला. सोने, रूपे मोतीं वगैरे सर्व अर्थ पाहून, तात्या टोपी यांनीं प्रश्न केला कीं, जर महादजीबावा शिंदे सरकारपासून यात अर्थ ठेवीत आले तर तसा अर्थ येथें कां नाहीं? तेव्हां गंगाजळीवरील मुख्य कारभाऱ्यानें उत्तर दिलें कीं, अर्थ ठेवीत आले, परंतु जशी जशी खर्चाची गरज लागली तसा काढून खर्चही करीत गेले; व केव्हां केव्हां हलीमानीहि झाली. हें ऐकून त्यांचे समाधान झालें. मग असा विचार ठरला कीं, आपण येथें येण्यानें निर्भय झालों असें नाहीं; मुलुखाचा बंदोबस्त ठेवण्यास आपल्यापाशीं फौज नाहीं. इंग्रज आतां येऊन येथें लढाई होईल; तेव्हां आपल्यास जंगलांत जावें लागेल. यास्तव जितका अर्थ मिळेल तितका संपादन केला पाहिजे, व येथून पश्चिमेस पाण्याची जागा पाहून, तेथें कांहीं लोक ठेवून मग तेथें सामानसुमान पोंचविले पाहिजे. असा ठराव झाल्यावर शिंदे सरकारच्या घरीं जितक्या मौल्यवान जिनसा होत्या त्यांचा लिलांव सुरू केला. विछायती होत्या त्याही आणोन वारा दरीपुढें रास केली. मौल्यवान वस्त्रें शहरांत कोणी घेईना, तेव्हां चौथे भागांत वर्णन केलेल्या नाटकी लोकांना, तीं राजवस्त्रें थोडया किंमतींत मिळालीं; ते लोक कोंकणचे होते व अशीं वस्त्रें नाटकास मिळणे कठीण असें जाणून त्यांनीं तीं विकत घेतलीं. भरजरी पैठण्या २५, २५ रुपयांना घेतल्या. असो. याप्रमाणें शिंदे सरकारची दौलत हस्तगत करून हत्ती, घोडे, तोफांचे बैल, तोफा व कांहीं बंडवाली फौजहि हस्तगत करून घेतली. श्रीमंत ग्वाल्हेरीस अठरा दिवस होते; मुक्तद्वार सुरू होतेंच. मुरारवर एक पलटण होती, व शहराचा बंदोबस्त चांगला ठेविला होता. अठरावे दिवशीं अकरापासून बाराचे सुमारास, एकाएकीं लोक धावरून शहरांत गोंगाट सुरू झाला व आग्र्याहून इंग्रजी फौज येऊन, तिनें मुरारचे पलटणीवर हल्ला सुरू केला. तेव्हां झांशीवाली बाई, तात्या टोपी व रावसाहेब घोड्यावर बसून बरोबरचे लोक घेऊन मुरारकडे निघून गेले. मुक्तद्वारांत ब्राह्मणभोजनाची धांदल उडून गेली. उदक सुटून ब्राह्मण भोजनास बसले होते, कांहीं ठिकाणीं

दक्षिणा ठेविली होती, कांहीं ठिकाणीं नव्हती. तोंच भयाचे योगानें ब्राह्मण पात्रें टाकून उठून गेले; एकहि मनुष्य तेथें राहिला नाहीं. इकडे लढाईंत झांशीवालीस बंदुकीची गोळी लागली तथापि मानिलें नाहीं. तों तरवारीचा वार मांडीस लागला. ते समयीं घोड्यावरून खालीं पडतां पडतां तात्याटोपी यांनीं बाईचें प्रेत घोडा पुढें घालून धरिलें. आणखीहि लोक जमले, त्यांनीं प्रेत आणलें. बंडवाले लोक पळूं लागले, व इंग्रजाचे लोक पुढें होऊन बंडवाले लोकांच्या तळावर तळ दिला. इकडे बाईचें प्रेत नेमलेल्या जागेवर नेऊन दहन केलें. याप्रमाणें त्या शूर बाईला रणांगणांत मृत्यु येऊन तिला सद्गति मिळाली; पण बंडवाल्यांच्या बाजूस एकाएकीं प्रत्यक्ष वीरश्रीच नाहींशी झाली असें म्हटलें पाहिजे.

दुसरे दिवशीं जयाजीराव महाराज व दिनकरराव साहेब शहरांत येऊन वाड्यांत पोहोंचले, तों तेथें गाद्या, सतरंज्या वगैरे बैठका सुद्धां नाहींत. तेव्हां सावकार लोकांस आणून व त्यांजकडून ऐवज काढून, नवीन सरंजाम भांडींकुंडीं वगैरे सर्व आणविलीं व शहरांत दवंडी पिटून बंदोबस्त केला. राजाच्या वस्तु किंमत देऊन लोकांनीं नेल्या होत्या त्या जसजशी वातमी लागली तसतशा किंमत न देतां परत घेतल्या. त्या प्रसंगांत नाटकवाले विचारे नागवले व संकटांत पडलें त्यांचें विन्हाड जप्त केलें जाऊन तेथें राजवस्त्रें सांपडलीं तीं घेतलीं गेलीं व त्यांस कैदहि केलें. त्यांचा ऐवज कांहीं सावकारांकडे होता तोही दण्डादाखल जमा केला गेला. याप्रमाणें त्यांची दुर्दशा झाली. मात्र दिवाण दिनकरराव हे कोंकणचें असल्यामुळें त्यांनीं त्यांस शिक्षा न देतां दोनचार दिवसांनीं सोडून दिलें. याप्रमाणें ग्वाल्हेरचें राज्य परत मिळून शिंदे इंग्रजांचें विचारें राज्य करूं लागले. बंडवाले लोक पश्चिमेकडे पळून गेले ते तेथेंच आहेत, वगैरे हकीकत त्या ब्राह्मणांनीं आम्हास सांगितली.

नंतर आम्ही उभयतां असा विचार केला कीं, चित्रकूटचे श्रीमंत हल्लीं बांद्यांस कैदेंत आहेत, तेथें शंभर सव्वाशें रुपये रोजचा खर्च होत आहे, तेथें जाऊन कांहीं द्रव्य मिळवून कोठें जाणें तें जावें. असा बेत करून जालवणाहून निघून मजल दरमजल बांद्यास पोंचलों. तेथें पहारेकरी यांचे परवानगीनें काका श्रीमंतांस भेटले. त्यांनीं उदईक नित्यदानास यावें म्हणून आज्ञा केली. त्याप्रमाणें जाऊन रोज नित्यदानें घेत होतों. तेथें हरिकर्ण रविवर्ण म्हणून एक गुजराथी

सावकार होता. त्यानें अन्नछत्र घातलें आहे. दक्षिणी ब्राह्मण, सुवासिनी, विधवा वगैरे बारा वाजेतों येतील तितक्यांस तेथें जेऊं घालतात. दक्षिणा पाव आणा मिळतो. या कारणानें बांद्यास दक्षिणी ब्राह्मणांची बरीच वस्ती आहे. आम्ही तेथें दहा दिवस होतों. तेथून ब्रह्मावर्तास जावें असा विचार करून निघालों, तों रस्त्यांत अकस्मात पांच चार स्वार येऊन त्यांनीं आम्हांस खर्चास १० रुपये देऊन बाकी ७५ रुपये व जिन्नसपान्नस आमचे लुटून नेले. तेव्हां परत शिंद्याचे लष्कराकडे फिरलों. विचार केला कीं, काशीयात्रेकरितां रुपये जमा करावे म्हणून यत्न करितों, परंतु आधीं रुपये मिळत नाहींत, आणि मिळालें तर चोर लुटून नेतात; तेव्हां आतां ग्वाल्हेरीभोंवतालीं असावें असा विचार करून फिरत होतों. बुंदेलखंडात सूर्ययंत्र म्हणून फार प्रसिद्ध क्षेत्र आहे; तेथें महाव्याधीचे लोक कांहीं दिवस राहिले असतां महाव्याधि दूर होते असा लौकिक ऐकिल्यावरून आम्ही तेथें जाऊन यात्रा केली. तें स्थान फार रमणीय आहे. देवालयानजीक मोठी नदी आहे. पूर्वपश्चिम चाळीस धनुष्यें उदक आहे, त्यास सूर्यावर्त म्हणतात. तेथें स्नान केलें असतां ज्या पातकांनीं अंगावर अष्ट प्रकारचीं कुष्टें होतात तीं नाहींशीं होतात. श्रीसूर्याचें देऊळ फार मोठें आहे. देवळाचे मध्यभागीं चतुरस्र एक फार मोठा चबुतरा आहे. त्या चबुतऱ्यावर मध्यभागीं कुरुंदी सहाण तांबडे रंगाची, दोन अडीच हातांची वाटोळी, शिसें ओतून पक्की बसविली आहे, त्याजवर सूर्ययंत्र काढलेलें आहे. यंत्राचे मध्यभागीं केसरकर्णिक जागा आहे, तेथें मध्यान्ही मोठ्या दिव्याचे वातीची जशी ज्योत असते त्याप्रमाणें लखलखित तेज, यंत्राचे मध्यभागीं पडतें. तें थोडा वेळ असतें, त्या संधीस तेथें दर्शनाची दाटी फार जमतें; परंतु देवळासभोंवतालीं आवार नाहीं, सबब चोहींबाजूनें लोक येऊन यंत्राच्या मध्याभागाचें दर्शन घेतात कुष्टी व्याधिष्ट लोक तेव्हां नदींत स्नान करून ओल्यानें वाट पाहत असतात. मग ज्योतीचें दर्शन करून नमस्कार करून जातात. देवळाभोंवतीं दोन दोन तीन तीन मजली धर्मशाळेची फार गर्दी आहे. कारण धनिक लोकांस व्याधि कोठेंही झाली म्हणजे ते येथें येऊन सेवा करून राहतात. आम्ही तेथें चार पांच दिवस स्नान तीर्थविधि वगैरे करून होतों. नंतर तेथून निघून जातांना वाटेंत दहा बारा स्वार भेटले. त्यांस विचरतां आम्ही श्रीमंत रावसाहेबांचें नोकर आहों, आमचे बरोबर येत असल्यास चलावें, जवळच तळ आहे, असें सांगितलें.

तेव्हां आम्ही त्यांजबरोबर श्रीमंतांच्या मंडळींत गेलों.

या वेळीं श्रीमंतापाशीं फौज वरीच होती. एकंदर लढवई लोक सुमारें २० हजार होते, व बाजारबुणगे १० हजार होते. दक्षिणी ब्राह्मण आठ दहा होते व आचारीपाणकेही होते. त्यामुळें आम्हांस कोणतीच काळजी राहिली नाहीं. आम्ही बंडवाल्याबरोबर जात असतां देश कोणता हें भान मुळींच राहिलें नाहीं पर्जन्यकाळचे दिवस होते. जातां जातां जयपुरचे जवळ गेलों. जयपुरवाल्यापासून बंडवाल्यांनीं खंडणी घेतली; याशिवाय लहानसहान राजेरजवाडे रस्त्यांत लागले त्यांजपासूनही खण्डणी घेतली. नंतर बुंदीकोटच्या राजाकडे बंडवाले वळले व बुंदीकोटाहून आठ कोसांवर चांगली जागा पाहून तेथें तळ दिला; व बुंदीकोटाचे *राजास स्वाराबरोबर पत्र धाडलें. त्यांत मजकूर असा कीं, आम्ही धर्माकरितां इंग्रजाबरोबर लढत आहों, यास्तव तुम्ही आम्हांस दोन लक्ष रुपये द्यावे. न द्याल तर आम्ही लढून घेऊं. तें पत्र स्वारानें राजास नेऊन दिलें. राजानें सर्व सरदार जमा करून विचार केला, तेव्हां असें ठरलें कीं, हे बंडखोर लोक आहेत, त्यांस विनाकारण रुपये देऊं नये. नंतर स्वाराला तोंड जबानीच असा निरोप सांगितला कीं, सार्वभौम इंग्रजबहाद्दर आहे, त्यास खंडणी द्यावी लागते, त्यास तुम्ही मुलुखांतून काढून लावा; म्हणजे आम्ही तुम्हास खण्डणी देऊं. हा निरोप स्वारानें आणतांच बंडवाल्यांनीं बुंदीकोटावर चाल केली. मला हगवणीचा उपद्रव होता म्हणून आम्ही तेथेंच राहिलों. चार पांच दिवसांनीं बुंदीकोटाकडील हकीगत एका गृहस्थानें सांगितली कीं, श्रीमंतांकडील लोकांनीं शहरानजीक जाऊन मोरचे बांधून तोफेस बत्तीस दिली, राजाकडील लोक सरदार वगैरेही रणभूमीवर तयार होऊन आले. राजापाशीं फौज मराठी होती व बंदुका तोडयांनीं पेटविण्याच्या होत्या. एक प्रहरभर लढाई झाली. श्रीमंतांकडील लोक लढावइ असल्याकारणानें राजाच्या फौजेचा मोड झाला, व ते लोक दशदिशा पळून गेले, व राजाहि त्या गर्दीत पळून गेला. श्रीमंताकडील लोक हल्ला करीत शहराच्या दरवाज्यापाशीं येऊन शहरांत शिरले. शहरची लूट ज्यास सांपडेल त्यास बक्षिस ठरली होती, व सरकाराकडील द्रव्य श्रीमंतांनीं घ्यावें असें ठरले होतें. पलटणी टोळ्यांनीं

*ही गोष्ट केचा इतिहास पाहतां झालरा पाटण कोठ्याखालील एक राजा आहे तेथील आहे.

शहरांत शिरून तमाम लूट केली. या शहरांत लोक बहुत धनिक होते, तो अर्ध सर्व पलटणच्या शिपायांनीं घेतला. राजवाड्यांत राजाची राणी, मातुश्री व चार भोगांगना अशा सहा स्त्रिया माडीवर एका जागेंत आंत कडी लाऊन बसल्या होत्या. रावसाहेब व तात्या टोपी यांनीं खजिनदारापासून खजिना आपल्या ताब्यांत घेतल्यानंतर तिसरे मजल्यावर रावसाहेब खुद्द जाऊन असें म्हणाले कीं, राजाचे मातुश्रीस मी नमस्कार करतों, व राजाच्या स्त्रिया माझ्या वहिणी आहेत. मी धर्माकरितां प्राणावर उदक सोडून या प्रसंगांत बुद्धिपूर्वक पडलों आहें; तशांत सरकारी फौज धर्माकरितां विघडून आपल्यास सांपडली, याजमुळें जें करूं तें होईल, म्हणून या कर्मास आरंभ केला. सर्व राजेरजवाडे यांनीं सामर्थ्यानुरूप पैशाची मदत केली, त्याप्रमाणें येथेंही दोन लक्ष रुपयांची मागणी केली; परंतु आम्हीं लढाईस येतों असा निरोप आल्यावर मजकडे दोष नाहीं. तथापि आपण भिऊं नये. माझ्याकडून कोणतेंहि पातक व्हावयाचें नाहीं. आपण दरवाजा उघडून रोजच्याप्रमाणें जेवणें खाणें करावीं. आपला लहान मुलगा आहे, त्यास गादीवर बसवून आम्हीं येथून जाऊं. आह्मांस राज्याची जरूरी नाहीं. वस्तुमात्राचा नाशही करणें नाहीं. असें सांगतांच राजाच्या मातुश्रीनें दरवाजा उघडला. नंतर रावसाहेब क्षणभर तेथें वसून आपले गोटांत निघून आले. खजिन्यांत तीन चार लक्ष रुपये रोख होते ते मात्र घेतले व कांहीं वस्त्रें घेतलीं, व गहूं व तुरीची डाळ, व घोडे व बैल घेतले. रावसाहेबांनीं स्वतः राजपुत्रास मोठ्या थाटानें मिरवणूक काढून गादीवर बसविलें. याप्रमाणें हकीकत कळली. या राज्यांत मोर फार आहेत. कारण येथें मोर मारण्याची मनाई आहे. तेथून बंडवाले कूच करून निघाले, परंतु शिपाई फार उन्मत्त झाले. शहरचे लुटीचा अर्थ शिपाई लोकांपाशीं फार झाला होता. प्रत्येकाच्या कमरेशीं अर्थाचा कसा होता. नंतर हैदराबादचा निजाम बंडवाल्यास मिळणार आहे, अशी बातमी लागल्यावरून बंडवाले लोक दक्षिणेकडे फिरले, व नर्मदा उतरून सातपुड्यांतून दक्षिणेंत जाण्याचा रस्ता काढावा असें ठरलें, तेव्हां आम्ही त्यांजबरोबर जाण्याचें सोडून देऊन ब्रह्मावर्ताकडे फिरलों. मी हगवणीनें अशक्त झाल्यामुळें हळुहळू चालत, व कोठें मिळेल तेथें गाडी करीत जाऊं लागलों, तों एके दिवशीं बेटमा म्हणून शहरासारखा गांव लागला तेथें येऊन पोंहोंचलों. शहरांत शिरून बाजारांत सिधा-

सामग्री घेण्याकरितां गेलों, तों शहर ओस दिसू लागलें. रस्त्यांत माणूस मेटेना. उतरण्याकरितां जागेचा शोध करितां एक घर एकानें दाखविलें. तेथें शिरतां मालकानें सांगितलें कीं, आम्ही शेणवी आहों, तशांत गांवांत मरगीचा उपद्रव चालू आहे, व आमचे येथेंहि मनुष्य लागलें आहे, तेव्हां तुम्ही गांवाबाहेर ओढा आहे तेथें जाऊन, स्वयंपाक वगैरे करून रात्रीं पाहिजेल तर येथें रहावयास यावें. प्रवासांत भयंकर प्रसंग कसे येतात याची साक्ष पटविण्याकरितांच कीं काय, आम्हांस तें गांव लागलें. आमचेबरोबर आणखी एक ब्राह्मण वाटसरू चालत होता, तेव्हां आम्ही तिघे शिधा व गाठोडीं घेऊन गांवाबाहेर गेलों. तेथें नदीकांठीं स्नानें करून स्वयंपाकाची तयारी करूं लागलों तों विस्तव नाहीं. इतक्यांत एक प्रेत जवळच जाळण्यासाठीं आलें, त्याजबरोबर विस्तव होता, तो मी मागूं लागलों. विस्तव नेणारा मनुष्य मागें पुढें पाहूं लागला, तेव्हां मी त्यास धर्मशास्त्र सांगितलें कीं, हा अग्नि स्थंडिलावर ठेऊन स्थापित केला जाईल, तेव्हां क्रव्यादग्नि होईल, तो देऊं नये; सध्यां हा लौकिकाग्नि आहे. तेव्हां त्यानें आम्हांस अग्नि दिला. असो. भोजने करून आम्ही रात्रीं वस्तीकरितां शेणव्याचें घरीं आलों व ओटीवर निद्रा केली. पहाटेस शेणव्याचे घरीं आणखी एक बाई लागली. घरचीं माणसें औषधोपचाराचे उद्योगास लागलीं व आम्ही उठून रस्ता आक्रमिण्यास आरंभ केला. जातां जातां उजाडण्याच्या सुमारास आमचे सोबत्यास एकाएकीं रेच झाला, तोही घागरभर. तेव्हां आम्हां सर्वांचे धावें दणाणलें. आलेल्या गोष्टीस सादर असावें, याशिवाय आपले हातीं काय आहे, असें मानून आम्ही पुढें गांव लागला तेथें वस्ती केली, व सोबत्यास पुष्कळ औषधोपचार केला; परंतु त्यांचे मरण त्या गांवात ठरलें होते, त्याप्रमाणें बारा वाजण्याचे सुमारास त्यांचें प्राणोत्क्रमण झालें. नंतर गांवचे पाटलास बोलावून त्याच्या चीजवस्तांची यादी करून सर्व माल त्याचे हवाली केला, व शवाचें दहन गोवऱ्यांनीं केलें; कारण तेथें लांकडे मिळत नव्हती. एक वासा आणून त्यांला तें प्रेत बांधून आम्ही स्मशानांत नेलें, व त्यांस अग्नि दिला, नंतर स्वच्छ स्नानें करून गांवात येऊन पुढच्या गांवास गेलों. तेथें भोजन तयार करून अन्नग्रहण केलें, व रात्रीं तेथेंच वस्ती केली. तो दिवस आम्हांस फार भयंकर गेला. दुसरे दिवशीं हळुहळू मार्ग आक्रमण करून एका मुक्कामावर आलों. तेथें बरेच दिवस विश्रांति घेतली. श्रावणाचा महिना असून पाऊस फार पडत होता.

भाद्रपदमासीं पुन्हां कूच केलें तों रस्त्यांत एका मुक्कामांवर, ब्रह्मावर्ताकडील दोन ब्राह्मण काकांच्या परिचयाचे दक्षिणेकडून आले. त्यांनीं बंडवाल्यांची पुढील हकीकत सांगितली, ती फार महत्वाची असल्यामुळें येथें लिहून ठेवितों.

नर्मदा उतरून सातपुड्यांत जाण्याच्या इरादानें बंडवाले निघाले तेव्हां मागें-पुढें अडीचशें स्वार चालत असत. ह्या स्वारांजवळ मोठमोठे घोडे असून त्यांचेपाशीं हस्तनळीच्या तोफाही असत. त्यापैकीं मागील स्वारानें असें कळविलें कीं, दोन मजलांवर इंग्रजांची फौज व मद्रासी काळी पलटण पाठलाग करीत येत आहे. अशी बातमी लागतांच डबल कूच करून—म्हणजे रोज पंधरा पंधरा कोसांची मजल मारून—बंडवाले नर्मदेवर येऊन पोंचले. तेथें इंग्रजांची फौज होतीच. नर्मदेस नांव नसून पर्जन्य फार पडत असल्याकारणानें पाणीहि पुष्कळ चढलें होतें. महासंकट पडलें. ईश्वर वाट कशी देतो अशा विवंचनेंत त्या मुक्का-मावर त्यांची रात्र गेलीं. पहांटेस तात्या टोपी यांनीं चार स्वार बरोबर घेऊन सर्वांस असें सांगितलें कीं, नर्मदातीरास कोठें तरी पायउतार असल्याचे शोधास जातों. असें सांगून नर्मदेच्या तीरीं गांवोगांव शोध करीत चालले, मुळींच बंडवाले लोक जेथें जात तेथें त्यांची बातमी लागतांच गांवातील लोक पळून जात; गांवांत अतिवृद्ध व बालक मात्र रहात. तात्या टोपी यानें हुशंगाबाद दक्षिण तीरावर आहे त्याचे पूर्वेस ईशान्य बाजूस सांडिया घाटाचे उत्तरेस जंगलांत लहानसा गांव आहे, तेथें बहुत चौकशी केली, परंतु नर्मदेस उतारा आहे असें समजलें नाहीं. तो त्या गांवीं एक शूद्र अतिवृद्ध ९० वर्षाचा भेटला; त्यांजपाशीं तात्या टोपी बसून सर्व हकीकत सांगून त्याला असें विचारलें कीं, नर्मदेस पायउतारा कोठें आहे तें सांगावें, तुला शंभर रुपये बक्षीस देऊं. याप्रमाणें त्यांस राजी करून त्या वृद्धा-पासून उताराची माहिती मिळविलीं. त्यानें स्वतः नर्मदाकाठीं येऊन जागा दाख-विली आणि तात्या टोपी व स्वारांनीं त्याचे शब्दावर भरंवसा ठेऊन नदींत घोडे घातले. तेथें पात्र फार रुंद असून खालीं वाळू होती. शूद्रानें दाखविल्याप्रमाणें समोरचे खडकावर नजर ठेऊन चालले तों पाणी छातीवर खोल नाहीं व पाण्यास ओढहि नाहीं असें पाहिलें. पलीकडे जाऊन पुन्हा परत येऊन त्या वृद्धास रुपये देऊन संतुष्ट केले. व लागलेच स्वार पाठवून सर्व लष्कर तेथें नर्मदातीरीं आणविलें. त्या समयीं सर्व बंडवाले भिऊन गेले होते. कारण नर्मदा नदी

पर्जन्यामुळें फार वाढली आहे, भयंकर पात्र दिसत आहे. असें आपसांत बोलत होते. इतक्यांत रावसाहेबांनीं घोड्याखालीं उतरून नर्मदेस नमस्कार घालून हळदकुंकू वाहून भरजरी शालू व जरीकाठी खण गंगेस अर्पण केला, आणि प्रार्थना केली कीं, गंगाबाई! तूंच आतां रस्ता देशील तर उपाय आहे. असें म्हणून घोड्यावर बसून घोडा पाण्यांत घातला. मागोमाग तात्या टोपी, जळका रामभाऊ वगैरे सरदारांनीं घोडे घातले व पलीकडे निघून गेले. मग लष्करांत ओझ्याचे बावीस हत्ती होते ते नर्मदेंत उभे करून लोक हत्तीवरून उतरूं लागले. सर्व सामान सुद्धां उतरून, दक्षिण तीरानें पुन्हा सांडियाच्या घाटावर येऊन, बहुत झाडी होती तेथें तळ दिला. सर्वांची मनें निर्भय होऊन आनंदानें आपापलीं जेवणें करण्यास लागले. इतक्यांत इंग्रज मागें लागला होता तो संध्याकाळचे सुमारास नदीवर पलीकडे पोहोंचून त्यांनीं तोफेस वत्तीं दिलीं. तात्या टोपी यानेंहि जवळच टेकडी होती त्याजवर तोफ नेऊन आवाज काढूं लागले. तेव्हां इंग्रजास आश्चर्य वाटलें कीं, नर्मदेस पूर आला असोन सर्व लष्कर पलीकडे कसें गेले? इकडे पृथ्वीवर असा लौकिक झाला कीं, 'श्रीमंतांस नर्मदेनें वाट दिली. नदीस पूर आला होता. इंग्रजी फौज आली तों वाट नाहीं.' असो. इंग्रजानें नावांचा वगैरे बंदोबस्त करून नदी उतरण्याची खटपट चालविली. श्रीमंतांकडील फौज आठ दिवस तेथें तळ देऊन होती. नंतर बुंदीकोट्याकडील लूट येथून पुढें बरोबर नेणें कठीण, असें जाणोन सर्वानुमतें तेथेंच वडाचे झाडाखालीं खुणेनें पुरून ठेविली. मुख्य ठेवणारांत श्रीमंतांचा हुजऱ्या व तात्या टोपी होते. मग तेथून कूच करून सातपुड्यांत गेले. रस्त्यांत शेतीचें बरेंच नुकसान केलें. मक्याचीं शेतें शिपायांनीं खाल्लीं. उसाचीं गुन्हाळें लागलीं होतीं तेथेंहि लूट केली व ऊंस खाल्ले. तों हैदराबादेस पाठविलेले लोक आले; त्यांनीं रावसाहेब व तात्या टोपी ह्यांस असें सांगितलें कीं, हैदराबादवाला अनुकूल नाहीं, इकडे आल्यास नाश होईल. असा मजकूर समजतांच सर्व फौजेसुद्धां ते माघारे फिरले. पलटणी लोकांजवळ लुटीपासून अर्थ फार झाल्यानें वेळचे वेळेवर हूकूम उठत नाहींसा झाला, तरी माघारे फिरलें. सातपुड्यांत महिना पंधरा दिवस राहिले. नंतर झांशी व सागर यांचे दरम्यान जंगल बहुत आहे. त्याचे आश्रयानें रहावें असा विचार करून तेथें पोहोंचले तों फौज फार कमी झाली. कितीएक पलटणी लोक पळून गेले. इंग्रजांनीं जाहीरनामा लाविला

होता कीं, ज्या लोकांस आमचें भय वाटत आहे, त्यांनीं भय सोडून शिपाईपणाचा ड्रेस टाकून हत्यारविरहित खुशाल आपआपलें घरीं जाऊन निर्भयपणानें रहावें. त्यावरूनहि कैक लोक बंड सोडून घरीं गेलें. आम्ही विचार केला कीं, आपण बंडांत अर्थ संपादनाकरितां आह्यो तो तर मिळत नाहीं, तेव्हां आपणहि बंड सोडून ब्रह्मावर्तास परत जावें. याप्रमाणें विचार करून बाहेर पडून जात आहों तों तुमची आमची संगत पडली. आतां एकमेकांस जपून ब्रह्मावर्तास जाऊं. याप्रमाणें त्या ब्राह्मणांनीं हकीकत सांगितली. नंतर आम्ही सर्व मिळून मजल दरमजल करीत करीत ब्रह्मावर्तास जाऊन पोंचलों, व तेथें वेदशास्त्रसंपन्न बाबा कर्वे यांजकडे बिऱ्हाड करून राहिलों. तेथें श्रीमंतांचे बाग मोकळे होते. त्यांत सकाळीं जाऊन फुलें, बेल, तुळशी बहुत आणून देवपूजन करीत असों. व क्षेत्रांतील देवालयांचीं दर्शनें घेत असों. याप्रमाणें कार्तिक मास तेथें राहिलों. असो. येथून बंडाची हकीकत संपली.* तत्रापि आमची पुढील हकीकत थोडक्यांत देतों.

---

## ८ : : : : तीर्थयात्रा

धर्मे मतिर्भवतु वः सततोत्थितानाम् ।
स ह्येक एव परलोकगतस्य बन्धु ॥

ब्रह्मावर्तास कार्तिक मास संपला. पुढें काशीस जाण्याचा विचार करूं लागलों. द्रव्य कसें मिळेल या विवंचनेंत होतों. इतक्यांत वे. शा. रामचंद्र शास्त्रीबुवांनीं सांगून पाठविलें कीं, बेलसियाचा राजा तुळापुरुष करणार आहे. तें अनुष्ठान कुंड-मंडपाचें आहे, तेव्हां तुम्हांस आमचेबरोबर येऊन अनुष्ठान पार पाडलें पाहिजे. बेलसियाचे ठिकाण ४०-४५ कोस असून उत्पन्न तीन लक्षाचे होतें, व राजा ऋग्वेदी ब्राह्मण होता. राजाचें वय ८० वर्षांचें व राजपत्नी ७५ वर्षांची असून औरस संतति नाहीं. त्यांनीं मुद्दाम शास्त्रीबुवांस मेणा पाठवून बोलविलें होतें. नंतर मी

---

* रावसाहेब कोठें नाहींसे झाले याचा पत्ता नाहीं. व तात्या टोपी पकडला जाऊन फांशीं गेला हें इतिहासप्रसिद्ध आहे.

दानमयूख, दानवचंद्रिका इत्यादि ग्रंथ पाहून अनुष्ठान तयार केलें. नंतर शास्त्रीबोवा आणखी कांहीं ब्राह्मणासमवेत आम्हांस घेऊन बेलसियास गेले. शास्त्रीबोवांचें वय त्या समयीं पाऊणशें वर्षांचें होतें. तो पुरुष केवळ राजरत्नच होय. कांहीं वेदपठण करून नंतर न्याय व व्याकरणाचें अध्ययन केलें होतें; व गाणेंहि चांगलें शिकले होते. श्रीमंत बाजीरावसाहेबांचे आग्रहावरून श्रीमंतासमोर फक्त पुराण वाचीत असत. श्रीमंतांपाशीं ५५ वर्षे आश्रयाला होते, व लक्षावधि रुपये मिळविले होते. श्रीमंताकडे श्रौतसंबंधीं व किरकोळ स्मार्त प्रकरणी जे संकल्प होत होते ते शास्त्रीबुवा सांगत असत. श्रीमंतांचे पदरीं राघवेंद्राचार्य अप्पाशास्त्री मीमांसक, तातुदीक्षित भडकमकर वगैरे खरी विद्वान् मंडळी होती. तरी धर्मशास्त्र शास्त्रीबुवांनींच सांगितलें पाहिजे. याप्रमाणेंच शास्त्रीबुवांचा लौकिक चोहोंकडे होता. असो. मजल दरमजल आम्हीं बेलसियास पोंचलों. एक बंगला आम्हाकरितां स्वतंत्र दिला होता तेथें सर्व मंडळी उतरली. रात्रीं फराळास पेढे, बरफी, दूध वगैरे राजांनें पाठविलें होतें. रात्रौ सर्वांस बिछाने व पांघरण्यास रजया वगैरे उत्तम बंदोबस्त होता. दुसरे दिवशीं शास्त्रीबुवा सांगू लागले कीं, मी अशीच मंडळी घेऊन चार पांच वेळ येथें आलों, परंतु हमेशा यश मिळत होतें. आतां पहावें येथून बारा कोसांवर कनोज क्षेत्र आहे. तेथें हजारों कान्यकुब्ज ब्राह्मण राहतात. तेथील गौड पंडित येथें फार येतात. त्यांचीं मनें आपल्याविषयीं शुद्ध नसून ते अनेक कूटार्थ काढतात. इतक्यांत गौड ब्राह्मण व राजोपाध्ये येऊन कुंडमंडप तयार केला होता तेथें ब्रोलावणें करून गेलें. शास्त्रीबोवांनीं सोमयाजीबोवांस पाठवून दिलें. तेथें सर्व कुंडें तयार होतीं, पद्मकुंड मात्र तयार होणें बाकी होतें. त्या ठिकाणीं दक्षिणी व गौड खडूनें कुण्ड तयार करीत होते, परंतु कुण्ड जमेना; तेव्हां शास्त्रीबोवांस पुन्हां बोलाविणे आले ते समयी मी विनंति केली कीं, मी जाऊन पाहतों, मग आपण यावें. असें सांगोन बागांत गेलों व मंडळीत सांगितलें कीं, आम्ही कुण्डार्क पाहिला आहे, तें पुस्तक आणून टीका पाहून मग खडूच्या रेघा माराव्या. तेव्हां पुस्तक आणले गेलें व पद्मकुण्डाची टीका वाचून मी रेघा मारण्यास आरंभ केला, तों त्या ब्राह्मणाचे कंठसूत्रच चुकलें होतें. तें उत्पन्न होतांच सर्व मंडळीस आनंद झाला व पद्मकुण्ड सिद्ध झालें. याप्रमाणें गौड मंडळींत प्रतिष्ठा चांगली होऊन शास्त्रीबोवांस यश आलें. असो. नंतर दुसरें दिवशीं प्रातःकाळापासून कर्मास आरंभ झाला, तें निर्विघ्न पार

पडलें. शेवटचे दिवशीं राजा व त्याचीं वायको व घरांतील देव बाण शालिग्राम सुद्धां जवळ घेऊन तुळेमध्यें बसवून भारोभार रुपये घातलें. नंतर अनुष्ठान समाप्त झालें. मजला सादस्य वर्ण दिला होता. भोजन झाल्यावर सभा करून द्रव्य वहुत वांटलें. शास्त्रीबोवांस दोनशें रुपये किंमतीची हिरवी शालजोडी दिली व १५० रुपये रोख दिलें. मजला पीतांबर व पन्नास रुपये मिळाले. खेरीज मधुपर्कावद्दल सहा रुपये मिळाले. याशिवाय शास्त्रीवुवांनी राजास सांगून मजला पन्नास रुपये निराळे देवविले. याप्रमाणें द्रव्यप्राप्ति होऊन दोन चार रोजांनीं आम्ही परत निघालों ते ब्रह्मावर्तास आलों. तेथें कांहीं दिवस राहून नंतर नैमिषारण्य व श्रीअयोध्येचे यात्रेस मंडळी ३०/३२ निघाली, त्यांचबरोवर आम्हीहि निघालों. ते कानपुरावरून लखनौस आलों. दुसरे दिवशीं शहरांत जाऊन वस्ती केली. पहाटेस गाड्या भरून जाऊं लागलों तों प्रहर दिवसास गोमती गंगेवर आलों. पुढें लोहेश्वरसांबाचे प्रसिद्ध ठिकाण लागलें. तेथें पूजा करून मजल दरमजल चालते झालों. वाटेनें सर्व निर्भय झालें होतें. नैमिषारण्यांत पोंचून प्रथम पंचप्रयाग तीर्थावर वस्ती केली. दुसरे दिवशीं क्षौर श्राद्ध वगैरे करून दधीच ऋषीचे आश्रमास गेलों; आणि नैमिषारण्यासंबंधीं तीर्थ व यात्रा करूं लागलों. एकंदर नैमिषारण्यक्षेत्र ८४ कोसांचें आहे व ती भूमी देवांची आहे, जागा तपश्चर्येस फार योग्य आहे. सर्व अरण्यांत दोन हातांवर पाणी महामूर आहे. क्षेत्र सर्व सपाट असून त्यांत दर्भ कुश, काश वगैरे यज्ञिय तृणांची समृद्धि आहे. पाऊस वहुधा दर महिन्यास पडतो. अरण्यांत वृक्षहि यज्ञिय म्हणजे आंबे, जांबूळ, उंवर, पळस वगैरे आहेत. तसेंच फुलझाडेंहि त्या वनांत अतिशयित आहेत. तांवड्या पांढऱ्या कण्हेरी, रासतुरे, पिंवळे तांवडे नागचाफे, मोठमोठ्या आपोआप झालेल्या सर्व प्रकारच्या जासवंदी, सर्व प्रकारच्या कोरांठी असून सदागुलाबाचीं ठोंबें तर बहुतच आहेत. मोगरा, चमेली वगैरे फुलांच्या वेली वृक्षांस वेष्टून आहेत. नैमिषारण्यांत सर्व ऋषि दीर्घसत्रास वसत. सूताचा पुराण सांगण्याचा चवुतरा पांच हात लांब दाखवितात. त्याजवर कोणी वसेल म्हणून त्याजवर उंच देवळासारखें करून वर कळस केला आहे. असो. याप्रमाणें गंगापुत्रांनीं ठिकठिकाणचा क्षेत्राचा महिमा सांगितला. एके दिवशीं गोमती गंगेचे पार जाऊन तीर्थें हिंडत होतों, उंबराचे वृक्षाची झाडी लागली. गंगापुत्रांनीं सांगितलें कीं, या उंबराचे फळांत कीड मुळींच नाहीं. तेव्हां सर्वांनीं फळें फोडून पाहिलीं तों फळें अंजिरा-

प्रमाणें होतीं, तीं भक्षण केलीं. कांहीं बायांनीं ओट्यांतून भरून घेतलीं, तीर्थे करून परत गोमतीवर येतांच गंगापुत्रांनीं सांगितलें कीं, येथील फळ येथेंच टाकावीं, न्यावयाचीं असल्यांस भारंभार सोनें इकडे ठेविलें पाहिजे. नाहीं तर यात्रा फुकट जाईल. तेव्हां त्या बायांनीं निरुपाय होऊन फळें तेथेंच टाकिली, आणि कोसभर ओझें वाळगल्याबद्दल गंगापुत्रास रागें भरल्या. असो. गोमतींत सूर्यावर्त म्हणोन उष्णोदकाचें तीर्थ आहे. त्यास गंधकाचा वास येत नाहीं. तेथें स्नान करून पांडवतीर्थावर आलों. तेथून रामतीर्थावर येऊन रात्रीं बिऱ्हाडीं वस्तीस आलों. दुसरे दिवशींहि हत्याहरण तीर्थावर श्राद्धें करून आणखी तीर्थांचें दर्शन घेतलें. नंतर ललिता देवीचें पूजन करून घरीं आलों. एकंदर नैमिषारण्याचें यात्रेस दहा बारा दिवस लागले. नैमिषारण्यांत कांटा लागेल तर गुलाबाचाच लागेल, इतर कण्टकवृक्ष तेथें मुळींच नाहींत. प्रत्येक गावाभोंवतालीं कळकीचे बेटांचें कुसूं असतें व आंत जाण्यास रस्ता एकच असतो. बाहेरून तोफ लाविली तरी गांवांत गोळा जाणें कठिण. परंतु मुशाफराचा असा बंदोबस्त केला होता कीं, गांवचे लोक मुशाफरावर पहारा करीत. कारण कोणतीही चोरी झाली तर ती गांववाल्यापासून भरून घेत असत. याप्रमाणें इंग्रजानें चोरीचा बंदोबस्त केला होता. तेथून अयोध्येकडे जातां १४ कोसःवर घोग्रा व शरयूचा संगम आहे. तेथें बिल्ववृक्ष फार आहेत. ते पाहून तेथें स्नानसंध्यादि करून दुसरे दिवशीं अयोध्येस पोंचलों. रामनवमीचे पर्वास लोक फार जमले होते. त्यांत बैरागी फार होते. रामनवमीचे सकाळीं स्नानें वगैरे करून रामाचें दर्शन घेतलें. तेथें दक्षिणी ब्राह्मण पुजारी होता. त्याचे कारण शोधतां त्याचे पूर्वज अतिमोठे रामभक्त गोदातीरीं गंगाखेड्यास रहात होते. प्रपंचाकरितां कर्ज फार झालें म्हणून तेथून निघून अयोध्येस येऊन शरयूत स्नान करून तप करीत बसले असतां एके दिवशीं स्वप्नांत रामचंद्रांनीं येऊन सांगितलें कीं, उदईक स्नानास शरयूत उतरलें असतां पायांस मूर्ति लागतील त्या काढून देवळांत बसवून पूजा करीत जावें. त्याप्रमाणें दुसरे दिवशीं मूर्ति सांपडल्या, त्या वाळूच्या असून एका ओळीनें एका प्रभावळीनें हातीं आल्या. त्या किनाऱ्यावर काढून ठेविल्या. ती खबर सर्व लोकांस लागली. अयोध्येचा राजाही तेथें आला, त्यानें मंदिर बांधण्याचा हुकूम केला. मंदिर तयार झाल्यावर मूर्ति नेऊं लागले तों त्या जागयावरून हालेनात. तेव्हां सर्वांनीं त्या ब्राह्मणास विनंति केली कीं, आपण मूर्ति न्याव्या, तेव्हां त्यानें सहज नेल्या.

असा साक्षात्कार पाहून त्या ब्राह्मणाकडे पूजा सांगितलेली अद्याप त्याच्या वंशजाकडे आहे. या रामास दक्षिणी लोक विशेष मानतात. याशिवाय एका देवालयांत रामाची सुवर्णाची मूर्ति आहे. रामनवमीशिवाय तिच्या दर्शनास १। रुपया पडतो. अयोध्येच्या दक्षिणेस हणमंतगढी म्हणोन लहानशी टेकडी आहे. तेथें मारुतीचें देवालय चिरेबंदी आहे. अयोध्येस वानर फार आहेत व माकडेही वरींच आहेत. अयोध्येस परशुरामबोवा म्हणून एक कोंकणस्थ ब्राह्मण महान साधु होऊन गेले. त्यांचा हल्लीं मठ प्रसिद्ध आहे. मठांत मारुतीची स्थापना आहे. परशुरामबोवा प्रथम वहुत दिवस शरयूतीरीं मठ बांधून होते. वृद्धापकाळीं शरयूवर जाववेना तेव्हां बोवांनीं शरयूस हात जोडून विनंति केली, तेव्हां शरयू ओघ वळवून मठापाशीं आली. या गोष्टीमुळें देशोदेशीं कीर्ति झाली. पुढें शिंदे सरकार दर्शनास आले, त्यांना मठाकडे तीनशें रुपयांची नेमणूक करून दिली. पुन्हा दुसऱ्या वेळेस आले तेव्हां विनंति केलीं कीं, मला कांहीं खर्च करण्यास आज्ञा व्हावी. तेव्हां आज्ञा केली कीं, वानरांस लाडूचें भोजन घालावें. तेव्हां वानर किती होतील म्हणून विचारितां पांच सहा हजार होतील म्हणून सांगितलें. नंतर आज्ञेप्रमाणें बारा पंधरा हजार बुंदीचे लाडू तयार करविले, तेव्हां साधूंनीं हणमंतगढीस जाऊन सर्व वानरांस विनंति केली, उदईक येथें रामप्रसादास यावें; व दुसरे दिवशीं लाडू हणमंतगढीवर नेऊन देवालयाभोंवतीं राशी केल्या. नंतर साधुमहाराजांनीं पुन्हा येऊन वानरांस विनंति करतांच सर्व वानर येऊन प्रत्येकानें दोन दोन लाडू नेले. असा तो साधु मोठा साक्षात्कारी होऊन गेला. त्याचा मठ अद्याप तेथें आहे.* असो. नवमीचे दुपारीं शरयूचें स्नान करून रामजन्म झाला त्या भूमीचे दर्शन घेतलें. या दर्शनास लाखों लोक आले होते, त्यांनीं तुळशी व सुपारी हातांत आणली होती. जन्मांची जागा मैदान असून पन्नास हात लांब व चाळीस हात रुंद अशी आहे. पक्का चुना ओतून कंबरभर उंचीचा चवुतरा केलेला आहे. दुसरें दिवशीं स्वर्गद्वार म्हणजे लक्ष्मणानें प्रायोपवेशन केलें त्या ठिकाणचें दर्शन घेऊन नागेश्वरावर पाणी घातलें; तेथें पाणी घातले

---

*हा परशुरामबोवा दिनकररावाचा चुलता होता, व तो आबामहाराज म्हणून कल्याणस्वामीचा यश (?) शिंयाचे पदरीं आहे त्याचा सांप्रदायी असून त्याचे लहानपणीं तेथील संस्थानाचा बंदोबस्त त्यानें उत्तम ठेविला होता.

म्हणजे यात्रा सफळ होते. अयोध्याक्षेत्र पूर्वीं लुप्त झालें होतें तें विक्रमानें तपश्चर्या करून नागेश्वरावर अयोध्यामहात्म्याचा शोध लावून कायम केलें अशी आख्यायिका आहे.

अयोध्येस २२ दिवस मुक्काम केला. तेथून डाक चालू झाली असें ऐकून घरीं तीर्थरूपास पत्र लिहिलं, तें असें:—घरून निघाल्यापासून सुखदुःख भोगीत आजतागाईत दिवस गेले प्रपंचाकरितां पैसा मिळाला नाहीं. अनेक तीर्थें मात्र पाहिलीं; येथून काशीस जाण्याचा विचार आहे. यास्तव त्रिस्थलीची आज्ञा व्हावी. 'आत्मा वै पुत्रनामासि' या श्रुतीवरून तीर्थविधि मी आपल्याकरितां करूं शकतों, तसेंच 'अवश्यं पितुराज्ञया' म्हणूनहि वचन आहे. तरी पत्रोत्तर काशीस ब्रह्मघाटावर केळकर यांचे पत्त्यावर यावें. याप्रमाणें मजकुराचें पत्र घरीं घातलें. नंतर आम्हीं गाड्या करून लखनौ शहर पाहून काशीस मजल दरमजल करीत पोंचलों. रस्त्यांत रावसाहेब हिंगणे नाशिककर यांची सोबत मिळाली होती. हिंगणे हे गृहस्थ पूर्वापार आहेत. आरंभीं दिल्लीचे बादशहाजवळ वकील शिवाजी राजाकडून होते. त्यांजपाशीं अंत नव्हता अशी दौलत होती; परंतु कालगतीनें ऐश्वर्य जाऊन गरीबीपैकीं दिवस आले होते. रावसाहेबांचें वय २५ पासून ३० पर्यंत होतें. अद्याप संतति झालेली नव्हती. कांहीं जहागीर बादशहाकडून दिल्लीजवळ होती, त्यापैकीं कांहींवर वहिवाट नसल्यामुळें सरकारांत गेली होती. व कांहींवर वहिवाट असून सावकाराकडे गुंतली होती. तीं सोडविण्याकरितां हिंदुस्थानांत दोन वर्षांपासून होते; तेथील काम आटोपून काशीस कांहीं इष्टेट होती त्याची व्यवस्था लावण्याकरितां जात होते. काशीस त्यांचा वाडा प्रसिद्ध आहे व मंगळागौरीचा घाटहि त्यांचे पूर्वजांनीं बांधिलेला आहे. बरोबर माणसें आचारी, शिष्य, गडी, पहारेकरी असून कांहीं आप्त बायका होत्या. मातुश्री व कुटुंबास बसावयास छकडी गाडी होती. आम्हीं उभयतां मिळून भाड्याचे घोडे करून जात होतों. रस्त्यांत बराच परिचय झाल्यावर हिंगणे यांनीं आम्हास आग्रह केला कीं, तुम्हीं निराळें भोजन करूं नये. परंतु आम्ही विनंति केली कीं, आंतां काशीयात्रेस जात आहों, तेव्हां परान्न सोडलें आहे, एऱ्हवीं भिक्षुक आहों. जन्मभर परान्न घेतोच आहों, आपला लोभ असावा. असो. काशीस पोंचल्यावर वरुणेवरून वक्रतुंड गणपतीस

येऊन साष्टांग नमस्कार करून नंतर आपले बिऱ्हाडी म्हणजे ब्रह्मघाटावर केळकर यांचे घरीं गेलों, तों तेथें घरून पत्र आले होतें. पत्र हरिपंताचे हातचें होतें. बारीक अक्षरांनीं लिहिलेलें दोन बंद होते. कारण घरून निघाल्यापासून आमचें पत्र घरीं नाहीं, व घरचे आम्हांस नाहीं तें पत्र वाचतां वाचतां माझे डोळयांस व ऐकणारांचे डोळयांसहि पाणी येऊं लागलें. घरीं सर्व मंडळी खुशाल आहेत, देशी येऊन सर्वांस काळजीतून काढावें. असा एकंदर पत्रांत निष्कर्ष होता. असो. पत्रीं वडिलांनीं आज्ञा यात्रेची दिली होती. त्याप्रमाणें सर्व यात्रा यथासांग केली. त्याचें वर्णन सविस्तर लिहूं लागलों तर ग्रंथविस्तार होईल. गयावर्जनहि केलें. नंतर प्रयागास आलों. तेथील यात्रा करून तेथून विंध्यवासिनीचेहि दर्शन करून आलों. याप्रमाणें सर्व यात्रा यथासांग झाल्यावर परत जाण्याचा विचार करूं लागलों.

---

## ९ : : : : : उपसंहार

### स्वजनमपि दुःखमग्रतो विवृतद्वारमिवोपजायते

मी मनांत असा विचार केला कीं, आपण प्रपंचाचे मदतीकरितां द्रव्य मिळवून घरीं न्यावें अशा हेतूनें निघालों, तो हेतु आपला साध्य झाला नाहीं. त्यास आपल्यास शक्ति आहे. मातापितराकरितां गंगेची कावड न्यावी हीच त्यांची सेवा करावी. असा मनांत निश्चय करून काशींशीं गोष्ट काढली. माझा पुष्कळ निषेध केला. कावड नेणें महाकर्म कठिण आहे. अनवाणी चालावे लागेल, कित्येक महिने कावड खांद्यावर वाहावी लागेल. गंगा कधीं कधीं जड होते, तेव्हां प्राणांतिक संकट प्राप्त होतें. इत्यादि पुष्कळ अडचणी लोकांनीं सांगितल्या. परंतु वाडवडिलांचे पुण्याईनें मी नेईन, असा निर्धार सांगितला. तेव्हां सूमुहूर्त पाहून यथाविधि कावड भरली, दोन रुद्र म्हणजे बावीस कुप्यांत गंगा भरून कांवडींत गवत वगैरे

घालून त्यांत भरल्या व कावड बंद केली. नंतर सुमुहूर्तावर आषाढ शुद्ध ५ चे दिवशीं प्रयागाहून निघालों तों मजल दरमजल करीत ब्रह्मावर्तास पोंचलों. तेथें बाबा कर्वे यांच्या वाड्यांत पुनः उतरलों व्रताविषयीं चौकशी करून एवढां नेम ठेविला होता कीं, श्राद्धादि उत्तरकार्याला जावयाचें नाहीं. शुद्ध परान्न मिळाल्यास घ्यावें. अनवाणी चालावयाचें व पागोटें घालावयाचे नाहीं. ब्रह्मावर्तास चार पांच दिवस मुक्काम करून ग्वाल्हेरीस जाण्याचे इराद्यानें रवाना झालों. बरोबर गाड्या आणखी होत्या. काकांस ओझ्यासुद्धां गाडींत बसावयाची सोय केलेली होती. असें चाललें असतां एके दिवशीं सकाळीं नित्याप्रमाणें प्रातर्विधि आटोपून स्नानसंध्यादि व लिंगार्चन करून गंगेस हळद-कुंकू वाहून कावड उचलून रस्ता चालूं लागलों, तों एकाएकीं ती कावड अति जड झाली. खांद्यास भार सहन होईनासा झाला. डावें उजवे खांद्यावर पुष्कळ फिरविली, परंतु भार सहन होईना; यामुळें गाड्यांच्या मागें मागें राहूं लागलों. संध्याकाळीं चार वाजतां लोक मुक्कामांवर उतरले. मी मोठ्या शर्थीनें तेथें पोंचलों. दोन्ही पायांस ढोंपराखालीं सूज आली होती, पावलेंहि सुजलीं. मजलेवर येतांच भोजन तयार होतेंच. भोजन आटोपून मंडळीस हकीकत सांगितली. मंडळी म्हणूं लागली कीं, पुत्राचे खांद्यावरून गंगा येऊन स्नान होणें महापुण्याईचें काम आहे, तुमच्यानें आतां चालविणें कठिण होईल. पायांस व पावलांस सूज आली आहे. त्यापेक्षा येथें शिवलिंग आहे त्यास गंगेचें स्नान घालावें तें ऐकून उत्तर न देतां नित्याप्रमाणें कावड उशागती ठेवून निद्रा करण्याचे हेतूनें आंथरुणावर बसलो. प्रथम मनोमय कुळस्वामीणीस नमस्कार करून नंतर गंगेची प्रार्थना केली, कुटुंबाकरितां द्रव्यार्जन करण्याचे हेतूनें निघालों तें साध्य झालें नाहीं, तेव्हां गंगेची कावड नेत आहे, कीं हा तरी जगांत लौकिक होईल. तरी मातापित्यांस गंगास्नान न घडेल व येथें शिवलिंगास गंगा वाहिली तर मी देशीं जाणार नाहीं. वैरागी होऊन बद्रीनारायणास जाईन. असा निर्धार करून गंगेस नमस्कार करून झोपी गेलों, तों स्वप्नांत बारा तेरा वर्षांची ब्राह्मणाची मुलगी कानांत मोत्याचे डागिने घातलेली हास्यमुख अशी येऊन बोलूं लागली. मला बहिणीचा भास झाला. "दादा तूं घाबरूं नको, मी तुझ्याबरोबर घरीं येणार." असें स्वप्न पाहून जागा होऊन पहातों तों पायांस सूज नाहीं व ठणकाहि नाहीं. तेव्हां अत्यानंद झाला; काकांस जागे करून स्वप्न सांगितले व पाय दाखविले. तेव्हां त्यांस आश्चर्य वाटून प्रत्यक्ष गंगेनें तुला दर्शन दिलें असें बोलून सर्वांनीं पुन्हां

निद्रा केली दुसरे दिवशीं नित्याप्रमाणें सर्व विधि आटोपून कावड घेऊन रस्ता चालूं लागलों तों ती हलकी वाटूं लागली. असो. मजल दरमजल करीत ग्वाल्हेरीस पोंचून वे. शा. भाऊ वैशंपायन दानाध्यक्ष यांजकडे उतरलों. तेथें मजला हगवणीचा उपद्रव झाला म्हणून केशवभट मांडवगणे झांशीवाले ग्वाल्हेरीस राहत होते त्यांचे येथें सोय चांगलीं पाहून मीच एकटा कांहीं दिवस जाऊन राहिलों तेव्हां त्यांस फार आनंद झाला. नंतर प्रकृती बरी झाल्यावर झांशी सागर मार्गानें कुच दरकूच हुशंगाबादेस आलों. सांडियाच्या घांटावर शांडिल्य ऋषीचें स्थान पाहिलें. हुशंगबाद नुकताच जिल्हा झाला होता. आम्ही शहरांत शिरतांच चौकीदार यानें आम्हांस चौकीवर बसवून घेतलें व नंतर साहेबापुढें उभें केलें. साहेबानें चौकशी केली तेव्हां आम्हीं केवळ यात्रेकरी आहों बंडापैकीं आमचेकडे कांहीं दोष नाहीं व मुंबई इलाख्यांत पेण तालुक्यातील वरसईचे राहणार आहों, अशी त्यानें पक्की खातरी करून घेतली. कारण तो साहेब ठाणे जिल्ह्यांत बरेच वर्षें कामगार होता. तेव्हां साहेबानें सांगितलें कीं, तुम्ही गंगेची कावड नेतां परंतु जागोजाग मुशाफराचा फार बंदोबस्त आहे तरी मी तुम्हास सर्टिफिकेट देतो तें बरोबर ठेवावें. नंतर सहेबांचे अभार मानून आम्हीं त्यांनीं दिलेलें सर्टिफिकेट घेतलें आणि आतां मुक्काम कोठें करावा या विचारांत जात असतां एक गौड ब्राह्मण भेटला तो आम्हांस घरीं घेऊन गेला. याप्रमाणें दैव अनुकूल असल्यामुळें सर्व गोष्टी सुरळीत होऊं लागल्या. आमचे जवळ द्रव्य कमी होतें. व पुढचा पल्लाही बराच लांबचा होता सबब द्रव्य कोठें मिळेल या विचारांत असतां समजलें कीं, इंदुरास किबे यांचे कन्येचा विवाह आहे. तेव्हां टेंभुरणीवरून नेमावरांत उतरून सिद्धेश्वर महादेवाचें स्थान आहे, हे हेमाडपंती देवालय असून दगडी कळसाचें आहे. तेथें श्री. अहल्याबाई होळकरीण इची टांकी सुरू आहे; म्हणजे सर्व गांव टांकीवाल्यास इनाम आहे. त्यांनीं प्रतिदिवशीं चिरे घडावे. बहुत चिरे झाले म्हणजे गंगेचा घांट बांधीत असतात. देवालय नर्मदातीरीं आहे. तेथें धोतऱ्याचीं फुलें अतिशय इतकीं कीं, एका दिवसांत लक्ष पूजन होईल. तेथें शिवपूजन करून मजल दरमजल इंदुरास पोचलों. देवास, धार, उज्जयनी वगैरे ठिकाणांहून हजारों ब्राह्मण आले होते. परंतु विद्वान पाहून परीक्षा घेऊन याद करीत आहेत असें समजलें तेव्हां आम्ही परीक्षेचे ठिकाणीं गेलों. तेथें विवाहप्रकरणीं कांहीं चर्चा चालली होती. 'कुलमग्रे परीक्षेत' म्हणून कन्येची परीक्षा सूत्रांत सांगितली.

वरपरीक्षेसंबंधानें कांहींच उल्लेख किंवा नियम नाहीं हें कसें? हा विषय होता. तेव्हां मीं सांगितलें कीं, वृत्तिकारांनीं व भाष्यकारांनीं 'अग्रे' या शब्दावर असें लिहिलें आहे कीं प्रथम मुलीची परीक्षा करावी. मग हीच परीक्षा वराची करावी. वृत्ति काढून पहावी. तेव्हां पुस्तक काढून पहातां तसें निघालें. या विषयानंतर किबे यांचे उपाध्ये दिनकरशास्त्री यांनीं त्यांस पांच सहा शंका अन्य होत्या त्या विचारिल्या, त्यांचेंहि निराकरण केलें. यानंतर आमचीं नांवें यादींत लिहिलीं गेली, व दिनकरशास्त्री यांनीं शिपाई देऊन कावडीसुद्धां आमचे बिऱ्हाड आपलें घरीं नेलें. लग्नास चार पांच दिवस राहिले तेव्हां गडगनेर होऊन बुंदीचे लाडू करून मुक्तद्वार सुरू झालें. तो लग्नसमारंभ फारच मोठा झाला. श्रीमंतपूजनापासून कर्माचे जागीं यादीचे ब्राह्मण येत असत. वरातीचे दिवशीं दाजीसाहेब किबे पत्नीसह मंडपांत येऊन बसले. तथापि वंशपात्रांतील दिवे लाविले नव्हते, तेव्हां दाजीसाहेबांनीं हरकत काय आहे म्हणून उपाध्यास विचारतां वराकडील तेल यावयाचें आहे म्हणून सांगितलें. असो. याप्रमाणें लग्न निर्विघ्न झाल्यानंतर यादीचे मंडळीस उत्तम मेजवानी होऊन प्रत्येकाची यथायोग्य संभावना झाली. याशिवाय राजाकडील नित्यदानाचेंहि कांहीं रुपये आम्हांस मिळाले. मग आम्ही इंदुराहून कूच केला. सातपुड्यांत एकदां रस्ता चुकून मी व आणखी एक सोबती असे भिल्लाच्या एका खेड्यांत पोंचलों. आम्हांस प्रथम भय वाटलें, परंतु भिल्लांनीं गंगेची कावड पाहून आमचें उत्तम आदरातिथ्य केलें. रात्रीं तेंथेंच वस्ती केली- सकाळीं त्यांनीं वाटाड्या देऊन आम्हास आमच्या मंडळींत पोंचतें केले, व रवानगी करतांना आम्हास तीन तीन रुपये दक्षिणा दिली. सातपुड्याहून खानदेशांत धुळें मालेगांवीं आलों. थंडी फार पडत होती. पायांचे पावलांस कापसाचें रजईचें फडके बांधले होते. तथापि पाय फुटून बोटांस भेगा पडल्या होत्या. परंतु राळ मेण वगैरेचें लुकण करून ठिकठिकाणीं भेगांत भरीत होतों. पिळगांवास पोहोंचल्यावर तेथून सप्तशृंगीचे देवीचें दर्शन करावें म्हणून निघून पायथ्याशीं वणींगांव आहे तेथें भोगमूर्ति अष्टदशभुजा आहे तिचें दर्शन घेऊन डोंगर चढलो. येथें हेमाडपंतांनीं टाकीनें पायऱ्या करविल्या आहेत. तीन कोस चढण आहे. वर मैदान मोठे असून ठिकठिकाणीं पाणी आहें. तेथें स्नानें करून पुन्हा चढाव लागतो तो चढून देवीचें दर्शन घेतलें. स्वरूप फार भयंकर आहे. मूर्ति दोन अडीच पुरुष उंचीची

आहे. दश भुजा आहेत. नथ लहानशा परातीयेवढी आहे. असो. पुन्हा डोंगर उतरून वणीस वस्ती केली. नंतर नाशकास पंचवटीस पोहोंचलों त्या दिवशीं कावड अति हलकी झाली होती. पंचवटींत कावडींतील कूप्यांच्या गुड्या आपोआप कावडींत उडून पडल्या. त्या समयीं तेथील ब्राह्मण मंडळी जमली होती त्यांनीं सांगितलें कीं, कावडींतील गंगा लवकर गोदेस भेटवा. विलंब झाल्यास कावडींत गंगा राहणार नाहीं. असें सांगतांच कावड तशीच रामतीर्थी नेऊन सर्व कुप्या गोदा–गंगेनें भरून गुड्या मारल्या व कावड विन्हाडी आणून ठेविली. नंतर तेथील सर्व यात्राकृत्यें काकांनीं केलीं व आम्ही त्र्यंबकेश्वरीहि जाऊन आलों. नंतर तेथून निघून पुण्यास वीरश्वेरशास्त्री चितळे यांचेकडे राजेबहादर यांचे वाड्यांत उतरलों. तेथें दोन चार दिवस राहून खालापुरास आलों. ब्रह्मावर्ताहून पत्र घरीं घातलें होतें, त्याजवर पत्र पाठविले नव्हतें. मध्यंतरीं रहाळकर म्हणून एक सोवती हुशंगाबादेहून वरसईस गेला त्यानें तेथपर्यंतचा कुशलतेचा मजकूर कळविला होता. त्याजवर पत्र नव्हतें. सवव घरची मंडळी काळजींत होती.

खालापुराहून निघून सायंकाळीं चार वाजण्याच्या सुमारास वरसईस नदीचे बांधावर सुखरूप येऊन पोहोंचलों. तेथें सहज रा. रा. अण्णासाहेब कर्वे भेटले त्यांस नमस्कार केला. तेव्हां त्यांनीं एकाएकी कसे भेटला, गुरव, शिंग घेऊन मंडळी पुढें घेऊन समारंभानें यावें, इत्यादि बोलून लागलेंच गुरवास बोलाविलें व दहापांच मंडळींस कळविलें. तसेंच तीर्थरूपांस निरोप पाठविला कीं, आपण घर सोडून येऊं नये, घरीं भेट झाली पाहिजे. नंतर आम्ही समारंभानें निघालों तो श्रीचे देवळास जातेसमयीं मोकाशी यांचे गणपतीचे मंदिरानजीक देवळाहून मातोश्री येत होती; हें पाहून मीं कावड तेथेंच खालीं ठेविली व पुढें होऊन पायांवर डोकें ठेविलें. तिनें विष्णु आहे असें ओळखून माझ्या गळ्यास गच्च मिठी मारली. त्या वेळेस दोघांची जी स्थिति झाली ती वर्णन करवत नाहीं. दोघांच्याही नेत्रांतून सारख्या धारा चालल्या होत्या, व एकासही बोलतां येईना. नंतर कांहीं वेळानें तूं घरीं जा मी आतां येतों असें सांगून वैजनाथेश्वराचें दर्शनास गेलों. तेथें पुष्कळच मंडळी जमलीं होती. मंडळीसमवेत घरीं आलों. घरांत जाऊन कुळस्वामिणीस नमस्कार करून कावड देवापाशीं ठेविली, बाहेर

येऊन तीर्थरूपांचे पायांवर मस्तक ठेविलें व चरणास मिठी मारिली. त्यांचेही नेत्रांतून पाणी आलें. नंतर क्रमानें सर्वांस भेटून मांडवांत मंडळी वसली होती त्यांच्या सर्वांच्या भेटी घेतल्या. नंतर मंडळींस पानसुपारी देऊन घरीं रवाना केलें. चि. सौ. कृष्णाबाईस गंगा-यमुनी झारी देऊन खुषी केलें. याप्रमाणें सर्वांस आनंद झाला. दिवे लावण्याचे सुमारास वे. विनायक जोशी भेटीस आले, तेव्हां मीं पुढें होऊन पायांवर डोकें ठेवून नमस्कार केला व त्यांच्या कृपेनें मोठमोठाल्या याज्ञिकीच्या विषयांत मोठाल्या सभांत लौकिक मिळविला असें सांगितलें तेव्हां त्यांस परमानंद झाला. रात्रौ भोजनोत्तर मातापितरांशीं बसून तीन वर्षांच्या प्रवासांत जीं सुखदुःखें भोगिलीं तीं निवेदन केलीं, तों रात्र थोडी राहिली. धोंडभट व हरिपंत बंधु पेणेस होते त्यांस बातमी लागून सकाळीं चार घटका दिवसास वरसईस आले. हरिपंताचे प्रेमास भरताचीच उपमा साजेल. येतांच माझे पायांवर मस्तक ठेवून गळयांस मिठी घालून दोन घटकापर्यंत रुदन करीत होता. तेव्हां सर्व संकटाच्या प्रसंगांची हकीगत सांगून केवळ तुझ्या तपश्चर्येनें मी पार पडलों म्हणून सांगितलें. धोंडभटही भेटला. याप्रमाणें सर्व कुटुंबास आनंद झाला. थोड्याच दिवसांत पेणेहून सामान आणवून मांवद्याचा बेत केला. पेण, वावशी वगैरे ठिकाणचीं सर्व भिक्षुक मंडळी व आप्तइष्टमित्र बोलावले. वरसईंत पुरुष व बायकांचा पहीपाहुणा केला. सर्व भिक्षुक मंडळी जमा झाल्यावर मागीलदारी रांगोळी घालून पाट मांडून त्यांजवर मातापितरांस बसविलें. नंतर विनायक जोशी बोवांनीं मजकडून संकल्प करविला व गंगापूजन करून यथाविधि मातापितरांस गंगोदकानें स्नान घातलें. सर्व भिक्षुक मंडळीस दक्षिणा दिली. याप्रमाणें वर्षभर खांद्यावर गंगा वाहून आणण्याचें सार्थक झाल्यानें मला जो आनंद झाला तो शब्दांनीं कोठवर वर्णन करावा! दोनप्रहरीं प्रयोजन झालें. सुमारें साडेचारशें पान झालें. पुरणाच्या पोळ्या केल्या होत्या. वडिलांनीं ब्राह्मणभोजनाचा संकल्प सोडून सर्वांस पळी पळी गंगा दिली. त्या समयीं आप्तइष्ट वगैरे सर्व मंडळी आली होती. कोणीहि राहिला नव्हता. रात्रौ मध्यरात्रीपावेतों जागरण झालें. याप्रमाणें तो दिवस अत्यंत उत्सवाचा व आनंदाचा गेला. दुसरे दिवशीं आलेली मंडळी आपआपल्या घरीं गेली व दोहोंचोहों दिवशीं कुटुंबाची मंडळी आपआपल्या उद्योगास लागली.

शुभं भवतु । श्रीपार्थिवलिंगरूपिणे सदाशिवाय नमः ।

विष्णुभट गोडसे, मु. वरसई

# परिशिष्ट

## तात्या टोपी व गुलसराईवाला

तात्या टोपी ग्वालेरची फौज घेऊन गुलसराईच्या जहागीरदाराशीं लढाई वगैरे माहिती पान २८–२९ वर आहे. परंतु मूळच्या प्रतीमध्यें ही माहिती थोडी निराळी आहे. तात्या टोपी ग्वालेरला जातांना गुलसराईस गेला व त्यानें पेशव्यांच्या नांवानें गुलसराईवाल्याकडे तीन लक्ष रुपयांची मागणी केली. गुलसराईवाल्यानें ती मागणी झिडकारून तात्याला लढाईचें आव्हान दिलें. तात्यापाशीं तेव्हां अवघे २५ स्वार होते, यामुळें लढ्याच्या आव्हानाकडे पाठ फिरवून तो ग्वालेरास निघून गेला. तेथली फौज मिळाल्या-वर त्यानें गुलसराईवाल्यांशीं लढाई केली. गुलसराई येथें लढाई करण्या-पूर्वी तात्या तेथें गेला होता व गुलसराईवाल्यांनीं त्याचा अपमान केला, ही माहिती वैद्यांनीं गाळली आहे.

## गंगाधररावांचें विलक्षण चरित्र

झांशीच्या लक्ष्मीबाईचे यजमान गंगाधरराव तृतीय प्रकृतीचे पुरुष असल्याचें रहस्य ' नवरा तर षंढच होता. ' या वाक्यांत ( पान ४८ ) आलेलें आहे. मूळच्या हस्तलिखितांत याविषयीं अधिक चर्चा आहे. गंगाधरराव स्त्रियांची वेशभूषा धारण करून दिवस काढीत असे. स्त्रियांची मासिक अस्पृश्यताहि पाळीत असे. चवथे दिवशीं न्हाणाचा समारंभ करी व नंतर पलंगावर निजून पलंगाखालीं अग्नि ठेवून केश वाळवीत असे. तृतीय प्रकृति असूनहि याच्या पहिल्या बायकोला एक पुत्र झाला होता व ती पतिव्रता साध्वी होती असें सांगतात. असें ' प्रवास '

कर्त्यानें लिहिलें आहे. पुरुषत्वप्राप्त्यर्थ केल्या जाणाऱ्या एका गलिच्छ उपायाचाहि या हकीकतींत निर्देश आहे. झांशीचा रेसिडेंट गार्डन यानें गंगाधररावाला स्त्रीविशयाबद्दल प्रश्न केला असतां बांगड्या भरण्याचा जो खुलासा त्यानें रेसिडेंटाजवळ केला तो छापील मजकुरांत आलेला आहे. ( पान ४६ ) गंगाधरराव राज्यकारभार कसा करडेपणानें करीत होता, याची माहिती कै. चिंतामणराव वैद्यांनीं गाळलेली नाहीं.

## बुंदेलखंडांतील स्त्रिया

बुंदेली स्त्रियांविषयीं मोघम वाक्यें पान ५१ वर आहेत. मूळ हस्तलिखितांशीं ताडून पहातां थोडा निराळा मजकूर आढळतोः—बुंदेलखंडाचें पाणी पुरुषास चांगलें नाहीं. तेथें षंढ फार निपजतात. शेंकडा पंचवीस षंढ समजले पाहिजेत. असेही लोक आढळले कीं, एखादा पुरुष स्त्रीचे मनांत भरल्यास तिनें आपल्या नवऱ्यास तसें सांगावें. नवऱ्यानें त्याच्याशीं स्नेह वाढवावा आणि त्याला आपल्या घरीं येण्याजाण्याची वहिवाट पाडावी. मग एखाद्या दिवशीं नवऱ्यानें कामाचें निमित्त काढून बाहेर जावें व स्त्रीच्या मनांत भरलेल्या पुरुषाला आपलें घर मोकळें करून द्यावें; असा प्रकार जागोजाग आढळला. कुंटिणी बायकांच्याहि जागा असत. सूर्यास्ताचे संधींत कितीक लोकांच्या स्त्रिया त्या जागीं जाऊन आपली इच्छातृप्ति करून येत. यावरून या शहरांत व्यभिचाराचा फारसा विधिनिषेध नाहीं.

## झांशीच्या किल्ल्यांतील नाटकें

ग्वालेरास आलेल्या नाटक मंडळीला बोलावून झांशीस आणलें. त्यांचीं नाटकें करविलीं वगैरे वृत्तांत पान ५८ वर आहे. नाटक मंडळीला बाईसाहेबांनीं शिधा सुरू केला. चौथे दिवशीं नाटक शहरवाड्याचे चौकांत झालें. बाईसाहेब नाटक पहात एक कलाक बसून मध्येंच उठून गेल्या. तें नाटक जमलें नाहीं. नाटक दक्षिणी भाषेंत असल्यामुळें रांगडे लोकांस समजलें नाहीं. तें नाटक हरिश्चंद्र राजाचें होतें. दुसरें नाटक फक्त दक्षिणी लोकांना आंत घेऊन उखाचित्ररेखेचें झालें. या नाटकास बाईसाहेब तीन कलाक बसल्या होत्या. नंतर किल्ल्यांत नाटकें होऊं लागलीं. त्यास बाईसाहेब बसत होत्या. मसकीचा वगैरे पडदा आडवा लावून पहाण्यास फक्त

दरबारची मंडळी मात्र येत असे, अशींही कांहीं नाटकें झालीं. नंतर पहाण्यास शहरांतील अगर किल्ल्यांतील पुरुष कोणी नाहीं अशा रीतीचें दरबारी मंडळीच्या बायकांसाठीं पिछाडीचे तिसरे मजल्याचे चौकांत नाटक झालें. बाईसाहेबांनीं समोर बसून नाटक पाहिलें. याप्रमाणें एकंदर पंधरा नाटकें झांशींत झालीं. [ सरकारी खजीन्यांतील हवीं तीं वस्त्रें--भूषणें नाटकवाल्यांना नाटकासाठीं मिळत असत हा मजकूर हस्तलिखितांत नाहीं. ]

## झांशींतील इंग्रजांचा वृत्तांत

झांशीस बंड होण्याचीं चिन्हें दिसूं लागल्यावर गोरे लोक राणीसाहेबांनीं संरक्षण करावें, अशा अर्थाची विनंति करण्यास आले तेव्हां राणीसाहेबांनीं 'माझ्यानें रक्षण होणार नाहीं; तुम्ही आपला जीव वांचण्यासाठीं वाटेल ती तजवीज करा ' असा जबाब दिला व त्यांना वाटेस लावलें. रात्रीं गॉर्डन एकटाच राणीच्या भेटीस आला व त्यानें 'आपली बायको नाजूक फार आहे. हिंदुस्थानांतील युरोपियन लोकांच्या बायकांमध्यें हिच्या तोडीची सुरूप व चतुर बायको नाहीं; शिवाय ती साता महिन्यांची गरोदर आहे. तिला वाड्यांत ठेवावी; दळणकांडण करून राहील ' अशी राणीची मनधरणी केली. राणीसाहेबांनीं तिच्या रक्षणाचें आश्वासन दिलें. दुसऱ्या दिवशीं साऱ्या युरोपीयन बायका राणसाहेबांच्या वाड्यावर आल्या. राणीसाहेबांनीं वाड्यांतील एका रिकाम्या जागीं सर्व मुलाबायकांना कैद करून ठेवलें. नंतर लष्करानें दंगा करून युरोपियन पुरुषांस ठार मारलें. [ बंडवाल्या शिपायांनीं बायकामुलांसकट युरोपियनांचा संहार केला. बायकामुलें जर राजवाड्याच्या संरक्षणांत असतीं तर तीं बंडवाल्याच्या तावडींत कशीं सांपडलीं याचा खुलासा प्रवासांत नाहीं. युरोपियन लोकांच्या कत्तलीची हकीकत इतिहासाशीं विसंगत आहे. इतिहासाप्रमाणें बायकामुलांसह युरोपियन लोक झांशीच्या किल्ल्यांत शिरले. बंडवाल्यांशीं त्यांनीं लढाई केली. बंडवाल्यांनीं रक्षणाचें आश्वासन दिल्यावरून ते किल्ल्याबाहेर आले आणि नंतर त्यांची कत्तल झाली. ]

## फितुरी विरुद्ध शपथा

झांशी येथें इंग्रजांशीं लढाई करण्याची तयारी चालली असतां झांशीच्या-राणीसाहेबांशीं भाऊ मानलेल्या बाणपुराच्या राजाला एके दिवशीं ग्वालेरची

डाक लुटण्याची संधि मिळाली. डाक तपासतांना त्याला झांशीच्या कोणा सरदारांच्या नांवें लिहिलेलें पत्र सांपडलें. त्यावरून झांशींत फितूर असल्याचा संशय येऊन तो राजा झांशींत आला. तेथें त्यानें आपली बायका-मुलें संरक्षणार्थ ठेवलेलीं होतीं. त्यांना भेटून तो राणीसाहेबांकडे किल्ल्यांत भेटीस गेला. राणीसाहेबांनीं फितुरीच्या पत्राची हकीकत ऐकून सर्व लोक व सरदार बोलावून आणिले. फितुरीचा छडा लावणें शक्य नसल्यानें यापुढें कोणीहि फितुरांत सामील होणार नाहीं अशा सर्वांकडून शपथा घेणें हाच उपाय होता व तोच राणीसाहेबांनीं अंमलांत आणला. बेलभंडार ठेवलेल्या ताटास हात लावून शपथ उच्चारणें असा या शपथेचा विधि होता, तो सर्वांनीं केला व जमलेल्या लोकांस पानसुपारी, अत्तरगुलाब वांटण्यांत आल्यावर ते घरोघर गेले. या बैठकींत राणीसाहेबांना झांशी सोडून काल-पीस पेशव्यांच्या आश्रयास जाण्याचा सल्ला मिळाला होता, पण त्यांनीं स्वाभिमान दर्शवून हा सल्ला मोडून काढला. पेशव्यांच्या फौजा मदतीस बोलावण्याला त्या कबूल झाल्या. या मजकुरांत भुलाजीसिंग अशा एकाच नांवाचा निर्देश आहे. याचा खुलासा पुढें आलेला आहे.

यानंतर बाणपुराचा राजा आपल्या बायकामुलांना झांशीबाहेर घेऊन गेला. या राजाचा वृत्तांत पान ६३–६४ वर आहे. वरील घटना त्याचा इंग्रजांनीं मोड केल्यानंतरची आहे.

## शिकारखान्याचा विध्वंस

• इंग्रजांचा दारूगोळा संपला व ते उद्यां जाणार अशी बातमी समजल्या-मुळें राणीसाहेबांचा हुरूप वाढला अशी माहिती (पान ७४) पुस्तकांत आली आहे. पण पुढील वृत्तांत नाहीं. तो असाः—‘ इतक्यांत ( बातमी ऐकिली तेव्हांच ) दरवाजावर मदोन्मस्त हत्ती बांधला होता, त्या पलिखान्यावर दोन चार गोळे तोफेचे पडले. त्यांपैकीं एक गोळा हत्तीचे पाठीवर पडून पाठ फार भाजली. तसेच गोळे घोड्यावरही पडून घोडे उत्तम उत्तम फार मरण पावले. बाईसाहेबांचा शिकारखाना होता तेथें पोपट देशोदेशींचे व साळुंक्या, मैना, मोर वगैरे अनेक पक्षी व हरण, सांबरें वगैरे पशु शिकारखान्यांत होते. तेथें तोफेचे गोळे पडतांच ओरडून ओरडून त्या सर्वांनीं प्राण एकदम सोडले. त्या अनर्थास पार नाहीं.’

## 'प्रवास' कर्त्यांचें स्वप्न

झांशीच्या लढाईंत अकराव्या दिवशीं रात्रीं 'प्रवास' कर्त्यांनें आपल्या गांवच्या वैजनाथेश्वराचा धावा केला. (पान ७३) त्यानंतर त्यास निद्रा लागली व स्वप्न दिसलें:—कोठेंतरी दोन चारशें माणसांचा समुदाय चालला होता. वाटेंत एक नदी लागली. तिच्यांतून पलीकडे जाण्यासाठीं माणसें पाण्यांत उतरलीं. आम्ही दोघेही तसेंच जात होतों. नदीच्या मध्यावर एकाएकीं पाणी चढूं लागलें आणि त्यांत वाहून जाणार म्हणून सर्वांनीं आकांत आरंभला. गळ्यापर्यंत पाणी येऊन कित्येक जण वाहून जाऊं लागले. इतक्यांत कडेस लागण्याकरितां आम्ही झटून जवळ जवळ गेलों तों कोणी पूर्व वयाचा गौरवर्णाचा पुरुष—पैल्वानासारखा पुरुष पाण्यांत उभा राहून दोन्ही हात पुढें करून आम्हांस असें म्हणूं लागला कीं, तुम्ही भिऊं नये. मी तुम्हांस या जीवभिर्तीतून काढण्यास येथें आलों आहे. घाबरूं नका; पुढें या म्हणजे हात देऊन कांहीं करतों, तों तोफेचा आवाज झाला. मी जागा झालों. तीं. काकास स्वप्न सांगितलें. काकांनीं ऐकून. आपल्यास भय जीवाचें नाहीं असें मानून राहिलों.

## भुलाजीसिंगाची दगलबाजी

पान ७४ वर दक्षिण बाजूची तोफ बंद पडल्याची माहिती आहे. त्याचें कारण मूळ प्रतींत पुढीलप्रमाणें दिलें आहे:—बाराव्या दिवशीं उजाडतां दीड घटका रात्रीस शहराचे दक्षिणेस भुलाजीसिंग परदेशी सरदार चार हजार फौजेचा मालक लढत होता. त्याच्या ताब्यांतील दोन तोफांस बाजरीच्या थैल्या गोळ्याच्या ऐवजीं फितूरपणाचे योगानें दिल्या. ते आवाज ऐकतांच सर्व लोकांचे धीर तुटून गर्दी जाहली. सर्व लढवई लोक घाबरून जातात तों आणखी आवाज पांच चार वायबार जाहले तों उजाडलें.

## भुलाजीसिंगाची फितुरी

झांशीची लढाई सुरू होण्यापूर्वीं चार महिने एक द्रावीड ब्राह्मण झांशींत बिऱ्हाड करून रहात होता. त्याला मराठी भाषा उत्तम येत होती. प्रतिदिवशीं सकाळीं स्नानसंध्या आटोपल्यावर कपाळीं पिंजर लावून बाहेर पडे व मुत्सद्दी आणि सरदार लोकांना पाळीपाळीनें भेटत

असे. आपण गरीब आहों, काशीयात्रा करावयाची आहे, निदान दोनशें रुपये जमविले पाहिजेत ' असें तो सांगत असे...मात्र राणी-साहेबांच्या अनुष्ठानांत त्यानें कधींच भाग घेतला नाहीं. हा ब्राह्मण झांशींत फितुरी माजविण्याकरितां आलेला होता. शेवटीं त्याला भुलाजीसिंग हा एक सरदार फितूर करतां आला. त्याच्या फितुरीनें झांशीची लढाई लवकर संपली. पुढें इंग्रज अधिकाऱ्यांनीं त्याचा तपास आरंभला. फितुरीबद्दल आपल्याला इंग्रज मोठें बक्षीस देतील असें वाटून तो अतिशय उत्साहानें इंग्रज अंमलदारास भेटला. ' किती पगार मिळत होता, किती पिढ्या नोकरी झाली, मुलेंबाळें किती आहेत.' असे प्रश्न विचारून झाल्यावर ज्याच्या चार पिढ्या झांशीच्या नोकरींत गेल्या त्यानें निमकहरामी करावी हें इंग्रज अंमलदारास रुचलें नाहीं. त्यानें भुलाजीसिंगाचा शिरच्छेद करविला व त्याचा भाऊ आणि मुलगे यांस बंदुकीच्या गोळ्यांनीं ठार केलें. हा भुलाजीसिंग बेलभंडाराची शपथ घेणारांत होता.

तो मद्रासी ब्राह्मण इंग्रजांनीं झांशी काबीज केल्यावर इंग्रजांची खूण गळ्यांत बांधून निर्भयपणें शहरांत फिरत असे. झांशीच्या राज-वाड्यांतील उत्तम उत्तम वस्तु त्यानें आपल्या कामाचें बक्षीस म्हणून फुकटांत इंग्रजांच्या कृपेनें लाटल्या. ही माहिती ' प्रवास ' कर्त्यानें ' लोकांच्या तोंडून ऐकली ' असें नमूद केलें आहे.

## ग्वालेरवरील स्वारीचें ज्योतिष

बाजीराव पेशव्यांच्या पदरीं ' ज्योतिषाचा पहाणार सिद्धान्ती शास्त्री प्रवीण ब्राह्मण होता. पुष्कळ वर्षें होता. बाजीरावाची त्यावर मर्जी होती. त्यानें सर्व वर्तवून ठेवलें होतें. बाजीरावामागें नानासाहेबानें त्याचें चालविलें. पुढें ब्रिठूर कानपूर नानासाहेबांच्या हातून गेल्यावर तो दोन चार शिष्यासमवेत जालवणास जाऊन राहिला. काल्पीस पराभव झाल्यावर या शास्त्रीबोवाच्या मतानुसार चालावें असें मनांत आणून तात्या टोपे व रावसाहेब यांनीं त्याचा शोध केला. जालवणास असल्याचें कळतांच तेथें हे दोघे जाऊन त्याला भेटले. शास्त्रीबुवांनीं ' पाटी घालून गणित करून ' पश्चिमेस जावें. तिकडे यथेच्छ द्रव्यप्राप्ति होईल, याप्रमाणें सांगितलें व त्यावरून तात्या—राव-साहेबांनीं ग्वालेरवर स्वारी केली. ' प्रवास ' कर्त्यांच्या चुलत्याच्या ओळखीचा

ब्रह्मावर्ताकडील एक रांगडा ब्राह्मण काल्पीकडून येत असतां वाटेंत भेटला व त्यानें ही माहिती सांगितली. हा ब्राह्मण गोडसे चुलत्या–पुतण्यांना चोरांनीं लुबाडल्यावर भेटला. (पान ९८) मूळच्या लिखाणांत 'आपल्याला फत्तेपुरास पोंचवाल तर आपण पांच रुपये देऊं' असें 'प्रवास' कर्त्यांनें आश्वासन दिलें व मग त्यांनीं यांना नागवून उलट खर्चासाठीं पांच रुपये दिले असा मजकूर आहे.

## नारूचें दुखणें

ज्या दिवशीं बांद्यास पोंचावयाचें (पान ११९) त्या दिवशीं सकाळीं 'प्रवास' लेखकाच्या सर्वांगास कंडू सुटली. अंग खाजविलें तर अंगावर दाट तांबड्या गांधी उठल्या. दोन घटकांनीं कंडू थांबली; पण उजव्या पायाच्या पोटरीचे सुमारास एक पांढरा फोड आल्याचें आढळलें. हळू हळू शहरांत जाऊन एका देवळांत पडशी टाकली. पायाला सूज येऊन उभेंहि राहवत नव्हतें. हा फोड नारवाचा होता. कसेंबसें पेशव्याकडे जाऊन, दोन रुपये दक्षिणा घेऊन, भोजन करून, 'प्रवास' कर्ता बिऱ्हाडीं आला. पाय फारच ठणकूं लागला. तेव्हां 'गवऱ्याचा विस्तव तयार करून चाफ्याच्या पानास तेल लावून' पाय शेकण्याचें काम चालविलें. ईश्वराचा धावा केला. रात्रभर झोप नाहीं. सकाळीं इतर बिऱ्हाडकरू प्रातर्विधीसाठीं बाहेर पडल्यावर तेथें एक बैरागी आला. त्यानें शेजारच्या बागेंतून पाला आणला, तो हातावर चोळला व नारवाच्या जागेवर आणि इतर भागांतील सुजेवर त्या पाल्याचा रस चोळला आणि चोथा झोळींत टाकला. 'तुम्ही थोडी झोप घ्याल तर रोगपरिहार होईल' असें सांगून तो बैरागी निघून गेला. दुपारीं झोंप चांगली लागली. तों ठणका थांबलेला, सूज उतरलेली असा अनुभव आला. अंथरुणांत नारवाचा दोरा पडला होता, तो टाकून दिला. तो बैरागी पुनः भेटला नाहीं. तो ईश्वरच समजला पाहिजे, असा नारूच्या दुखण्याचा वृत्तांत आहे.

## लखनौ शहराची सहल

अयोध्येच्या यात्रेंत लखनौ शहर पहाण्याची 'प्रवास' कर्त्याला इच्छा झाली. "आपण येथें रुपये धर्मकृत्यांत बरेच उडविले, परंतु आपण

चैनींत पैसा उडविला नाहीं. त्यास बुद्धिपूर्वक लखनौस जाऊन स्वइच्छ नाच वैठकी पाहून सुख भोगून मौजही पाहूं " असा विचार करून काकाला अयोध्येंत सोडून 'प्रवास' कर्ता लखनौस गेला. 'लखनौंत उत्तम माडीवर परभारें जाण्यायेण्यास वाट अशी जागा भाड्यानें घेतली.' केसरिया वागेसारखीं प्रेक्षणीय स्थळें पाहिलीं. 'लखनौंत गाणार स्त्रिया मुसलमानी अति उत्तम' या लौकिकाप्रमाणें शोध करून 'त्या त्या यवनी स्त्रियांचीं गाणीं वहुत ऐकिलीं; पैसा त्यांत वराच खराव केला व कांहीं गवई लोकांचेंही गाणें ऐकून त्यासही द्रव्य वरेंच दिल्हें. प्राति दिवशीं रात्रौ जागरण होत होतें; परंतु चहा कॉफी वरचेवर घेत होतों.' सारख्या वयाचे सोवती वरोवर असल्यामुळें 'फार चैन होत असे.' लखनौ सोडा-यचें ठरलें तोंच एक नामांकित वंगाली खेळ आला, तो पाहिला. खेळ करणारास द्रव्य देऊन खूष केले. नंतर अयोध्येस आलों.

## चोरीचा वंदोवस्त

अयोध्येच्या वाटेवर एका मुक्कामीं यात्रेकरूंची चोरी होऊं नये म्हणून दहा वारा माणसें जागत आहेत असें 'प्रवास' कर्त्यांच्या लक्षांत आलें. (पान १२९) जागण्याची गरज नाहीं, असें त्यास म्हटलें तेव्हां त्यांनीं कोणाची चोरी झाल्यास इंग्रजांकडून किती कडक शासन होत असे याचा पाढा वाचला. एकदां एक इंग्रज अधिकारी ब्राह्मणाचें सोंग घेऊन आला. पण त्याच्या तोंडांतून दारूची दुर्गंधी चालली होती. तो आपलें सामान पारावर ठेवून निजला. रात्रीं चोरांनीं त्याचें सामान लांवविलें. त्यानंतर त्या गांवीं शिपायांची तुकडी घेऊन तो अधिकारी आला. त्यानें गांवांत सांपडले ते सारे पुरुष ठार मारले. या प्रकारामुळें सर्वत्र दहशत वसून चोरी होईनाशी झाली. गांवकरी देखील कोणी नवखा मनुष्य आल्यास त्याच्या रक्षणाची काळजी घेऊं लागले. हे गांवकरी शिक्षेच्या भीतीनें जागत होते वगैरे माहिती पुस्तकांत नाहीं. [ या प्रवासांत नैमिषारण्याच्या दक्षिण वाजूनें जात असतां वंडवाल्यांच्या व इंग्रजांच्या झटापटींचा 'प्रवास' कर्त्याला अनुभव आला. वंडवाल्यांनीं नेपाळांत पळ काढला. ]

## अयोध्येचा जीर्णोद्धार

अयोध्या क्षेत्राला विक्रमानें नांवारूपास आणलें, अशा अर्थाचें एक

वाक्य पुस्तकांत आहे. पान १३१. मुळांत याबद्दल जास्त माहिती आहे ती अशी:—विक्रमराजाला पृथ्वीवरील सप्तपुऱ्या कोठें आहेत याचा शोध करावा असें वाटलें. त्याच्या दूतांनीं अयोध्येचा पत्ता नाहीं असें सांगितलें, परंतु शरयू-घागरा नद्यांच्या संगमाजवळ कोठें तरी अयोध्या होती असें कळल्यावरून विक्रमराजानें शरयूच्या तीरावर तपश्चर्या आरंभली. भिक्षेची बाजरी पाण्यांत भिजंवून खाणें एवढाच त्याचा आहार होता. १२ वर्षें याप्रमाणें तपश्चर्या झाल्यावर एका रात्रीं अयोध्यादेवी स्वप्नांत आली. 'अयोध्या'—माहात्म्याच्या आधारानें तपास केल्यास नागेश्वरापासून तीर्थें व देवता सर्व सांपडतील असें देवीनें आश्वासन दिलें. राजानें त्याप्रमाणें करून अयोध्यापुरी पुनः वसविली. राजा विक्रम तपश्चर्येच्या काळानंतर अयोध्येस सात आठ वर्षें होता. अयोध्येस नागेश्वराचें माहात्म्य विशेष आहे; कारण अयोध्येचा लोप झाल्यावर तेवढाच देव शिल्लक होता. अयोध्येच्या जीर्णोद्धाराला हा देव उपयोगी पडला. नागेश्वराची एवढी महती कां ? या प्रश्नावरून प्रवासकर्त्यानें अयोध्येच्या पुनरुत्थानाची वरील माहिती सादर केली आहे.

## हरिश्चंद्राच्या छळाचा प्रदेश

अयोध्येहून काशीस जातांना मार्गांत कांहीं अंतरापर्यंत गोखरू व पांढऱ्या दगडाचीं टेकाडें लागलीं. त्यांवर गवत मात्र नव्हतें. ते दगड हातांनीं रगडल्यास त्यांचा भुगा होऊन जातो; हा प्रकार पाहून शोध करतां कळलें कीं, हरिश्चंद्र स्त्रीपुत्रासह काशीस जात असतां विश्वामित्रानें त्याचा छळ करण्यासाठीं सूर्याच्या विशेष कळा खुल्या करून पाणी नाहींसें केलें. जमिनीवर गोखरू पसरलें. सूर्याच्या त्या प्रकाशानें दगड चुन्यासारखे बनले. हरिश्चंद्राच्या छळाची साक्ष अजून राहिली आहे. ही माहिती हिंगण्यांनीं विष्णुभटजी व रामभटजी यांना आपल्याकडे जेवण घेण्याचा आग्रह केला (पान १३१) त्यापूर्वीं आलेली आहे.

## गांठोड्याकरितां वानराला नैवेद्य

अयोध्येंतील देवदेवळांचा कै. चिंतामणरावांनीं संक्षेप करून मुख्यतः

रामासंबंधाची उपयुक्त माहिती शिल्लक ठेवली आहे. रामाचीं देवळें सुमारें ४०० पासून ५०० पर्यंत आहेत. इतर तीर्थें व नागेश्वर, अंबा वगैरे देवस्थानें बहुत आहेत. अष्ट हरी आहेत. झाडी फार आहे वगैरे तपशील दिलेला नाहीं. वानर—माकडांच्या उपद्रवाची गोष्टही गाळली आहे. एका पुणेकरीण विधवा बाईनें आपलें गांठोडें गच्चीवर नेऊन ठेविलें. तेथें एक यात्रेकरूंचीं गाठोडीं पळवून जिलबीचा नैवेद्य मिळाल्यास अशीं पळविलेलीं गांठोडीं टाकून देण्याच्या कामीं सरावलेलें हें एक वानर होतें. त्या वानरानें बाईची नजर चुकवून तें गाठोडें उचलून झाडावर नेलें. 'गाठोडींत करंडा आहे, त्यांत मोहरा दोन व पुतळ्या आहेत. वानरानें घात केला' असें ती बाई वानराचें कृत्य समजल्यावर ओरडूं लागली. तेव्हां वानराचें इंगित माहीत असलेल्या एका भटजीनें तें गाठोडें सोडविण्या-करितां जिलब्या भरून द्रोण आणला व तो झाडाखालीं ठेवून दिला. मग आपल्या संवयीप्रमाणें वानरानें गाठोडें टाकून दिलें व जिलब्यांवर ताव मारला. याप्रमाणें गाठोडें परत मिळालें म्हणून बाईनें रामाच्या नांवें लोकांस एक रुपयाचे पेढे वाटले. आधीं जिलब्यांकरितां आठ आणे खर्ची पडले होते. [ अयोध्येच्या यात्रेचें वर्णन पान १२८—१२९ मध्यें आहे. वरील गोष्ट हनुमंतगढीच्या माहितीपूर्वी 'प्रवास' कर्त्यानें मुळांत लिहिलेली आहे. ]

## काशींतील आचार

काशीक्षेत्रीं गेल्यावर 'प्रवास' कर्त्याला जें घरचें पत्र मिळालें (पान १३२) त्यांत त्याला मुलगी झाली होती. नांव गोदावरी ठेवलें होतें. दोन वर्षांची होऊन ती मेली, अशी हकीकत होती. वैद्यांनीं या हकीकतीबरोबर काशीच्या यात्रेचाहि तपशील गाळला आहे. आणखी गाळलेला मजकूरः—"काशीस अनेक आचार भ्रष्टासारखे दिसतात त्या लोकांची कृति बरावर नाहीं असें आम्ही समजून एका विद्वानास प्रश्न केला कीं, हीं काशी म्हणजे मुख्य विद्यापीठ; आचारविचार येथें उत्तम असावा, पण त्याचा लोप दिसतो हें कसें;" असें विचारतांच त्यानें सांगितलें कीं "एकवीस स्वर्ग सोडून काशी क्षेत्र आहे. या भूमीसारखें दुसरें स्थान नाहीं. याचा शास्त्रार्थही निराळाच आहे. तो पहातां येथें पाप मुळींच होत नाहीं, अशी आमची समजूत घातली."

## गंगेची कावड

काशींत गेल्यावर ८।१० दिवसांनीं रा. ऱ्हाळकर, वरसईकर भेटले. त्यांनीं गोडसे यांच्याबरोबर बेचाळीस लिंगांची व अंतरगृहीं पंचक्रोशी वगैरे यात्रा संपविली. नंतर गयेस जाऊन, तेथील कृत्यें करून ही मंडळी काशीस आली व तेथून प्रयागास गेली. दारागंजांत जाऊन राहिली. तीर्थकृत्यें उरकल्यावर पूर्वीच्या ओळखीमुळें वे. शा. सं. पुरुषोत्तम बाबाकडे भेटीस गोडसे गेले तेव्हां त्रिस्थळी सेतु नांवाचा त्यांच्याजवळ ग्रंथ होता. त्याच्या आधारें त्यांनीं गंगेच्या कावडीचें माहात्म्य सांगितलें. कावड घरीं नेण्याच्या अडचणीहि पुढें मांडल्या; नंतर विंध्यवासिनीच्या दर्शनास जाऊन परत आल्यावर विष्णुभटजींनीं कावड विकत घेतली. दोन रुद्र म्हणजे बावीस कुप्या गंगेच्या भरून बंद केल्या. कावडींत गवत भरून त्यांत कुप्या ठेवल्या आणि मग ब्रह्मावर्ताकडे ह्या कावडीसह मोर्चा वळविला.

## टोप्याची नर्मदातीरावरील हकीकत

तात्या टोपे, रावसाहेब वगैरे बंडवाले पुढारी पर्जन्यकाळांत नर्मदा नदी उतरून पलीकडे जाण्याकरितां हुशंगाबादेनजीक आले तेव्हां एका वृद्धानें भरल्या नदींत उतार दाखविला वगैरे माहिती या पुस्तकांत (पान १२५) आली असली तरी मूळच्या हस्तलिखितमधील कांहीं मजकूर कै. चिंतामणराव वैद्यांनीं गाळला आहे. त्यांतला कांहीं पाल्हाळाचा आहे व तो गाळल्यानें विशेष हानि झालेली नाहीं. तो माहीतगार वृद्ध नर्मदेच्या कांठीं कसा आला; नंतर त्यानें पाणी उथळ असल्याच्या कोणत्या खुणा सांगितल्या; त्या खुणांच्या खरेपणाची परीक्षा तात्या टोपे यानें कशी पाहिली वगैरे मजकूर संक्षिप्त केला आहे. इंग्रजांनीं नदी उतरण्याची तयारी केल्यावर बंडवाल्यांनीं पळ काढून मार्गांत शेतांची व मळ्यांची जी नासाडी केली तिचा तपशील गाळला आहे. झांशी–सागरच्या दरम्यान एका गढींतल्या इंग्रजांनीं पांढरें निशाण उभारून बंडवाल्यांची दिशाभूल केल्यानंतर गढीखालचें मालथो नांवाचें शहर बंडवाल्यांनीं लुटल्याच्या वृत्तांताला वैद्यांनीं काट दिलेला आहे.

## विंध्यावासिनीचें वर्णन



प्रयागाहून जवळच विंध्यवासिनीचें स्थान आहे म्हणून गोडसे तेथें

गेले. तेथें देवीचें देऊळ पश्चिमाभिमुख आहे. देवालयास सोपे दाक्षिणोत्तर आहेत. पुढें थोडा सोगा असून दरवाजा मध्येंच आहे. दोन्ही सोप्यांत देवीची स्थापना केली आहे. मुख्य देवी पश्चिमाभिमुख आहे. मध्यें चौक चांगला आहे. तेथें दर मंगळवारीं शुक्रवारीं बंगाली लोक हजारों पशु मारतात व मारलेल्या पशूचें मुंडकें रक्त पाघळत असतां हातांत घेऊन देवीवर रक्तस्राव करितात. चौकींत दोन अडीच विती खोलीचें रक्त सांचलेलें असतें; कांहीं सुकून जातें, पण दुर्गंधी नाहीं व माशीहि नाहीं. विष्णुभटजींनीं स्नानसंध्या करून चंडीपाठास प्रारंभ केला व त्याच दिवशीं आवशीचे चार घटका रात्रीं सप्तशतीचे अकरा पाठ पुरे केले. दुसरे दिवशीं गंगापुत्र बरोबर घेऊन पहाडांत मुख्य विंध्यवासिनी देवी आहे, तिच्या दर्शनास 'प्रवास' कर्ता गेला. तीन कोस डोंगर चढावा लागतो. तेथें शंभर लोक उभे राहतील एवढीच जागा आहे. देवीपाशीं मैदान आहे. देवी पहाडास लागून आहे. मूर्ति मनुष्याएवढी आहे. तिजला शेंदूर नाहीं. देवीच्या पायाजवळ दोन हातांवर कातळांत एक लहानसें कुंड आहे. त्यांत पाणी भरून वहात असतें. तांब्या बुडवून काढला कीं दुसरा तयारच आहे. देवीची पूजा आटोपली तेव्हां गंगापुत्रांनीं बऱ्याच अंतरावर असलेलें शिवलिंग दाखविलें. प्रथम एक पाण्यानें भरून चाललेला ओढा लागला. पुढें बारीकसा डोंगर होता. त्याच्या पायथ्याशीं ओढ्याचे कांठीं लहानसें पाषाणी देवालय होतें. आंत हातभर उंचीचें शिवलिंग तांबड्या जासवंदीच्या रंगाचें आहे. या लिंगाची पूजा रामानें लंकेहून अयोध्येस जातांना केली, अशी माहिती गंगापुत्रांनीं सांगितली. [ विंध्यवासिनीस 'प्रवास' कर्ता गेल्याचा पुस्तकांत पान १३२ वर निर्देश आहे. पण तेथील प्रवासाचें वर्णन नाहीं. ]

## सासू-सुनेचा संवाद

प्रयागहून ब्रह्मावर्तास आल्यावर ( पान १३३ ) एके दिवशीं शेजाऱ्याच्या घरांत सासू सुनेचा कज्जा जबर जाहला.: ' त्यांत सूनबाईनें सासूबाईस असें सांगितलें कीं, आम्ही गंगास्नानास जाते समईं येखाद मित्राकडे जातों. पूर्वीं तुमचे उमेदींत घरांत चोळी लुगडें सोडून टाकून जिन्यांनीं माडीवर जाऊन दिवाणखान्यांत पांच चार मंडळी मध्यम श्रीमंतापाशीं

बसली असतां तेथें येऊन सर्वांस नमस्कार करून खुंटीवर ठेवलेली पैठणी घेऊन त्याजसमोर नेसून चोळी घालून त्या मंडळींत श्रीमंत सांगतील त्याचे मांडीवर बसून विडा खात असा, असा तर आमचा धिंगाणा नाहीं; इत्यादि भाषणें ऐकून फार मौज वाटली. '

## भंग्यासाठीं झांशीची दुसरी फेरी व पुढचा प्रवास

ग्वालेरला दुसऱ्या खेपेच्या मुक्कामांत प्रकृति बरी झाल्यावर ' प्रवास ' कर्ता झांशीस गेला. फक्त पुनः तो झांशीस गेला एवढाच मोघम उल्लेख सांपडतो. (पान १३४) 'यासंबंधाची माहिती कै. चिंतामणराव वैद्यांनीं सोडून दिली आहे. ती इतर दृष्टीनें महत्त्वाची नसली तरी ' प्रवास ' कर्त्याच्या चारित्र्यावर प्रकाश टाकणारी म्हणून महत्त्वाची आहे. झांशी सोडतांना कोणा भंग्याला कांहीं देण्याचा ठराव झाला होता. त्याचें ग्वालेर सोडतांना स्मरण होऊन त्या भंग्याचें ऋण राहायला नको, अशा भावनेनें ' प्रवास ' कर्त्यानें झांशीस दुसरी फेरी मारली. तेथें भंग्याचा हिशोब पुरा केला; जुन्या परिचितांच्या भेटी घेतल्या व नंतर सागरचा रस्ता धरला. या रस्त्यावर इंग्रजांच्या शेंकडों चौक्या ठेवलेल्या होत्या. एका चौकीदारानें ' मुशाफर आवत है ' अशी आरोळी मारावी; पलीकडच्या दुसऱ्या चौकीदारानें ' आवना देव ' असा जबाब दिला म्हणजे वाटसरूनें पुढें चालायला लागायचें असा बंदोबस्त होता. या प्रवासांत खाण्यापिण्याचे फार हाल झाले. कित्येक ठिकाणीं उतरण्यास जागाहि मिळाली नाहीं. गुरांच्या गोठ्यांत किंवा झाडाखालीं चिखलवट जमिनीवर रात्रीं काढाव्या लागल्या. जन्माष्टमी (सप्टेंबर १, १८५९) सागरास झाली. तेथून तीन दिवसांनीं श्रावण वद्य ११ ला शांडिल्य ऋषीच्या आश्रमास हे प्रवासी—चुलते पुतणे निघाले. तेथील गांवाचें नांव सांडिया असें आहे. गोडसे शांडिल्य गोत्राचे, आश्रम त्याच ऋषीचा हें तेथें जाण्याचें कारण होतें. या ठिकाणीं लहानापासून मोठ्यापर्यंत साऱ्या स्त्रिया नागव्यांनीं पाण्यांत उतरून, स्नानें करतात, असा प्रकार पाहण्यांत आला. स्त्रियांना पुरुषांची भीति वा लज्जा मुळींच वाटत नाहीं.

## परवान्याची मराठी नक्कल

हुशांमवादेस इंग्रज अंमलदारानें मार्गांत त्रास होऊं नये म्हणून 'प्रवास'

कर्त्याबद्दल तों बंडखोरांपैकीं नव्हे अशी आपली खात्री करून घेऊन सर्टि-फिकीट दिलें. ( पान १३४ ) परंतु तें इंग्रजींत होतें. ' आम्हांस इंग्रजी समजत नाहीं त्यास मराठी याचीच कॉपी करून द्यावी त्याजवरून त्याच पत्रामागें तोच मजकूर मराठी कारकुनापासून लिहून दिल्हा आणि आम्ही सलाम करून शहरांत...चालते जाहलों. ' हा मजकूर गाळला आहे. यानंतर गौड ब्राह्मण त्यास आपल्या घरीं घेऊन गेला व तेथें त्याच्या उमे-दवार मुलीनें अतिप्रसंग उत्पन्न केला,वगैरे गाळलेला मजकूर पुढें दिला आहे.

## हुशंगाबादेचा प्रसंग

हुशंगाबादेस बिऱ्हाडासाठीं जागा शोधीत असतां भागवताचें पुस्तक खाकेंत घेऊन चाललेला एक गौड ब्राह्मण 'प्रवास' कर्त्यास भेटला. त्यानें यास आपल्या घरीं नेलें व रहाण्यास जागा दिली. (पान १३४) त्या गौड ब्राह्मणाची नवऱ्यानें टाकून दिलेली उमेदवार तरुण मुलगी तेथें होती. अश्विनी पौर्णिमेच्या रात्रीं 'प्रवास' कर्त्याचे सोबती बाहेर गेले. त्या मुलीची आई व ती मुलगी अशा दोघी जणी कांहीं वेळ 'प्रवास' कर्त्याशीं बोलत बसल्या. पुढें आई झोपण्यास निघून गेली व ती मुलगी एकटीच राहिली. गोष्टी बोलतां बोलतां ती मुलगी सरकत सरकत 'प्रवास' कर्त्याच्या बिछान्यावर येऊन बसली. हा प्रसंग फार विचित्र होता. 'प्रवास' कर्ता घाबरून गेला. त्यानें तिला जाण्यास वारंवार सांगितलें. ती आपलें रूप-गुण वर्णूं लागली. ' अशी स्त्री गळीं पडली असतां पुरुषानें तिचा अव्हेर केल्यास पुरुषाला फार दोष लागतो ' असल्या शास्त्रार्थाचीही तिनें धमकी दिली. त्यालाही तो दाद देत नाहीं असें पाहून तिनें त्याच्या अंगावर हात टेकला व लगट आरंभली. 'प्रवास' कर्त्याच्या अंगाला भीतीनें कंप सुटला; इतक्यांत 'ईश्वरे'च्छेनें रहाळकर व काका दारावर येऊन हांका मारूं लागले; यामुळें हें संकट टळलें. दुसऱ्या दिवशीं या मंडळीनें आपलें धर्मशाळेंत नेलें.

[ दुसऱ्यांदा 'प्रवास' कर्त्यानें ग्वालेर सोडलें तें झांशीस कोणा भंग्याचें देणें चुकतें करावयाचें होतें म्हणून. तेथील काम आटोपल्यावर तो सागरला गेला व तेथून हुशंगाबादेस आला. झांशी सागर येथें गेल्याची माहिती छापील पुस्तकांत मुळींच गाळलेली आहे. ]

## निर्णयसिंधूवरील प्रचंड टीका

टेंभुर्णीहून नेमावरास गोडसे यांनीं प्रयाण केलें (पान १३५). नेमावर हें क्षेत्र नर्मदा गंगेचें नाभीस्थान समजलें जातें. तेथें साडेतीन कोटी तीर्थें वास करतात. नर्मदेच्या दाक्षिण तीरीं हृदेश्वर सांब आहे. उत्तर तीरीं सिद्धेश्वर नांवाचें स्वयंभू शिवलिंग आहे. त्या देवळाला कळस फार आहेत; आणि सर्व काम कोरें आहे. चुना नाहीं. होळकरांमार्फत हें देवाचें संस्थान चालत आहे. सिद्धेश्वराच्या तीरास एकेरी दुहेरी तिहेरी काळीं पिवळीं घोश्याचीं फुलें सांपडतात. घोश्याचेंच जंगल आहे. या क्षेत्रांत वे. शा. सं. श्री. बोरंभट तेलंग यांजकडे नवीन पुस्तक पहाण्यांत आलें. वे. शा. सं. कृष्णंभट आरडे यांनीं निर्णयसिंधु ग्रंथावर टीका केली आहे. हें पुस्तक ऐकण्यांत आलें होतें; पण पाहिलें नव्हतें. मूळ ग्रंथाच्या चौपट हा टीकाग्रंथ आहे. त्यांतील कांहीं कांहीं विषय पाहिले.

## लग्नांतलि तेला–तुपाचा वाद

किबे यांच्याकडील लग्नांत वरातीच्या वेळीं वंशपात्रांतील दिवे लावले नव्हते; असें का तर वराकडील तेल आलें नाहीं, ही माहिती पुस्तकांत आहे. (पान १३५) यावरून जो वाद झाला तो गाळला आहे. तुपासाटीं हजारों रुपयांचा खर्च विवाहांत होत असतां दिव्यास तेवढें तेलच कां वापरतात असा विद्वानांस प्रश्न केला, तेव्हां त्यांनीं 'तूपच पाहिजे' असा निकाल देऊन पुस्ती जोडली कीं, 'तुपाच्या अभावीं तेल तिळाचें असावें. प्रतिनिधि पुष्कळ आहेत, पण मुख्य दिव्यास तूपच आहे.' परंतु शास्त्रीमंडळीनें या निकालास मान्यता दिली नाहीं. कारण तेल कीं तूप याबद्दल शास्त्रांत स्पष्ट वचनें नाहींत. शिवाय काशी ते रामेश्वर चारी मुलखांत वराकडील तेलाचा रिवाज आहे. तो आजवर वाडवडिलांनीं पाळला. म्हणून तूप वापरूं नये, असा त्यांचा अभिप्राय पडला व तोच अंमलांत आला. विवाह आटोपल्यावर 'आम्हां दोघांस महेश्वरी रेशिमकाठीं धोतरजोड्या; मजला रुपये १० व काकास रुपये ५ मिळाले.' नंतर राजाकडील नित्यदानें, समर्या, घागर व वस्त्रें अशी बिदागी मिळाली.

